श्रीवेदाङ्गार्थचन्द्रिका, भाग पांचवा.

सार्थ

# आश्वलायन - गृह्यसूत्र

( गृह्यवृत्तिवगैरेंतील विशिष्टविषयांसह )

लेखक

काव्यालंकारभूषण पं. शिवरामशास्त्री शिंत्रे,

संस्कृताध्यापक, एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई.

जानेवारी १९३८.]

# प्रस्तावना

—०—

प्रस्तुत सार्थ आश्वलायन-गृह्यसूत्र हा ग्रन्थ, आमच्या वेदार्थचन्द्रिकेचा पाचवा भाग होय धर्माची मूलप्रमाणें श्रुति, स्मृति व सदाचार आहेत ह्यामध्यें, स्मृतीपैकींच कल्पसूत्रें समजलीं जातात कारण तीं पुरुषानीं रचलेलीं आहेत वेदासारखीं अपौरुषेय नाहींत तथापि वेद व इतर सामान्यस्मृति ह्यांच्या मध्यस्थानीं, श्रौत व स्मार्त ( गृह्य ) ह्या नावाचीं कल्पसूत्रें येतात हीं अर्थात् प्रत्यक्षदृष्ट श्रुतिवचनास धरून रचलेलीं असल्यामुळें, अनुमानगम्य वेदाच्या अथवा स्मरणाच्या आश्रयानें रचलेल्या इतर स्मृतींपेक्षां, अधिक प्रबळ प्रमाणें ठरतात प्रत्येक वेदशाखेचीं वेगवेगळीं कल्पसूत्रें असून त्यामध्यें, मन्त्रब्राह्मणरूप वेदानींच वर्णिलेला कर्तव्यकर्मरूप धर्म, व्यवस्थितपणानें सांगितला आहे आतां, सूत्रोक्त सर्वच धर्मांचीं मूलवाक्यें, उपलब्ध वेदशाखांत सांपडतीलच अशी खात्री देता येणार नाहीं, तथापि सामान्य वैदिक प्रमाणें मात्र, त्या आचारांना सांपडतातच

हेमाद्रिसंग्रहांत पुढें दिलेलीं, पुलस्त्यवचनें आहेत **"श्रौतानां कर्मणां क्लृप्तिः कल्पसूत्रं तदुच्यते ॥ तथैव गृह्यकल्पानां स्मार्तानामुपसंग्रहः ॥ १ ॥ शाखानां विप्रकीर्णत्वात्पुरुषाणां प्रमादतः। नानाप्रकरणस्थत्वात्स्मृतेर्मूलं न लक्ष्यते" ॥ २ ॥** अर्थ –वेदोक्त कर्मांची जी आचरण योग्य अशी व्यवस्थित रचना, तिला कल्पसूत्र असें म्हणतात त्याचप्रमाणें, स्मृत्युक्त एकाग्नीवर गृहांत होणाऱ्या संस्कारादिक विधींचा, गृह्यसूत्रांत केलेला संग्रहही, वेदमूलकच म्हटला जातो वेदशाखा परस्परांत मिसळल्या असल्यामुळें, अध्ययन करणाऱ्याच्या दुर्लक्ष वगैरे चुकयामुळें, व मूलवाक्यें निरनिराळ्या वेदप्रकरणांत पडलीं गेल्यामुळें, गृह्यादिस्मृतींचें मूल, बिनचूक सांपडत नाहीं

असो ऋग्वेदाच्या शाकल व बाष्कल ह्या दोन शाखांचें कल्पसूत्र, शौनकाचा शिष्य असलेल्या आश्वलायन महर्षीनें रचिलें आहे त्यापैकीं प्रथम बारा १२ अध्याय श्रौतसूत्र असून शेवटचे चार अध्याय हें प्रस्तुत गृह्यसूत्र आहे ह्याच चार अध्यायाचें मराठी विवरण, प्रकृत ग्रंथांत आम्ही केलें आहे त्रैवर्णिकांना संस्कारामुळेंच द्विजत्व येत असतें ते संस्कार एकदर चाळीस असून शिवाय

"दया सर्वभूतेषु, क्षान्ति, अनसूया, शौचम्, अनायास, माङ्गल्यम्, अकार्पण्यम्, अस्पृहा, " हे आठ आत्मगुण आहेत पूर्वोक्त चाळीस संस्कार व हे आठ आत्मगुण ह्यांनीं जो द्विज, युक्त होतो, तो ब्रह्मसायुज्याला प्राप्त होतो, असें गौतमादिकांच्या स्मृतींत सांगितलें आहे संस्कारांपैकीं, अग्न्याधेय, अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, चातुर्मास्य ( पर्वे ४ ), आग्रयणेष्टि, निरूढपशुबन्ध व सौत्रामणी ह्या सात हवि संस्था ( हविर्यज्ञ ) असून अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र व अप्तोर्याम ह्या सात सोमसंस्था आहेत हे चौदा संस्कार, श्रौतसूत्रांमध्यें सविस्तर सांगितलेले असतात ह्याशिवाय राजसूय, अश्वमेध, कारीरी, पुनःकामेष्टि वगैरे शेंकडो काम्य, नैमित्तिक व प्रायश्चित्तरूप कर्मेंही श्रौतसूत्रांतून आहेत, तसाच कांहीं स्मार्त नित्यकर्मांचाही क्वचित् उल्लेख आहे असो पूर्वोक्त चौदा हवि संस्था व सोमसंस्था ह्या संस्काराशिवाय गर्भाधानादिक इतर सव्वीस संस्कार ( पंचमहायज्ञ व सात पाकयज्ञसंस्था, मिळून ), ह्या व इतर गृह्यसूत्रांत सांगितले आहेत *अष्टका, पार्वणस्थालीपाक, श्राद्ध, श्रवणाकर्म, प्रत्यवरोहण, चैत्री* ( शूलगव ), आश्वयुजीकर्म, ह्या सात पाकयज्ञसंस्था होत गृह्यकर्में हीं, त्या त्या शाखेच्याच सूत्राशीं संलग्न असल्यामुळें, अद्यात चालू आहेत श्रौतकर्मांचें तसें नाहीं चारी वेदाच्या शाखांचीं सूत्रें पाहून त्यांच्या समन्वयानें, अग्निष्टोमादिक यज्ञाचे प्रयोग जुळवून लिहावे लागतात सारांश, क्रियानुष्ठानाला इतर वेदांतील कोणत्या तरी शाखांची जरूर लागत असल्यामुळें, श्रौतकर्म हल्लीं तरी फारच बिकट होऊन गेलें आहे त्यामुळेंच ऋग्विधानांतील सोपे विधि व पुराणोक्त देवतापूजा पुढें आल्या ह्याशिवाय बौद्ध व जैन ह्या धर्मांच्या हल्लयामुळेंहि लौकिक दृष्टीनें, हिंसायुक्त भासणाऱ्या क्रिया मागें पडल्या गृह्याचारांत तितकी फारशी हिंसाहि नाहीं, व संस्कारांचा जनतेशीं संबंध नित्य पडतो आणि ते, द्विजत्वोत्पादक आहेत, म्हणून त्यांतील विधि मात्र कसेबसे जीव धरून राहिले आहेत

"सहस्रखण्ड स्वकृत सूत्र ब्राह्मणसन्निभम्। शिष्याश्वलायनप्रीत्यै शौनकेन विपाटितम्" ॥ वाचस्पत्यबृहदभिधानांत दिलेल्या ह्या पुराणांतील श्लोकावरून 'शौनकाचार्य,' आश्वलायनाचा गुरु होता असें दिसतें व श्रौतगृह्याच्या शेवटींही, "नमः शौनकाय" असें आश्वलायनाचार्यांनीं त्यास गुरुवन्दन केलें आहे, त्यांत व आ० गृह्य ४।७।१४ सूत्रांतहि, ही गोष्ट खरी दिसते ह्यांशिवाय ऋग्विधान, बृहद्देवता आणि ऋग्वेदप्रातिशाख्य हे ग्रंथ शौनकाच्या नांवानें प्रसिद्ध आहेत

बृहद्देवतानुक्रमणीच्या आधारानेंच आश्वलायनाची व कात्यायनाची सर्वानुक्रमणी रचली गेली आहे तथापि स्वत बृहद्देवतेंत, आचार्य शौनक व आश्वलायन ह्यांचा, तटस्थापारसा उल्लेख आहे ( बृहद्देवता अध्याय ४ श्लोक १३९ पहा ) त्यावरून बृहद्देवतेचा कर्ता शौनक हा आचार्यशौनकाच्या विद्यावंशातलाच असून त्याच्यापेक्षा किंचित् मागूनचा असावा बृहद्देवतेचा काल सुमारें २५०० वर्षे आहे, कारण, यास्काचे निरुक्त व वेदाङ्गनिघण्टु ह्यांचा, त्या ग्रंथात आधार घेतलेला दिसतो तसेंच गालव शाकपूणि, यास्क, भागुरि ह्यांच नावही दिसते

"महाव्रतस्य पञ्चविंशतिं सामिधेन्य " वगैरे शाकलशाखेच पाचवे आरण्यक, आश्वलायनकृत आहे असें म्हणतात, व बृहदाश्वलायनस्मृतींत, इतर स्मृतींप्रमाणे अनेक आचार सांगितले आहेत हे ग्रन्थ, वर पुराणवचन दिले आहे त्यांत सांगितलेल्या शौनकग्रन्थाच्या आधयान लिहिलें असावे एकदरींत सूत्रकार आश्वलायनाचा काल, 'सव्वीसशें' वर्षांपूर्वी असावा त्याचा गुरु शौनक, आपल्या ऋक्प्रातिशाख्यात व ऋग्विधानात प्रारभीं, ब्रह्मदेवाला नमन करीत आहे व त्याच्या प्रातिशाख्यात प्राच्य पाञ्चाल ह्या देशातल्या उच्चारणाच स्पष्टीकरण दिसतें, त्यावरून त्याचे वास्तव्य, पुष्करक्षेत्राजवळ असावेंसें वाटते शिवाय श्रौतसूत्र अ० १२–७ मध्यें यमुनानदीचा, व अ० १२–६ मध्यें सरस्वतीनदीचा उल्लेख आहे ही नदी कुरुक्षेत्राच्या दक्षिणेस आहे हेंही एक प्रमाण आहे 'पाणिनीच्या नडादिभ्य फक्' ह्या सूत्रान अश्वलशब्दापासून 'आश्वलायन' शब्द बनतो तथापि भारतश्रोता शौनक व आचार्य शौनक ह्याच्याप्रमाणें हाही पाणिनीयप्रोक्त वेगळाच, प्राचीन आश्वलायन महर्षि असेल राजवंशात व ऋषिवंशात, तीं तींच नावें अनेक वंशजाना लावलेली आढळतात म्हणून केवल नामसादृश्यावरून व्यक्तिचें नाव ठरविणे चुकीचं होइल असो, शौनकीय ऋक्प्रातिशाख्याची परिभाषा, पाणिनीयव्याकरणापेक्षा वेगळी आहे पुराणनिरीक्षणग्रन्थात आश्वलायनाचार्यांचा काळ, एकतीसशें वर्षे, प्रस्तुतकालापूर्वी मानिला आहे

आश्वलायनाचार्यांच्या वेळीं विध्युक्त मद्यमांसाचा प्रचार अप्रतिबन्ध असावा असें श्रौतसूत्र अ० १२, कण्डिका ९ १० ह्यावरून दिसून येतें त्याला मूलाधार ऐतरेय ब्रा० अध्याय ३१ ह्यांतील पशुअङ्गाची वाटणी आहे गृह्यसूत्रातही मधुपर्क, अष्टका श्राद्ध, अनुस्तरणी, शूलगव ह्या प्रकरणात मास व मदिरा ह्यांचा उल्लेख आहे एकदरींत पाप व पुण्य शास्त्रप्रमाणक आहे त्या शास्त्रातच जरी एखादा लोकविद्विष्ट आचार विहित असेल, तरी तो केलाच पाहिजे असा सूत्रकाराचा कटाक्ष दिसतो

" यावेद्‌विहिता हिंसा नियतास्मिश्चराचरे ॥ अहिंसामेव ता विद्या द्वेदाद्धर्मोहिनिर्बभो ॥ १ ॥ ( मनुस्मृति अध्याय ५ श्लोक ४४ ) ह्या मनुस्मृतीच्या वचनातही तोच अर्थ सांगितला आहे ह्याचा अर्थ, मन्वादिक स्मृतिकारांनी आपल्या कर्मविधींत, छागदर्भादिक चराचर पदार्थांच्या विषयात वेदप्रोक्तच जी *हिंसा नियमित केली असेल ती अहिंसाच समजावी* कारण सर्वच धर्म वेदापासून प्रकट झाला आहे तो वेद जें कर्तव्य सांगेल तो धर्म, व निषेध करील तो अधर्म होय तेथें आपल्या वाटण्याचा काहीं उपयोग नाहीं कारण स्वत: वेदांतच मांसापासून तो वन्या, सावे ह्यापर्यन्त होमद्रव्यें सांगितलीं आहेत त्या सर्व होमद्रव्यांपैकीं, जो रूढ आहार असेल, किंवा जें सुलभ असेल त्याचा प्रचार *अधिक होणें साहजिक आहे मांस महाग, दुर्लभ व त्याचें तन्त्रही अधिक* म्हणून नित्यहोमांत मात्र—"होम्यच मांसवजम्" ( आश्व० गृ० १–९–६ ) असा सूत्रकारानें मांसाचा निषेध केला आहे हिंसा हें, त्या निषेधाचें कारण नव्हे ही पूर्वमीमांसकाची दृष्टि

निवृत्तिमार्गी उत्तरमीमांसक ह्यावर म्हणतात कीं, लोकांची मैथुनकर्म, मांसाशन, व मद्यपान ह्याकडे सहज व नित्यच प्रवृत्ति आहे, त्याकरिता यदाज्ञा नको अशा सिद्ध गोष्टींचेंच वेदांत विधान असल्यास, तें, इतर कालांत व स्थलांत त्या कर्मांच्या निषेधाकरता अर्थात् नियमाकरिताच समजावें आचरणाविषयीं त्या विधींचें तात्पर्य नाहीं श्रीमद्भागवतांतील सुप्रसिद्ध, "लोके व्यवायामिषमद्यसेवा नित्यास्तुजन्तोर्नहितत्र चोदना ॥ व्यवस्थितिस्तत्र विवाहयज्ञसुराग्रहैरासुनिवृत्तिरिष्टा" ॥ १ ॥ ह्या श्लोकांत, ही दुसऱ्या मीमांसकांची विचारसरणी सांगितली आहे अधिकारभेदानें दोन्हीही कल्पना रास्तच आहेत नाहींतर अहिंसेचा निरर्थक व्याप्ति वाढविल्यास पाणी पिण्यानें, व श्वासोच्छ्वासानेंही हजारों जंतु मरतात हे सूक्ष्म शोधांनीं सिद्ध होऊन मग जगायलाच नको अशावेळीं शास्त्रमर्यादा सभाळून तारतम्यानेंच वागलें पाहिजे वाल्मीकि *रामायणांत वनवासांत असतां, श्रीरामचंद्रानें हरिण मारून त्याच्या मांसानें* देव पितरांचें पूजन व आपलाही निर्वाह केला, असा उल्लेख आहे अयोध्याकांड सर्ग ५६ २२ व सर्ग ५६ २३ पहा अयोध्याकाण्ड सर्ग १०३ ३० मध्ये दशरथाला वन्यपदार्थांचें श्राद्ध देऊन राम म्हणतात इदं भुंक्ष्व महाराज प्रीतोयद दानायवम् ॥ यदन्न पुरुषोभवति तदन्नास्तस्य देवता ॥' सारांश

माणसें जें खातात तेंच त्याच्या देव पितराचे योग्य अन्न होय. ह्यावरून वेदातील पक्षभेदांचा उपयोग, प्रसगविशेषीं उपयुक्त ठरतो असा समन्वय मानल्यास दोन पक्षात विरोध रहात नाहीं असो; आश्वलायनाचार्यांच्या ह्या सूत्रानंतरच्या काळात बौद्धजैनाचें व पौराणिकाचें वाङ्मय वाढल्यावर, पिष्टपशु, अहिंसाप्रधान धर्म व सन्यासमार्ग ह्या पक्षान्तराचा बोलबाला सुरू झाला तो आजतागायत चालू आहे सस्कारांकरिताही, मद्यमासाचे प्रतिनिधि कल्पिले गेले ही सुधारणा, परिस्थितीप्रमाणें, स्वाभाविकच झाली शिवाय देवार्चनाच्या साधनांत "पत्र-पुष्प फल तोयम्" अशा स्वल्प साधनाचाही समावेश आहेच मद्यमासाचाच आग्रह नाहीं कारण जर इतर धान्यादि भक्ष्य सुलभ आहे, तर वृथा हिंसेनें जीवन करणें योग्य नाहीं जेथें दुसरी सोयच नसेल तेथें, व औषधादि विशिष्ट कारणानें, मासादिकाचाही उपयोग करणें योग्य व भागही आहे ऐतरेय ब्राह्मण, अध्याय ६-३ मध्यें, "स यदग्नीषोमीय पशुमालभते सर्वाभ्य एव तद्देवताभ्यो यजमान आत्मान निष्क्रीणीते" म्हणजे-यजमान अग्नीषोमीय पशूच्या मोबदल्यानें आपणास सर्व देवतापासून सोडवून घेतो असें म्हटलें आहे- त्याचप्रमाणें त्या पशूमधून मेध ( इविष्ठ ) उत्क्रान्त होऊन भातात व यवात शिरला, अशीही आख्यायिका आहे, "ऐ ब्रा अ ७ १ पक्ष" त्यातच अ ६ खण्ड ९ मध्यें "सर्वेषा वा एषपशूना मेधेन यजते य पुरोडाशेन यजते" अशी पुरोडाशयज्ञाची प्रशसा केली आहे

असो, प्रकृत गृह्यसूत्राचें प्रो मॅक्सम्युलर ह्यानीं छापविलेलें एक इग्रजी भाषान्तर, व दुसरें लोकहितवादी ऊर्फ सरदार रावबहादुर गोपाळराव हरि देशमुख, ह्यानीं इ० सन अठरार्शे ऐशीं सालीं करवलेलें मराठी भाषान्तरही पूर्वी प्रसिद्ध झालें आहे तथापि आमच्या ह्या विवरणात मूळ सूत्राशिवाय, गृह्यवृत्तींतील बहुतेक विषया-चाही साप्रदायिकरीत्या ऊहापोह केला आहे, हा विशेष आहे जागजागीं ऋड्मन्त्राचा स्थलनिर्देश केला आहे त्यातील आकडे क्रमानें अष्टक, अध्याय, वर्ग व ऋचा ह्याचे बोधक जाणावे सस्कारावाचून द्विजत्वच येत नसल्यामुळें, ह्या सस्कारबोधक सूत्राचें ज्ञान मिळविणें आवश्यक आहे ह्या आश्वलायनसूत्रावर देवस्वामी अथवा देवन्नात ह्याचें सविस्तर भाष्य सस्कृतात असून, त्याच्या आश्रयानेंच नरसिंहपुत्र गार्ग्यनारायणानें, उत्तम सस्कृतवृत्ति लिहिली आहे वृत्ताच्या पूर्वीच आश्वलाय-नाच्या शिष्यपरंपरेपैकीं कोणीतरी, चार अध्यायाचें गृह्यपरिशिष्टही ह्या सूत्राला

जोडले आहे त्यात सूत्रकारानें सूचित केलेला इतर सूत्रांतील विषय ह्या सूत्राला पुरवणी म्हणून लावला आहे त्याच्या चार अध्यायात क्रमानें २६,१९,१८,२२, अशीं खण्डें असून सन्ध्यावन्दन, पुण्याहवाचन, ग्रहयज्ञ, श्राद्धविस्तार, पालाशविधि नारायण-नागबलि, वास्तु प्रतिष्ठा, इष्टापूर्ते, वगैरे अधिक विषय आले आहेत असो, **श्रौतस्येवच यद्भाष्यं मयैवच कृतद्विजाः ॥ गृह्यभाष्यंकरिष्यन्ति द्विजा इति न मे कृतम् " ॥ १ ॥** ह्या वृद्धाश्वलायनस्मृतींतल्या वचनावरून आपल्या श्रौतसूत्राचें भाष्य, ( सिद्धान्तभाष्य ? ) स्वत आश्वलायनाचार्यांनीही आधीं केलें होतें, गृह्यसूत्राचें मात्र नाहीं, असें दिसतें असो, परिशिष्टानंतर गृह्यसूत्रावर देवस्वामीचें भाष्य व अनेक वृत्ति झाल्या, त्यांपैकीं गार्ग्यनारायणीय वृत्तीला धरूनच, शंकराचार्यांच्या पूर्वीच जन्मलेल्या कुमारिलभट्टानें (सन ७२० सुमारें ), ह्या गृह्यसूत्राच्या विषयावर, सुमारें ८५६ कारिका रचून पुढच्या याज्ञिकांना तो विषय सुबोध करून दिला कारिका, सूत्रापेक्षा सुबोध असून बराच विषय थोडक्यात सुचवितें वृत्तिकार, देवस्वामीनंतर व कुमारिलाच्या आधीं केव्हातरी झाले आहेत

आम्ही आपल्या ह्या विवरणरूप भर्थांत, वृत्तीप्रमाणेंच कारिकांचा व प्रयोग-रत्नादि ग्रन्थांचाही आधार घेतला आहे ह्या सूत्राच्या मराठी अर्थाबरोबर, त्यात उल्लेख केलेल्या मन्त्रांचाही अर्थ, परिशिष्टरूपानें द्यावा असा प्रथम विचार होता. परंतु, ग्रंथ फार वाढूं लागला, व बरेच मन्त्रार्थ इतरांनी केले आहेत, असें पाहून तो विचार तूर्त मागें ठेविला आहे तथापि संधि मिळाल्यास बहुतेक लिहून झालेले "आश्वलायन गृह्यमन्त्रार्थ," ह्या नांवाचें वेगळेंच पुस्तक प्रसिद्ध करूं, असें मुक-रून ठेवितों त्यानें सर्व मंत्र, त्या त्या क्रियेशी संबद्ध आहेत अनन्वित नाहींत हें मनाला पटेल क्रियानुष्ठानामध्यें संहितोक्त, खिलोक्त, व सूत्रोक्त अशा तीन प्रकारच्या मन्त्रांचा उपयोग होत असतो संहिताहरणानन्तर, ज्या इतर शाखोक्त मन्त्रांची कर्मकांडी आवश्यकता भासूं लागली, व ज्यांचा ब्राह्मणग्रंथांत उल्लेख आहे त्यांना संहितेंतच जागजागी परिशिष्टरूपानें समाविष्ट केलें तीच 'खिलें' होत सूत्रोक्त मन्त्रांचा, खिलांत समावेश दिसत नाहीं तथापि तेहि आपस्तंबादि इतर वेदशाखांतले असून सूत्रकारांनी स्मरणानें व परंपरागत निर्दिष्ट केलेले असावेत कारण ते सेच मन्त्र, इतर सूत्रांच्या त्या त्या ग्रंथांतरांतहि, थोड्याशा फरकानें आढळतात असें, ह्या सूत्राच्या उपयोगीं पडणारे 'अरण्यपरा-

जहि० ' व ' नवे श्वेतस्याभ्यागा० ' हे दोन मन्त्र, सत्यापाढ–श्रौतसूत्राच्या, विंशप्रश्न–पदपटलाच्या षष्ठखण्डात ( श्रवणाकर्मांत ) ही आढळतात. खिलमन्त्रांचे छन्दऋषि, त्याच्या त्याच्या मूलशाखेंत सांगितले असून बृहद्देवतेंत व सर्वानुक्रमणींतही काहीं आढळतील. सौत्रमन्त्राचा ऋषि वामदेव समजावा, असें **संस्काररत्नमालेंत** लिहिलें आहे. ह्या ग्रंथाच्या वाचनानें, सर्वसाधारण वाचकांना, वैदिक व स्मार्त संस्कारांचें बरेंचसें ज्ञान होईल, अशी आशा आहे. ह्या ग्रन्थाच्या छपाईचें काम योग्य मुदतीच्या आत काळजीपूर्वक चांगलें करून दिल्याबद्दल कर्नाटक प्रेसचे मालक श्रीयुत कुळकर्णी यांचा मी आभारी आहें.

शेवटीं, ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाला, **मुंबई विश्वविद्यालयानें** उदारपणें भरपूर देणगी देऊन मला हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यास समर्थ केलें, त्याबद्दल सदर विद्यापीठाचा मी अत्यन्त ऋणी आहें, हें कृतज्ञतेनें प्रसिद्ध करितों. ही मदत न मिळती तर वीस वर्षांपूर्वीच लिहिलेलें हें पुस्तक, आणखीही कित्येक वर्षे पडूनच राहिलें असतें. कारण मजसारख्या थोड्या प्राप्तीच्या, केवळ अध्ययनाध्यापनांत तत्पर असणाऱ्या माणसाला इतर साह्याच्या अभावीं, असल्या पुस्तकाचें प्रसिद्धीकरण दुष्करच आहे. म्हणून **मुंबई विश्वविद्यालयाचे** पुन्हा एकदा आभार मानतों व सार्थ अष्टाध्यायी अथवा **पाणिनीयार्थचन्द्रिका** ह्या, वेदार्थचन्द्रिकेच्या पुढच्या मोठ्या भागालाही, ईश्वरकृपेनें साह्य मिळेल अशी आशा करून ही प्रस्तावना संपवितों.

मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा
शुक्रवार शके १८५९

**शिवरामशास्त्री दिवे,**
संस्कृताध्यापक, एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई

# आश्वलायनगृह्यसूत्रांतल्या दुर्बोध शब्दांचे अर्थ

शब्द — अर्थ

अक्षत = सातू

अनादेशाहुति = सूत्रांत होम सांगितला असून त्याचा मंत्र दिला नसेल तर्थे द्यावयाच्या आहुति ( गृ सू १।३।८ )

अनुप्रवचनीय = गायत्रीमन्त्राचें ग्रहण म्हणजे अनुप्रवचनीय तत्संबन्धी होम

अन्वष्टक्य = अष्टकाश्राद्धाच्या दुसरे दिवशीं करावयाचें श्राद्ध

अन्वाधान = *दोन किंवा तीन समिधा अग्नीवर ठेवणें*

अन्वारब्ध = कर्मकर्त्याला स्पर्श करून असलेला

अमात्य = स्त्रीपुत्रादिक कुटुम्बीय ( गृ सू २।१।११ )

अवका = पाण्यांतील नीळ

अवत्त = उद्धरणानंतर तोडून घेतलेलें होम्यद्रव्य

अवभृथ = यज्ञान्तींचें तदङ्गभूत स्नान

अष्टका = श्राद्धविशेष ( गृ सू २।४।१ पहा )

आघार = घृताचें सेचन ( आतीं )

आज्यभाग = चक्षुर्नामक दोन घृताहुति ( गृ १।१०।१३ )

आचार्य = मुंज करून गायत्र्युपदेश करणारा ( गृ १।२२।११ )

आभ्युदयिक श्राद्ध = *मंगलकार्यापूर्वीचें नान्दीश्राद्ध*

आवृत् = मन्त्ररहित ( गृ सू १।१७।६ वगैरे पहा )

इध्म = पंधरा समिधांची जुडी ( गृ सू १।१०।१२ )

उत्तरपुरस्तात् = ईशान्य दिशा

उदक्संस्थ = उत्तरेस समाप्त होईल असें कर्म

उदवसान = गांवाबाहेर राहण्यास जाणें ( गृ ४।१।११ )

उपवास = एकवेळ हविष्यान्नाचें भोजन ( गृ १।१०।१२ )

उपस्तरण = पात्रांत हविर्द्रव्य घेण्यापूर्वीं घातलेलें तूप आज्य

ऊवध्य = होमार्थ अंगें काढल्यानंतर उरलेला पशूचा भाग ( ४।८।२६ )

एकोद्दिष्ट = एकट्या मृताच्या उद्देशानें करावयाचें श्राद्ध ( गृ ४।७।१ )

शब्द अर्थ

कर्पू = खाच, भेग ( गृ सू २।५।६ पहा )
कुशसूला = चळी ठेवण्याचें दर्भपात्र
कृताकृत = पाक्षिक होणारें, वैकल्पिक
कौलाल = कुंभाराने केलेलें, कारागिरीचें पात्रादिक
चैत्य = चैत्य म्हणजे नवस, त्यामध्यें उद्दिष्ट असा शान्तिप्रद व पुष्टिप्रद देवता
जामदग्न्य = जामदग्न्य गोत्रातले, पाच अवर्ते होणारे, पंचप्रवरी ब्राह्मण ( पंचावत्ती )
जुहू = एकप्रकारची स्रुचा ( होमसाधन )
तैजस = शुद्ध धातूचें
दृषद् = दगडीपाटा ( गृ सू ४।३।१७ पहा )
ध्रुवा = वेदीमध्यें घृतानें भरून ठेवलेली मोठी स्रुचा.
निनयन = ओतणें, ठेवणें ( गृ सू १।२।११ वगैरे पहा )
परिदान = रक्षणाकरिता स्वाधीन करणें ( गृ १।२२।१० )
परिधि = साम असा झाडाचा लाव पोक
परिश्रित = पडदे लावून केलेली खोली
परिस्तरण = स्थण्डिलाच्या चारी बाजू दर्भवेष्टित करणें
पात्री = पुरोडाश ठेवण्याची रुंद वाटी
पार्वणश्राद्ध = तीन पितरानाच उद्देशून द्यावयाचें श्राद्ध.
पृषदाज्य = घृत मिसळलेलें दहीं
प्रकिर = विखरणें, पसरणें ( गृ ४।८।१४ पहा )
फलीकृत = पाखडलेल ( गृ सू १।१०।८ )
बर्हि = दर्भमुष्टि ( गृ सू १।१०।१२ )
मधुपर्क = आत मध मिसळलेलें दहीं, ज्यामध्यें प्राशन करतात असा आदरार्थक विधि।
मेखला = कमरेला बांधावयाची दोरी
लौहायस = लोखंडी सामान, धातुपात्रें ( ४।३।१८ )
वपा = पशूची पोळीसारखी अन्तस्त्वचा
वृक्क = कुशींतील मांसपिण्ड.

शब्द अर्थ

**वृद्धिपूर्त** = नान्दीश्राद्ध
**व्युद्धारम्** = निरनिराळ्या पात्रात घेऊन.
**शम्या** = एक हात लांबीचे दाडक्यासारखें यज्ञसाधन
**शामित्र** = पशूचें शिजवावयाचा अग्नि
**शीपाल** = शेवाळ
**समवत्तधानचमस** = इडा ( होमशेषद्रव्य ) ठेवायचें पात्र
**स्नातक** = सोडमुंज करून आलेला
**स्थालीपाक** = पर्वादि दिवशीं स्थालींत भात शिजवून करायचा होम
**स्फ्य** = तरवारीसारखें लाकडी यज्ञसाधन
**स्विष्टकृत्** = गृ सू १।१०।२२ मध्यें विहित, विशेष आहुति
**हृदयशूल** = पशूचें हृदय आत अडकवून तें भाजायचा लाकडी पिळा.
**हौम्य** = होमास विहित अशीं द्रव्यें

---

# अनुक्रमणिका

| कण्डिका | विषय | पत्र |
| --- | --- | --- |

## अध्याय दुसरा



## अध्याय तिसरा

# ह्याच ग्रंथकर्त्याचीं कांहीं पुस्तकें



## मराठीभाषेंत वेदाङ्गवाङ्मय ! ! !

१ श्रीवेदाङ्गशिक्षा मराठी विवरणासह ( डे ब्ह ए सोसायटी, पुणें, त्या सभेनें बक्षीस दिलेली ) किं सहा आणे ट ह १॥ आणा

२ सार्थ वेदाङ्गज्यौतिषम् ( लगधीयम् ) किं पाच आणे ट ह १। आणा

३ सार्थ पिङ्गलछन्दःसूत्र ( मुबई इलाख्यातील दुय्यम शाळात, शिक्षकाच्या लायब्ररीकरिता मजूर ) किं बारा आणे ट ह ३ आणे

४ सार्थ वेदाङ्गनिघण्टु अथवा वैदिक मराठी कोष-किं नऊ आणे ट ह २ आणे.

५ सार्थ आश्वलायन गृह्यसूत्र ( गृह्यादिग्रन्थांतील विशिष्टविषयांसह ) किं २। रुपये ट ह चार आणे



६ श्रीभारतीशतक सटिप्पणिकम् ( मुबई इलाख्यात दुय्यम शाळांतील विद्यार्थ्यांच्या व शिक्षकाच्या लायब्ररीकरिता मजूर ) किं चार आणे ट ह १ आणा

७ सस्कृतपाठमग्रह. ( प्रथमो भाग, इंग्लिश पाचवीकरिता टेक्स्टबुक म्हणून मजूर ) किं पांच आणे ट [illegible] २ आणे


पं. शिवरामशास्त्री शिंत्रे,

जयराम शानताना नरा चाळ, परा मजला,

७८, मुगभाट क्रॉसलेन, मुंबई नं ४

# सार्थ आश्वलायन-गृह्यसूत्र



श्रीवेदाङ्गार्थचन्द्रिका–भाग ५ वा.

अध्याय पहिला कण्डिका १ ली

गणेशशारदाचार्यान्नत्वाहं देशभाषया ।

आश्वलायनगृह्याख्यसूत्रं संनिरूपयाम्यतः ॥

उक्तानि वैतानिकानि गृह्याणि वक्ष्यामः ॥ १ ॥

श्रीगणपति, देवी शारदा आणि सूत्रकार श्रीआश्वलायनाचार्य ह्यांना प्रथम सद्भावानें वंदन करून यापुढें त्याच्या गृह्यसूत्राचें मराठी भाषेंत व्याख्यान करण्यास सुरवात करतों. प्रथमतः ह्या सूत्राची थोडी पीठिका दिली पाहिजे. धर्माचे मूल आधार ग्रंथ वेद असून त्यांत मन्त्र व ब्राह्मण असे दोन भाग आहेत. त्यापैकी पद्यात्मक मन्त्रभागांत बहुधा इन्द्र, अग्नि, रुद्र वगैरे देवतांची स्तुति असून ब्राह्मणभागांत, त्यापैकीं कोणत्या मन्त्राचा कोणत्या यज्ञांत कोणत्या रीतीनें उपयोग करावा हें सांगितलें असतें, एतद्दर्शक विधीचें (कर्म) बोधक वाक्य म्हणजे ब्राह्मण असें समजावें. तथापि ते ब्राह्मणग्रंथ समुद्रासारखे, आख्यायिका, प्रमाणें, विवरण, मन्त्रव्युत्पत्ति, वादविवाद वगैरे अनेक विषयांचा समावेश करणारे असल्यामुळें, त्यांतून विविधार्थ रत्नासारखीं असाध्यस्त विखरलीं आहेत, व एकेका ब्राह्मणांत

सांगोपांग यज्ञप्रयोगहि नाहींत म्हणून यज्ञादिकर्मांच्या सोईकरितां प्रत्येक शाखेमध्यें, निरनिराळ्या आचार्यांना ब्राह्मण वगैरे प्राचीन ग्रन्थांच्या अनुसारानें यज्ञप्रयोगाची बोधक अशीं कल्पसूत्रें रचिलीं आहेत त्यामध्ये बहुधा आपापल्या सर्व वेदशाखेची व्यवस्था दाखविलेली असते असो त्यांपैकीं ऋग्वेदाच्या शाकलशाखेचें सूत्र महर्षि आश्वलायनानें रचिलें आहे ह्या कल्पसूत्राचे श्रौतसूत्र व स्मार्तसूत्र अथवा गृह्यसूत्र असे दोन विभाग असतात श्रौतांत गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नि ह्या तीन अग्नीनींच साध्य असणारे अग्निष्टोम वगैरे यज्ञ सांगितले असून गृह्यसूत्रांत फक्त एकाग्निसाध्य कर्मेंच मुख्यत्वेंकरून सांगितलीं असतात भगवान् आश्वलायनाचार्यांच्या श्रौतसूत्राचे एकदर बारा अध्याय असून त्याचा आरंभ 'अथैतस्य समाम्नायस्य विताने योगापत्तिं वक्ष्यामः' असा आहे व शेवट 'नमः शौनकाय नमः शौनकाय' असा आहे

ह्या श्रौतसूत्रानंतर त्याला जोडूनच हें प्रकृत चार अध्यायाचें गृह्यसूत्र रचिलें आहे ह्याचा प्रारंभ 'उक्तानि वैतानिकानि' असा असून ह्याचाही शेवट 'नमः शौनकाय' असाच आहे एकदरींत ह्या दोन्ही सूत्रांचा कर्ता एकच आचार्य असून त्या श्रौतसूत्रांतील संज्ञा, परिभाषा वगैरे सर्व साधारण नियम, ह्या दुसऱ्या शास्त्रांतही अनुवृत्तीनें याचे ह्या उद्देशानें त्याचा उल्लेख येथें प्रारंभीं करून ह्या नवीन शास्त्रास प्रारंभ केला आहे आतां 'उक्तानि०' वगैरे वर दिलेल्या सूत्राच्या अर्थाकडे वळतों भगवान् सूत्रकार श्रीआश्वलायन महर्षि म्हणतात, आम्हीं ह्यापूर्वीच्या बारा अध्यायाच्या श्रौतसूत्रांत वैतानिक म्हणजे पुष्कळ अग्नींवर मिळून होणारीं कर्में सांगितलीं आतां ह्यापुढें, ह्या शास्त्रांत गृह्यनामक एकाच अग्नीवर होणारीं कर्में मुख्यतः सांगणार आहोंत संस्कृतांत गृहशब्दाचा अर्थ भार्या असून घर असाही आहे म्हणून गृह्याग्निही दोन प्रकारचा आहे

कोणी भाऊ विभक्त झाले असता, दायविभागामुळे त्यांना निरनिराळ्या गृहात अग्नींचा स्वीकार करावा लागतो; अथवा लग्न केलें असता पत्नीसमवाने औपासनाग्नीचा स्वीकार करावा लागतो. ह्या दोहोनाही गृह्याग्नि असेंच नाव आहे. ह्या शास्त्रात काहीं गृह्याग्नीचा संबंध नसलेलीं कृत्येंहीं सांगितलीं आहेत, तथापि गृह्यकृत्येंच बहुतेक असल्याने, ह्या सूत्राला प्राधान्यामुळें गृह्यसूत्र असे नाव दिलें आहे. एखाद्या गावात ब्राह्मणाची वस्ती फार असल्यास त्याला वाहुल्यामुळे ब्राह्मणगाव म्हणतात, तसाच प्रकार ह्या नावाविषयीं आहे हे पहिले सूत्र ग्रन्थप्रतिज्ञेचें आहे ॥ १ ॥

त्रयः पाकयज्ञाः ॥ २ ॥

ह्या गृह्यसूत्रात पुढें वर्णिलेले, विस्तारानें लहान परंतु प्रशसनीय असे यज्ञ, एकदर तीन प्रकारचे आहेत ह्या सूत्रात पाकशब्दाचा अर्थ लहान व प्रशस्त असा घेतला आहे, अन्नपाक असा नाहीं. तो घेतला तर 'पाकयज्ञानामेतत्तन्त्रम्' ह्या पुढें येणाऱ्या सूत्रात पाकयज्ञपदानें आज्यहोमाचें ग्रहण होणार नाहीं, व त्यामुळें सर्वसमान असणारे पाकयज्ञाचें तन्त्र (विधान) आज्यहोमात होणार नाहीं. ह्यातील यज्ञाना प्रशस्त म्हणण्याचें कारण, ते यज्ञ संस्काररूप आहेत व संस्काराशिवाय पावित्र्य व द्विजत्व मुळींच येत नाहीं. 'पञ्चविंशतिसंस्कारैः संस्कृता ये च वै द्विजाः ॥ ते पवित्राश्च योग्याः स्युः श्राद्धादिषु सुयन्त्रिताः ॥ १ ॥ श्रौते कर्मणि नो शक्तो ज्ञानद्रव्याद्यभावतः ॥ स्मार्तं कुर्याद्यथाशक्तोऽप्याप्याचार लभेत्सदा ॥ २ ॥ कृतदारो न तिष्ठेत क्षणमप्यग्निना विना ॥ तिष्ठेत चेद्द्विजो व्रात्यस्तथाच पतितो भवेत् ॥ ३ ॥' अशीं स्मृतिवाक्यें आहेत. ह्यांचा अर्थ;–गर्भाधान, चौल वगैरे २५ संस्कारानीं संस्कृत झालेले ब्राह्मण पवित्र होतात, व श्राद्धादि सर्व कृत्यामध्यें योजना करण्यास ते योग्य असतात ॥ १ ॥ जो

मनुष्य ज्ञान, द्रव्य वगैरे नसल्यामुळें सोमयागादि श्रौतकृत्य करण्याविषयीं असमर्थ असेल, त्यानें आपल्या शक्तीप्रमाणें, गृह्यसूत्रादि स्मृतींत सांगितलेल्या कर्मांचें आचरण करावें; त्यांतही त्याला आचाराचें फळ मिळेल ॥२॥ पत्नीचा स्वीकार केल्यानंतर द्विजानें एक क्षणभरही गृह्याग्निवांचून राहूं नये; जर तो तसा राहील तर व्रात्य ( संस्कारहीन ) बनून अधोगतीला जाईल॥ ३ ॥ असो. एकंदरींत संस्काररूप असलेले ह्या गृह्यसूत्रांतले यज्ञ श्रेष्ठ आहेत, हें सिद्ध झालें.

त्या पाकयज्ञांचे तीन प्रकार कोणते हें पुढच्या सूत्रानें सांगतात.

हुता अग्नौ हूयमाना, अनग्नौ प्रहुता,
ब्राह्मणभोजने ब्रह्मणिहुताः ॥ २ ॥

अग्नींत आहुति टाकले जाणारे वैश्वदेव वगैरे पाकयज्ञ हुतनामक जाणावे, अग्निभिन्न पृथ्वी वगैरे आधारांवर आहुतित्याग होणारे ते प्रहुतनामक जाणावे, व ब्राह्मणांच्या मुखीं अन्नदान करणें ह्याचें नांव ब्रह्मणिहुत होय. ह्या तीन प्राचीन संज्ञा सांगण्याचें कारण शास्त्रांत न्यूनता राहूं नये हें असून शिवाय ह्या तीन जातींचा निरनिराळेपणा समजावा हेंहि आहे. ह्या समजण्याचा उपयोग सांगतों. पुढें ह्याच अध्यायाच्या दहाव्या कण्डिकेंत ( खंड ) ‘पाकयज्ञानामेतत्तन्त्रम्’ असें सूत्र आहे. त्याचा अर्थ, ‘ह्या पूर्वींच्या स्थालीपाकाचींच अवयवभूतकर्में सर्व पाकयज्ञांना लावावीं’ असा आहे. परंतु ह्या ग्रंथांत पाकयज्ञ सांगण्याचीच प्रतिज्ञा मागच्या सूत्रांत केली असल्यामुळें, तेथें ‘पाकयज्ञानाम्’ एवढीं जास्त अक्षरें सूत्रकारानें घातलीं आहेत, तीं व्यर्थ होऊं लागलीं. कारण सिद्धाचेंच पुनःकथन किंवा पुनरुक्ति हा दोष असल्यानें लाघवप्रिय सूत्रकार, असें निष्कारण कधींही करीत नसतात. म्हणून त्या ‘पाकयज्ञानाम्’ ह्या अधिक पदानें

असा अधिकार्थ सूचित केला की ह्या पूर्वीच्या स्थालीपाकाच्या जातीचे जे पाकयज्ञ असतील म्हणजे हुतमक्षक यज्ञ असतील, त्यामध्ये ह्यापूर्वाचेंच सर्व तन्त्र आहे, त्यामुळे प्रहुतरूपी सर्पबल्यादिकयज्ञात अवदानधर्म जात नाहीं व ब्रह्मणिहुताल निर्वापादिक होत नाहीं, असे ह्या तीन जाती सागण्याचे प्रयोजन आहे त्यासारखीं निरर्थक भासणारीं पदें घालून त्यानीं विशेष इष्टार्थ सुचविण्याची शैली, सत्रसूत्रकार बहुधा सोड फारिता पाळतात, व्याकरणशास्त्रात ह्या प्रकाराला ज्ञापक असे म्हणतात ह्या ग्रन्थात पुढेंही अशींच अनेक ज्ञापके येणार आहेत आता पुढच्या सूत्राने, मागे दिलेल्या हुतादिक्रियाच्या प्रशस्तपणाबद्दल वेदमन्त्राचे प्रमाण देतात

**अथाप्यृच उदाहरन्ति, यः समिधा य आहुती यो वेदेनेति ॥४॥**

'य समिधा' ह्या मन्त्रप्रतीकामध्यें (आद्याग) ऋचेच्या चरणापेक्षा (पाद) यो वेदेन ह्या अधिक भागाचें ग्रहण केले आहे, त्यास्तव वस्तुत येथें तृचाचे (तीन ऋचा) ग्रहण व्हावयास पाहिजे होते. कारण श्रौतसूत्राच्या आरभींच, 'ऋच पादग्रहणे, सूक्त सूक्तादी हीने पादेऽधिके तृच सर्वत्र' (श्रौत–सू० १–१–१७) म्हणजे ह्या आश्वलायनसूत्रात जेथें ऋचेचा एकपाद दिला असेल, तेथें त्या सब ऋचेचें ग्रहण आहे असें समजावें सूक्ताच्या आरभींचा पाद अर्धर्च दिला असल्यास त्या सपूर्ण सूक्ताचे ग्रहण करावें व वरच्या 'य समिधा' ह्या प्रतीकाप्रमाणें पादापेक्षा अधिकाशाचें ग्रहण असल्यास समग्र तीन ऋच्या समजाव्या अशी परिभाषा आहे परतु ह्या तृचापैकीं तिसऱ्या 'स्वग्रयोरो'० ऋचेचा अर्थ, ह्या प्रस्तुतच्या पाकयज्ञाच्या स्तुतीस अनुकूल नसल्यानें येथे तृचाचें ग्रहण न करता दोनच ऋचा समजाव्या कारण 'प्रसङ्गादपवादो

वरीयान्' म्हणजे सामान्यत प्राप्त नियमापेक्षा अपवाद वलिष्ट असल्यानें त्याचा बाधक होतो, असा नियम आहे आता वरच्या सूत्रात 'ऋच' असें द्वितीयेचें बहुवचन आहे, त्याची वाट दोन ऋचा घेऊन कशी लागणार असें म्हणाल तर, पुढें येणाऱ्या ब्राह्मणाच्या उताऱ्यात 'अग्ने रथाय' वगैरे दोन ऋचा आणखी दिल्या आहेत त्या ह्यात मिळविल्या म्हणजे ह्या बहुवचनाची सगति जुळेल 'य समिधा०' वगैरे दोन ऋचा व त्याचा अर्थ देतों य समिधा य आहुती यो वेदेन ददाश मर्तो अग्नये । यो नमसा स्वध्वरं ॥ १ ॥ तस्येदर्वंतो रहयन्त आशवस्तस्य द्युमितम यशः । न तमहो देवकृतं कुतश्चन मर्त्यकृतं नशत् ॥ २ ॥ ( ऋक्संहिता अष्टक ६, अध्याय १, वर्ग २९।३० ),"

'अर्थ :—जो मनुष्य पळस वगैरच्या समिधेनें, घृत वगैरेच्या आहुतीनें, वेदाध्ययनानें अथवा ज्योतिष्टोमादियनानें युक्त होऊन चतुरोत्र शब्दिकांनी अग्नीची परिचर्या करतो, त्याचाच जलद धावणार, शत्रूचा पराभव करणारे घोडे मिळतात व अत्यन्त धनसहित कीर्तीही त्याचच मिळत, आणखी तो कोणत्याही कारणान, दवकृत अथवा मनुष्यकृत पापास (पापफळ दु खास) प्राप्त होत नाही ' ह्या मन्त्राचें प्रमाण देण्याचा एवढाच भावार्थ असा की, हे पाकयज्ञसुद्धा नित्यनैमित्तिक व धनप्राप्त्या बरोबरीचा असल्यानें, अग्निहोत्रानें देखील त्याचें अनुष्ठान अवश्य केलें पाहिजे

समिधमेनापि श्रद्दधान आदधन्मन्येत यज्ञ इदमिति नमस्तस्मै च आहुत्या यो वेदेनेति विषयवाप्यभि प्रीतिमन्तेन पत्न्यसृपिग्याव । अग्नेऽथाय शविसे सुभा यद्स्यं याः । पृताम्वादीयो मधुनश्च वोचतेति। या एव म इद प्रमाण

**मधुनश्च स्वादीयोऽस्ति प्रीतिः स्वादीयोऽस्तीत्येव तदाह। आ ते अग्न ऋचा हविर्हृदा तष्टं भरामसि। ते ते भवन्तूक्षाण ऋषभामो वशा उतेति एत एव म उक्षाणश्च ऋषभाश्च वशाश्च भवन्ति। य इमं स्वाध्यायमधीयत इति, यो नमसा स्वध्वर इति, नमस्कारेण वै खल्वपि, न वै देवा नमस्कारमति, यज्ञो वै नम इति हि ब्राह्मणं भवति ॥ ५ ॥ खण्ड ॥ १ ॥**

'समिधमेवापि' येथपासून 'यज्ञो वै नम' येथपर्यंत ब्राह्मणग्रन्थांतला उतारा दिला असून तो मुख्यत वर चवथ्या सूत्रांत सुचविलेल्या दोन ऋचांचें तात्पर्य सांगून पाकयज्ञाची प्रशंसा करीत आहे. आतां क्रमानें त्याचा अर्थ लिहितो होम करणारा श्रद्धाळू पुरुष, केवळ समिधा जरी अग्नींत टाकीत असला तरी त्यानें मी हा यज्ञच करीत आहें अशी भावना ठेवावी, कारण अशा श्रद्धायुक्त भावनेनें ती समिधाच त्या देवतेला 'नम' म्हणजे अन्नासारखी होते येथें भगवद्गीतेंतल्या '**पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति। तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः**' ह्या श्लोकासारखी कल्पना स्पष्ट व्यक्त केली आहे. मन्त्रांतील 'आहुती' ह्याचा अर्थ —जो सर्वसाधारण आहुतीनें होम करीत असेल त्यानेंही वरच्या प्रमाणेंच भावना ठेवावी 'यो वेदेन' ह्याचा अर्थ —केवळ वेदम न्त्राच्या पठनानें देखील देवतांचा मनोरथ होतो. पुढें ब्रह्मयज्ञाच्या वर्णनांत ह्याचा विस्तार होईलच. असो ह्या ऋचा अभिप्राय मनांत ठेवून मन्त्रद्रष्टा ऋषि 'अगोरधाय' ह्या मन्त्राचें पठन करिता झाला त्याचा अर्थ —हे यज्ञ-कर्त्या मित्रांनो! गाईंना प्रतिबंधांतून सोडविणारा, उज्ज्वल आणि आकाशांतून वृष्टि करणारा अशा इन्द्राच्या मनोरथाकरितां, आपण, तुपापेक्षा फार काय मधापेक्षा देखील गोड असें स्तुतिवचन मोठ्यानें सुस्थान करूया. तात्पर्य, माझें हें भाषणच तुपापेक्षा व मधापेक्षा स्वादिष्ट आहे.

प्रत्यक्ष अनुभव तर तसा नाहीं म्हणून एकदरींत माझें भाषण इद्राला तसें आल्हादकारक होवो, असेच ऋषीचे अन्तर्गत आहे आतां मासापेक्षा देखील हे भाषण स्वादिष्ट होते, हें 'आते अग्न०' ह्या ऋचेनें सागतात तिचा अर्थ —हे अग्ने! हे माझे सर्वधी ऋत्विज, स्वाध्यायाचें पठन करीत आहेत, तेच अत करणानें, विभाग केलेले ऋग्रूपी हविर्द्रव्य, आम्ही धारण करीत आहों ते मन्त्रच तुला श्रेष्ठ असे गोऱ्हे, बैल व गाई होवोत म्हणजे त्याच्या मासानें जशी तुझी प्रीति होते तशीच ह्या मन्त्रपठनानेंही होवो 'यो नमसा स्वध्वर' ह्या मन्त्रभागाचा अर्थ जो केवळ नमस्कारानें देवताचे आराधन करतो तोही चागल्या यज्ञाचा कर्ताच होतो, कारण नमस्कारानें देखील देवताची प्रीति होते देवता नमस्काराचें देखील अतिक्रमण (उल्लघन) करीत नाहींत म्हणून एकदर केवळ नमस्कार देखील एक प्रकारचा यज्ञच आहे येथपर्यंत हें सर्व सूत्र वर्दैकदेश जे ब्राह्मण त्याचा अनुवाद करून, पाकयज्ञाच्या प्रशस्तपणाला अधिक बळकटी आणीत आहे येथें ह्या पहिल्या अध्यायातील पहिली कण्डिका (खड) पूर्ण झाली हीमध्यें एकदर सूत्रें ५ आहेत ॥ १ ॥

## अध्याय १—कण्डिका २ री.

**अथ सायंप्रातः सिद्धस्य हविष्यस्य जुहुयात् ॥ १ ॥**

ह्या सूत्रातल्या प्रारम्भार्थक अथ शब्दानें, आता पूर्वी प्रतिज्ञा केल्या प्रमाण गृह्यासनसंबधी किंवा गृह्याग्निसंबधीं असणारीं कृत्यें सागण्यास सुरवात केली जात आहे, असे सुचविलें आहे. 'दुपारीं आणि रात्रीं शिजविलेल्या हविष्यान्नाचा होम करावा' असा ह्या सूत्राचा अर्थ आहे. सूत्रातल्या 'सायंप्रात' ह्या पदाचा अर्थ दिवस व रात्र असा व्युत्क्रमानें करण्याचें कारण, हें वैश्वदेव नावाचें कृत्य अन्नसंस्कारक असून त्यानंतर

आतिथ्याचें विधान आहे व मनुष्याचे अन्नग्रहण तर मध्यान्ही विहित आहे; कारण 'पूर्वाह्णे देवाना, मध्यंदिने मनुष्याणामपराह्णे पितॄणाम्' अशी शास्त्राज्ञा आहे; त्याकरिता सौत्रशब्दक्रमाप्रमाणें सायकाळ व प्रात काळ असा अर्थ घेता येत नाहीं. कारण पाठक्रमापेक्षा अर्थक्रम प्रबल असतो. तसेच वैश्वदेवकृत्याचा क्रमही 'प्रात सायम्' असा आम्ही दिला आहे. त्याचें कारण पुढें आठव्या व नवव्या सूत्रात येणार आहे. 'सिद्ध' (शिजलेले) ह्या पदानें दह्या दुधानां हें कृत्य करू नये असे सुचविले असून हविष्यपदाने हरभरे, पावटे वगैरे अहविष्यें चालणार नाहींत असें व्यक्त केले आहे. वस्तुत हें अपूर्वोत्पादक (पुण्य) कर्म असल्यामुळें ह्यात हविष्याविष्याचा सबध येणेच शक्य नसल्यामुळें सूत्रातले हविष्यपद व्यर्थ येतें, म्हणून त्याने, हविष्याच्या लागलीच होम करावा त्याला स्थालीपाक-प्रकरणात पुढें सांगितलेले इतर तन्त्र लावू नये असें ज्ञापित केलें आहे. आता दुसऱ्या सूत्रानें ह्या कर्माचे मन्त्र सांगतात.

**अग्निहोत्रदेवताभ्यः सोमाय वनस्पतयेऽग्नीषोमाभ्यामिन्द्राग्निभ्यां द्यावापृथिवीभ्यां धन्वन्तरय इन्द्राय विश्वेभ्यो देवेभ्यो ब्रह्मणे॥ २॥**

यापैकीं 'अग्निहोत्रदेवताभ्य' हा निरायक मन्त्र नसून अर्थ-प्रतिपादक आहे म्हणून 'तस्य वा एतस्याग्निहोत्रस्य' वगैरे वेदात सांगितलेल्या प्रसिद्ध अग्निहोत्राच्या देवता घ्याव्या. त्या दिवसाच्या सूर्य व प्रजापति आणि रात्रीच्या अग्नि व प्रजापति अशा आहेत व त्यात त्यागबोधरूपदाचा विशेष उल्लेख नसल्यामुळें सामान्य—परिभाषाप्राप्त 'स्वाहा' हें पद प्रत्येक मन्त्रापुढें जोडावें. असो. एवढ्यानें सूर्याय स्वाहा, प्रजापतये स्वाहा, सोमाय वनस्पतये स्वाहा, अग्नीषोमाभ्या स्वाहा, इन्द्राग्निभ्यां

स्वाहा, -द्यावापृथिवीभ्यां स्वाहा, धन्वन्तरये स्वाहा, इन्द्राय स्वाहा, विश्वेभ्यो देवेभ्य स्वाहा व ब्रह्मणे स्वाहा असे दहा दिवसाच्या वैश्वदेवाचे मन्त्र असून रात्रीच्या वैश्वदेवाचेही असेच आहेत फक्त 'सूर्याय' ह्या पहिल्या आहुतीचे जागीं 'अग्नये' असा फरक करावा म्हणजे झालें हल्लीं बहुधा हें कृत्य एकतन्त्रानेंच करीत असल्यानें प्रातर्वैश्वदेवात, रात्रीच्या दोन अग्निहोत्रदेवता मिळवून एकदर मन्त्र १२ होतात, व त्याशिवाय प्रायश्चित्तार्थ व कर्मपूर्ततेकरिता चार व्याहृतींच्या ( भू , भुव , स्व , भूर्भुवस्व ) आहुती मिळवून एकदर सोळा मन्त्र होत असतात येथें देवयज्ञ अथवा वैश्वदेव हें नित्यकर्म समाप्त झाले.

आता ह्यापुढे ३ ऱ्या सूत्रापासून १० वें सूत्र संपेपर्यंत बलिहरण अथवा भूतयज्ञ सागतात

स्वाहेत्यथ बलिहरणम् ॥ ३ ॥

सूत्रातल्या अथ शब्दाचा अर्थ येथे, 'त्यानंतर' असा असल्यामुळे वैश्वदेवानंतर लागलीच हे बलिहरण करावें असे सुचविलें आहे ब्रह्मयज्ञ ह्या तीन (देव, भूत व पितृ) यज्ञाच्या आधीं, नाहींतर मागून सवडीने करावा ह्या तिघात मात्र अतर नसावें. ह्यात वैश्वदेवाप्रमाणें सामान्य-शास्त्रानें स्वाहाकार आणणे शक्य असताही पुन्हा मुद्दाम घेतलेलें 'स्वाहा' हें अधिक पद असे सुचविते कीं, ह्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही बलिहरणात स्वाहाकार लावू नये. म्हणून चैत्ययज्ञीय मे स्वाहा पद न लावता नम पद लावतात

आता पुढच्या सूत्रानीं बलिहरणाचे मत्र सागतात

एताभ्यश्चैव देवताभ्योऽद्भ्य ओषधिवनस्पतिभ्यो गृहाय गृहदेवताभ्यो वास्तुदेवताभ्यः ॥ ४ ॥

ह्या पूर्वोक्त वैश्वदेवातल्या १० क्रिया तन्त्र (एकत्रानुष्ठान) केल्यास १२ देवनाना पूर्वीप्रमाणें स्वाहान्त मन्त्र कल्पून भूमीवर बलिदान करावें, कारण हे कर्म प्रकृत आहे. त्यानतर अम्द्य स्वाहा, ओषधिवनस्पतिभ्य स्वाहा, गृहाय गृहदेवताभ्यो वास्तुदेवताभ्य स्वाहा, अशा तीन मन्त्रानीं बलिदान करावें, मागें वैश्वदेवांत जशीं 'वनस्पतये' व 'विश्वेभ्य' हीं विशेषणें मानिलीं आहेत, त्याचप्रमाणे येथेही 'गृहदेवताभ्यो वास्तुदेवताभ्य' हीं दोन्हीं गृहाची विशेषणें मानिलीं आहेत. ते वेगळे विधायक मन्त्र मानल्यास गृह व वास्तु एकार्थक असल्यामुळे एक मन्त्र, पुनरुक्तिमुळे व्यर्थ होईल. ह्या गृह्यसूत्रावर संस्कृतात देवस्वामीचे (देवत्रात) विस्तीर्ण भाष्य असून त्यालाच अनुसरून नैध्रुव गार्ग्यनारायण ह्याने एक उत्तम वृत्ति (टीका) रचिली आहे. ह्या वृत्तीच्या धोरणाने व इतर सूत्रें पाहून श्रीमान् कुमारिलभट्टानें ह्या गृह्यसूत्राच्या कारिका रचिल्या आहेत. हे कुमारिलस्वामी भट्टपाद नावाने प्रसिद्ध व मण्डनमिश्र नावाच्या पंडिताचे गुरू असून श्रीशंकराचार्यांचे समकालीन होते. आमच्या ह्या विवरणातील बहुतेक विषय वर दिलेली वृत्ति व गृह्यकारिका ह्याच्या धोरणानेच लिहिला जाणार असल्यामुळे आम्ही वर 'अद्भ्य स्वाहा' वगैरे तीनच मन्त्र लिहिले. हल्लींचे पुष्कळ याज्ञिक 'गृहदेवताभ्य स्वाहा' व 'वास्तुदेवताभ्य स्वाहा' असे दोन मन्त्र अधिक मानतात, परंतु असें करणे वृत्तिविरुद्ध व अयोग्यही आहे सूर्याय स्वाहापासून महागणेस्वाहापर्यंत दिलेल्या मन्त्रानीं, कर्त्यानें आपणाकडून आरंभ करून नीट पूर्वेकडे सरळ रेषेंत बलिदान करावें व मध्यें अंतर सोडून पूर्वेकडेच 'अद्भ्य स्वाहा' वगैरे तीन बली द्यावे, असें वृत्तिकाराचे मत आहे ॥ ४ ॥

इन्द्रायेन्द्रपुरुषेभ्यो, यमाय यमपुरुषेभ्यो, वरुणाय वरुणपुरुषेभ्यः, सोमाय सोमपुरुषेभ्य इति प्रतिदिशम् ॥ ५ ॥

वर सांगितल्याप्रमाणें मध्यें अंतर सोडलें असेल त्यांत, इन्द्राय स्वाहा वगैरे दोन दोन मन्त्रांनीं पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर ह्या दिशांमध्यें बली द्यावे; कर्म उदक्संस्थ (उत्तरेस संपणारें) होण्याकरितां मुख्यांच्या उत्तरेस तत्तत्पुरुषांना बली द्यावे. ॥ ५ ॥

**ब्रह्मणे ब्रह्मपुरुषेभ्य इति मध्ये ॥ ६ ॥**

वर सांगितल्याप्रमाणें सोडलेल्या अंतरांतच दिग्देवतांच्या मध्यभागीं 'ब्रह्मणे स्वाहा' व ब्रह्मपुरुषेभ्यः स्वाहा ह्या मन्त्रांनीं बलिदान करावें.

**विश्वेभ्यो देवेभ्यः ॥ ७ ॥**

ह्यांत व पुढच्या सूत्रांत 'मध्ये' हें पद अनुवृत्तीनें येतें म्हणून मध्येंच 'ब्रह्मणे' जोडीच्या पूर्वेस किंवा उत्तरेस विश्वेभ्यो० त्या मन्त्रानें बली द्यावा.

**सर्वेभ्यो भूतेभ्यो दिवाचारिभ्य इति दिवा ॥ ८ ॥**

मध्यभागींच पूर्वाहुतीच्या पूर्वेस किंवा उत्तरेस 'सर्वेभ्यो भूतेभ्यो दिवाचारिभ्यः स्वाहा' ह्या मन्त्रानें दिवसाच्या बलिहरणांत बलिदान करावें ॥ ८ ॥

**नक्तंचारिभ्य इति नक्तम् ॥ ९ ॥**

रात्रीच्या बलिहरणकृत्यांत 'दिवाचारिभ्यः' काढून त्याचे जागीं 'सर्वेभ्यो भूतेभ्यो नक्तंचारिभ्यः स्वाहा' असा ऊह (तर्क) करून बलि द्यावा. मन्त्रार्थावरूनच दिवसा व रात्रीं बलिदान करणें शक्य असतां वरच्या सूत्रांत केलेलें दिवाग्रहण व येथलें नक्तम् पदाचें ग्रहण, वैश्वदेवाचा क्रम प्रातःसायम् असा आहे म्हणजे वैश्वदेवकर्मास दिवसा आरंभ होतो, अग्निहोत्रासारखा रात्रीं नाहीं असें ज्ञापित करतें. हें ग्रहण नसतें तर 'सायंप्रातः सिद्ध०' ह्या पहिल्या सूत्रांतल्या पदांप्रमाणें अनिष्ट असा विपरीत क्रम झाला असता ॥ ९ ॥

**रक्षोभ्य इत्युत्तरतः ॥ १० ॥**

'रक्षोभ्य स्वाहा' ह्या मन्त्राने सर्व आहुतींच्या उत्तरेस बलिदान करावें ॥ १० ॥ येथें भूतयज्ञ सपला.

**स्वधापितृभ्य इति प्राचीनावीती शेषं दक्षिणा निनयेत् ॥ ११ ॥**

'यज्ञोपवीतशौच च ( श्रौतसू. १।१।१० )' ह्या श्रौतसूत्रातल्या परिभाषेनें, जेथे निवीत किंवा प्राचीनावीत असें विशेष विधान नसेल त्या कृत्यात उपवीतियुक्त असावे असा नियम केला आहे म्हणून त्याप्रमाणें वरचे दोन यज्ञ उपवीतिनेंच करतात. तसें येथे होऊ नये म्हणून 'प्राचीनावीती' असे विशेष विधान करतात. **'उपवीतं ब्रह्मसूत्रं प्रोद्धृते दक्षिणे करे ॥ प्राचीनावीतमन्यस्मिन्निवीतं कण्ठलम्बितम्' ॥ १ ॥** असा कोश आहे. ह्याचा अर्थ. उपवीत म्हणजे उजव्या हाताखालीं शेवट असलेलें ब्रह्मसूत्र ( जानवें ) होय. प्राचीनावीत म्हणजे डाव्या हाताखालीं शेवट असलेलें, व निवीत केवळ गळ्यात माळेसारखे लोंबत असलेलें ब्रह्मसूत्र होय. स्पष्ट समजण्याकरिता ही परिभाषा दिली. आता सूत्रार्थ लिहितों. भूतबलीनंतर शिल्लक राहिलेल्या सिद्ध हविष्याचे, प्राचीनावीती ( अपसव्ययुक्त ) होऊन, सर्वांच्या दक्षिणबाजूस 'पितृभ्य स्वधा' ह्या मन्त्रानें बलिदान करावें. ह्या सूत्रांत निनयेत् ( अर्पण करावें ) ह्या क्रियाबोधक स्वतन्त्र पदानें हें पितृयज्ञ नामक वेगळेंच कर्म आहे. भूतयज्ञापैकीं नाहीं, असें सूचित केलें. ह्यामुळें दररोज पितृयज्ञानिमित्त ब्राह्मणभोजनाची आवश्यकता नाहीं, ह्या आहुतीनेंच भागतें हेंही सांगितलें. शेष ( शिल्लक ) ह्या सूत्रस्थ पदानें वैश्वदेव-बलिहरणामागून लागलीच हें कर्म करावें असें सुचविलें आहे; नाहींतर निराळें कृत्य असल्यामुळें भिन्नकालीं करण्याचा संशय आला असता. वैश्वदेवकर्म गृह्याग्निवरच करावें

असा नियम नाहीं. लौकिकाग्निसही चालतें. असे, विवाहाग्निप्रकरणापूर्वीच हें प्रकरण सांगितल्यानें सिद्ध होतें. ह्याला गृह्याग्नीची जरूरीच असती तर त्यानंतर हें प्रकरण लिहिलें असतें. असो. 'वैश्वदेवं कृत्वाऽतिथिमाकाङ्क्षेत्' अशा स्मृतिवचनावरून ह्या कर्मत्रयानंतर अतिथींचा सत्कार करून त्यास भोजन द्यावें असें समजतें. हाच मनुष्ययज्ञ होय आणि पांचवा ब्रह्मयज्ञ ह्याच सूत्रांत पुढें येणार आहे. (गृह्यसू० ३-२-१....पहा.) हे पञ्चमहायज्ञ गृहस्थाश्रमी पुरुषाना नित्य विहित आहेत. 'एतान्पञ्चमहायज्ञान्कुर्यादहरहः शुचिः' असें गृह्यकारिकाकार म्हणतात. वैश्वदेवावाचून भक्षिलेलें अन्न शुद्ध नाहीं.' कारण 'केवलाघो भवति केवलादी' ह्मणजे

देवादिकांना दिल्यावाचून, केवळ अन्न खाणारा केवळ पापरूपी बनतो अशी श्रुती आहे. तसेंच भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात् = जे पापी पुरुष देवाकरिता नाहीं तर केवळ स्वतःच्या पोटाकरिता अन्न शिजवतात ते अन्न खात नसून त्यारूपानें केवळ पापच खात असतात असें जाणावें, असें श्रीमद्भगवद्गीताही सांगते शिवाय हें कर्म प्रायश्चित्तरूपीही आहे 'कण्डनं पेषणं चुल्लिरुदधानीच मार्जनी॥ पञ्च सूना गृहस्थस्य ताभिः स्वर्गं न विन्दति॥'=कांडण, दळण, चूल पेटवणें, पाणी भरणें व केरसुणीनें केर काढणें, ह्या पांच गृहस्थाच्या सूना म्हणजे हिंसास्थानें आहेत; ह्या कृत्यांनीं हजारो जीवांचा वध होतो त्यामुळें ह्या सूना स्वर्गप्राप्तीला प्रतिबंधक आहेत. ह्या पञ्चसूनादोषाच्या निवारणाकरितांहि वैश्वदेव अवश्य आहे. सारांश पञ्चमहायज्ञाकडे दुर्लक्ष करून त्याची हेळसांड करणें योग्य नाहीं आतां ह्याखालीं गार्ग्यनारायणकृत वृत्तीला सम्मत असा बलिहरणाचा आकार देतो.

पूर्व

गृहाय गृहदेवताभ्यो वास्तुदे० १५

ओषधिवनस्पतिभ्य० १४

अद्भ्य स्वाहा १३

इन्द्रपुरुषेभ्य० १७ इन्द्राय स्वाहा १६

सर्वेभ्यो भूतेभ्यो नक्तचा—

रक्षोभ्य स्वाहा २९ रिभ्य स्वाहा २८ पितृभ्य स्वधा ३०

उत्तर सर्वेभ्यो भूतेभ्यो दिवाचारिभ्य० २७ • दक्षिण

विश्वेभ्यो देवेभ्य स्वाहा २६

ब्रह्मपुरुषेभ्य स्वाहा २५

सोमपु० २३ सोमाय० २२ ब्रह्मणे स्वाहा २४ यमपुरु० १९ यमाय० १८

वरुणपुरुषेभ्य० २१ वरुणाय स्वाहा २०

ब्रह्मणे स्वाहा १२

विश्वेभ्यो देवेभ्य० ११

इन्द्राय स्वाहा १०

धन्वन्तरये० ९

द्यावापृथिवीभ्या० ८

इन्द्राग्निभ्या स्वाहा ७

अग्नीषोमा० ६

सोमाय वनस्प० ५

प्रजापत० ४

अग्नये स्वाहा ३

प्रजाप० २

सूर्याय स्वाहा १

पश्चिम

जयतस्वामीचे मत वृत्तिकारापेक्षा जरा वेगळें आहे. तो म्हणतो ब्रह्मणे स्वाहा येथें अंतर न सोडता 'वास्तुदेवताभ्य स्वाहा' पर्यंत सरळ रेषेत बली देऊन अंतर सोडावें, व इन्द्रादि दिग्देवताना दिशाचे ठायीं बली देऊन त्याच्या पुरुषाचे बली त्याच्या पूर्वेस द्यावे नंतर ब्रह्मणे वगैरे मन्त्रानीं मधल्या अंतरात बली देऊन 'रक्षोभ्य' हे बलिदान सर्वांच्या उत्तरेसच करावे. हें मत गृह्यकारिकात कुमारिलभट्टानीं नमूद केले आहे. येथें पहिल्या अध्यायापैकीं दुसरी कण्डिका संपली. हिच्यामध्यें एकंदर अकरा सूत्रें आहेत ॥ ११ ॥ ॥ २ ॥

## अध्याय १ कण्डिका ३ री.

**अथ खलु यत्र क्व च होष्यन्स्यादिषुमात्रावरं सर्वतः स्थण्डिलमुपलिप्योल्लिख्य षड्लेखा, उदगायतां पश्चात्, प्रागायते नानान्तयोस्तिस्रो मध्ये, तदभ्युक्ष्याग्निं प्रतिष्ठाप्यान्वाधाय परिसमुह्य परिस्तीर्य पुरस्ताद्दक्षिणतः पश्चादुत्तरत इत्युदक्संस्थं तूष्णीं पर्युक्षणम् ॥ १ ॥**

ह्या सूत्रात आरंभीं घातलेला अथशब्द अधिकारार्थक ( भिन्नप्रकरणार्थक ) असल्यानें, ह्या सूत्रामधला होमधर्म पुढें येणाऱ्या होमविधींच्या कृत्याना लागावा असा अर्थ होतो. त्यामुळें, ह्या पूर्वीच्या वैश्वदेवात स्थण्डिलादि होमधर्म लागत नाहीं. असो. आता वृत्तीला अनुसरून सूत्रार्थ लिहितों. ह्यापुढें ज्या कोणत्याही कृत्यात होम करणें असेल त्यात प्रारंभीं कमींत कमी इषुप्रमाण ( अठरा अंगुळें ) किंवा त्याहून जास्ती, औरस चौरस चांगल्या मातीचें स्थण्डिल ( ओटा ) करावें. नंतर तें गाईच्या शेणानें सारवावें. किंवा त्यावर गाईच्या शेणाचा सडा घावा व त्यावर एखाद्या यज्ञोपयोगी समिधेच्या तुकड्यानें सहा रेषा काढाव्या. त्याचा क्रम

असा. स्थण्डिलावर अग्निस्थापना करणें असेल त्याच्या पश्चिमभागीं, दक्षिणेस आरंभ करून उत्तरेकडे सपविलेली सुमारें टीचभर किंवा त्याहून कमी अशी पहिली रेघ काढावी. तिच्या दक्षिण टोकाजवळ आरंभ करून पूर्वेकडे संपविलेली दुसरी व तिच्याच उत्तर टोकापुढें प्रारंभ करून पूर्वेकडे संपवलेली तिसरी रेघ काढावी. ह्या दुसऱ्या व तिसऱ्या रेघेच्या मध्यभागीं उरलेल्या तीन रेघा पश्चिमेकडून पूर्वेस नेलेल्या काढाव्या. कोणत्याही रेघेचा दुसरीस स्पर्श करूं नये. त्याची आकृति अशी




उत्तरेकडे समाप्ति व्हावी म्हणून मधल्या तीन रेघा दक्षिणोत्तर क्रमानें लिहिल्या आहेत. रेघांचे प्रारंभ समजण्याकरताच त्यांच्या मुळाशीं ठिंबे दिलीं आहेत. ह्या सहा रेघांवरच अग्निस्थापना करायची असते असो नतर तें शकल ( समिधेचा तुकडा ) पूर्वेकडे शेंडा करून त्या रेघांवरच टेवावें, व पाण्यानें स्थण्डिलाचें प्रोक्षण करून नतर तें शकल आग्नेयीदिशेस स्थण्डिलाबाहेर टाकून द्यावें. पुढें, आचमन करून व आपल्याकडे ध्यानगम्य मुख असलेल्या अग्नीची पूर्वोक्त रेघांवर स्थापना करून अन्वाधान करावें. अन्वाधान म्हणजे कर्मांगभूत म्हणून २ किंवा

३ समिधा अग्नीवर ठेवणे असे समजावे नंतर श्रौतपरिभाषेच्या अनुवृत्तिमुळें इध्म ( पंधरा समिधांची जुडी ) व बर्हि ( मूठभर दर्भ ) हे तयार करून ठेवावे त्यापुढे परिसमूहन करून पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर ह्या क्रमानें स्थण्डिलासभोंवतीं सोळा सोळा दर्भांचीं परिस्तरणें घालावीं परिसमूहन म्हणजे अग्नीभोंवतीं पाण्याचें मार्जन व परिस्तरण म्हणजे सभोंवार दर्भ अंथरून केलेली मर्यादा जाणावी नंतर अमन्त्रक असें पर्युक्षण करावें पर्युक्षण म्हणजे समोंवार सारखे पाण्याचें शिंपडणें होय त्यानंतर चमस नावाच्या काष्ठपात्रानें किंवा काशाच्या अथवा मातीच्या पात्रानें अग्नीच्या उत्तरेस पाणी नेऊन ठेवावे कारण पुढें 'बर्हिषिपूर्णपात्र निनयेत् (१।१०।२३)' असे ह्याच्या सेचनाविषयीं विधान आहे ह्या सूत्रात खलुशब्द निरर्थक किंवा वाक्यशोभार्थक आहे यत्र म्हणजे जेथें ह्यानें भागन असता, क्वच हें व्यर्थ पडणारें अधिक पद, गृह्याग्निपरिचरणात तन्निषेध असूनही ह्या सूत्रात्नी परिसमूहन, परिस्तरण व पर्युक्षण ह्याची प्राप्ति सुचविण्याकरिता घातले आहे तसाच अर्थ आम्हीं वर दिला आहे 'इत्युदक्संस्थम्' ह्या पदाना ह्या जातीचीं सर्व दिशाशीं संबंध असणारीं कृत्यें म्हणजे परिसमूहन, पर्युक्षण, शिरश्छिरुन्दन वगैरे नेहमीं ईशान्येस प्रारंभ करून उत्तरेस संपवावीं असं सूचित केलें आहे तसेंच तूष्णीम् ह्या अधिक पदानें मन्त्रवर्ज इतर धर्म अग्निहोत्राप्रमाणेंच ह्या होप्यधर्मात आहेत असें सूत्रकार सुचवितात ते धर्म म्हणजे धर्मांच्यापूर्वी व नंतरही परिसमूहनपूर्वक पर्युक्षण होय त्याप्रमाणें ह्या ज्ञापकानेंच परिसमूहनाची प्राप्ति असता पुन्हा सूत्रामध्यें केलेलें 'परिसमुह्य' हें पद, परिसमूहन व पर्युक्षण ह्या दोहोंमध्यें परिस्तरणें घालावीं, हें समजविण्याकरिता आहे. हल्लीं याज्ञिक लोक अप् प्रणयन ( पूर्णपात्र ) चांदीच्या भांड्यानें किंवा पानाच्या द्रोणानेंही करतात ह्या सूत्रात होमस्थानाचा संस्कार सांगितला ॥ १ ॥

**पवित्राभ्यामाज्यस्योत्पवनम् ॥ २ ॥**

दोन दर्भांनीं तुपाचें शोधन ( हलविणे ) करावे. दर्भाच्या हलविण्यानें घृतसंस्कार होतो. कारण दर्भ हे पवित्रसंज्ञक अर्थात् अधिक पावित्र्य आणणारे आहेत ॥ २ ॥

**अप्रच्छिन्नाग्रावनन्तर्गर्भौ प्रादेशमात्रौ कुशौ नानान्तयोर्गृहीत्वाङ्गुष्ठोपकनिष्ठिकाभ्यामुत्तानाभ्यां पाणिभ्यां सवितुष्ट्वा प्रसव उत्पुनाम्यच्छिद्रेण पवित्रेण वसोः सूर्यस्य रश्मिभिरिति प्रागुत्पुनाति सकृन्मन्त्रेण द्विस्तूष्णीम् ॥ ३ ॥**

ते दोन दर्भ कसे असावे व त्यानीं उत्पवन कसे करावें हें ह्या तिसऱ्या सूत्राने सागतात. ज्याचीं अग्रे मुळींच किंवा फारशीं तुटलेलीं नाहींत व ज्याच्या पोटात अंकुर ( सुइरा ) उत्पन्न झालेला नाहीं असे दोन टीचभर लांबीचे दर्भ, एकमेकास न लागतील अशा रीतीने, दोन्ही उताण्या हाताच्या अंगठा व अनामिका ( करंगळी जवळचें बोट ) ह्यामध्यें दोन्ही टोकास धरून, दर्भांच्या मध्यभागानीं, ' सवितुष्ट्वा प्रसव उत्पुनाम्यच्छिद्रेण पवित्रेण वसो. सूर्यस्य रश्मिभि ' हा मंत्र म्हणत एकदा तूप हालवून पूर्वेकडे उचलावे, व नंतर दोनदा अमंत्रकच उत्पवन करावे. ' हे हविर्द्रव्या ! सर्वप्रेरक व निवासकारक अशा सूर्याच्या किरणानीं प्रेरणा ( गति ) मिळण्याकरिता, छिद्ररहित अशा दर्भानें, मी तुझें उत्पवन करतों, असा ह्या उत्पवन मंत्राचा अर्थ होतो. ह्यावरून पाहाता शुद्धिबरोबरच होण्यास योग्य असें द्रवीकरण ( पातळ करणें ) हाही एक उत्पवनाचा दृष्ट हेतु असावा असें वाटतें. ह्या कर्माचें पूर्वेकडे होणें सामान्य श्रौतपरिभाषानींच सिद्ध असता, ह्या सूत्रात ' प्राक् ' हें पद अधिक घालून, आमच्या ह्या शाखाला विरुद्ध नसणारे इतर

सूत्रातील निविही इच्छा असल्यास करावे असे सूत्रकारानीं ज्ञापित केलें आहे ते प्रकार याज्ञिकांच्या माहितीकरिता येथें थोडक्यात देतो परि स्तरणानंतर अग्नीच्या उत्तरेस कांहीं दर्भ पसरावे व प्रकृतकल्पात ब्रह्मा नावाचा ऋत्विज् असल्यास दक्षिणेकडेही कांहीं दर्भ पसरावे, नंतर पर्युक्षण करून उत्तरेकडील दर्भावर दोन्ही हातानीं जोडीजोडीनें पात्रें उपडीं ठेवावीं हा जोड्या पश्चिमेकडून पूर्वेकडे ठेवीत जाव्या आज्यहोमात ह्या क्रमानें पात्रें




ठेवावीं ह्या विषयींचा गृह्यवृत्तिकाराचा श्लोक पाठ करण्याकरता देतो

'प्रोक्षणपात्रमथस्रुवयुक्तं, पात्रमपां प्रणयाय विशिष्टम् ॥
भाजनमाज्यहविर्ग्रहणार्थं त्विध्ममथो परिसादय दर्भान् ॥ १ ॥

ह्या श्लोकाचे वृत्त दोधक आहे, स्रुव म्हणजे पळी वगैरे पातळ पदार्थांचा होम करण्याचें साधन इतराची माहिती मागें आलीच आहे ज्या कृत्यात दर्वी अथवा स्रुच् (घन द्रव्याच्या होमाकरिता, मागें दाडा असलेलें वाटीसारखें पात्र किंवा वाटी वगैरे) असेल त्यातील पात्रासादनाचा क्रम असा



ह्याविषयीं वृत्तिश्लोक- 'स्थालीं चरोः प्रोक्षणभाजनंच दर्वीस्रुचौ सादय दर्विहोमे ॥ पात्रं प्रणीतार्थमथाज्यपात्रमिध्मं क्रमेण क्रमवित्कुशैश्च ' ॥ २ ॥ ह्याचें वृत्त इंद्रवज्रा आहे. वृत्तांचीं लक्षणें आमच्या छंदोविवरणांत पहा. असो. ह्यानंतर मागें सांगितल्याप्रमाणें दोन उत्पवन दर्भ घेऊन, प्रोक्षणपात्र उताणें करून त्यावर ठेवावें. नंतर त्यांत पाणी ओतून मागें सांगितलेल्या घृताप्रमाणें, त्या दर्भांनीं त्याचें तीनदां उत्पवन करावें. पुढें सर्व पात्रें उताणीं करून व इध्माचें बंधन सोडून ठेवून त्या जलानें सर्व पात्र वगैरेंचें प्रोक्षण करावें. मग प्रणीतापात्र अग्नीच्या पश्चिमेस ठेवून त्यावर ते दोन दर्भ ठेवावे; व ते पात्र पाण्याने भरून आत गंधपुष्पाक्षता टाकून दोन्ही हातांनीं आपल्या नाकापर्यंत उचलून नंतर अग्नीच्या उत्तरेस दर्भावर ठेवून त्यावर दुसऱ्या कांहीं दर्भांनीं आच्छादन करावे. पुष्कळ जुन्या व नव्या ग्रंथांतून प्रणीतापात्र असे उल्लेख आहेत. परंतु तापुढील अप् ( पाणी ) चा पकार हस्तदोषांनीं नाहींसा झाला असावा असे वाटते; अथवा समर्थनच करावयाचे तर प्रणीता ही स्रुच्-सारखी ठराविक स्त्रीलिंगी संज्ञा मानावी. आश्वलायनाचार्यांच्या मतानें हे पूर्णपात्र मात्र अवश्य आहे. इतर कृत्य केलें असतां फलाधिक्य आहे पण न केलें तर दोष लागत नाहीं. तसेच शाखान्तरांत आज्यसंस्कार अधिक आहे तो असा. वरच्याप्रमाणे पूर्णपात्र (प्रणीताप्पात्र) ठेवल्यानंतर त्यातले ते दोन उत्पवन दर्भ घेऊन आज्यस्थालीवर ठेवून तींत तूप ( आज्य ) ओतावें; नंतर अग्नींतून थोडेसे निखारे उत्तरेकडे काढून ठेवून त्यावर ते तूप ऊन करावें, व एखादा दर्भ पेटवून त्याच्या ज्वाळेनें तें तूप वरूनही शेकावें. पुढें दोन दर्भांचे सुमारें अगुळइतके शेंडे खुडून त्या तुपांत टाकावे, व त्या पूर्वींच्याच दर्भाचे जळतें कोलीत त्या वाटीभोंवतीं तीनदा फिरवावें. आणि तें कोलीत टाकून द्यावें. त्यानंतर हळूहळू ते तूप उत्तरेला उतरून

निखारे परत टाकून त्या वाटींत तेथेंच सूत्रोक्त आज्योत्पवन करावे व तेच दर्भ धुवून अग्नीत टाकावे आचार्यांच्या (सूत्रकार) मतानें आज्योत्पवन मात्र अवश्य आहे इतर सस्कार पूर्ववत् ऐच्छिक आहेत असें समजावें आणखी इतर शाखात स्रुक्स्रुवाचा समार्ग (दर्भांनीं शोधन) ही सागितला आहे तो गृह्यपरिशिष्ट वगैरेंत दिला आहे तोही वाटल्यास करावा साराश असे सूत्रार्थी अविरुद्ध असणारे अन्यशाखस्थ विधि इच्छेप्रमाणें करावे हें, 'प्राक्' पद अधिक घालून आश्वलायनाचार्यांनीं सुचविलें आहे. आम्हाला वेदागाच्या मूलाचेंच यथावत् ज्ञान, मुख्यत करून द्यावयाचे असल्यामुळें, इतर शाखातील चर्चेला येथें फारसा अवसर देता येणार नाहीं 'स्विष्टकृत्' होम झाल्यानतर इध्मबन्धन अग्नींत टाकावे, असें आणखी इतरत्र विधान आहे. असो श्रौतसूत्रात **"सकृन्मन्त्रेण द्विस्तूष्णीम् सर्वत्रैवं कर्मावृत्तौ"** (श्रौ. १।३।२९) असे सूत्र आहे, त्या परिभाषेनेंच एकदा समत्रक व नतर दोनदा अमत्रक उत्पवन सिद्ध असल्यामुळे येथें 'उत्पुनाति त्रि' एवढेंच सूत्र केले असता भागलें असतें. तथापि येथें 'सकृन्मन्त्रेण द्विस्तूष्णीम्' हा भाग अधिक घालून या कृत्याव्यतिरिक्त प्रकृतगृह्य सूत्रात कर्माच्या आवृत्तीचे वेळी मत्राची आवृत्ति अवश्य आहे असें ज्ञापित केलें आहे 'पवित्राभ्यामाज्यस्योत्पवनम्' हें वेगळें सूत्र रचून वैतानिककृत्यातून अमत्रक असें आज्योत्पवन करावें, व गृह्यकृत्यात ह्या तिसऱ्या सूत्राप्रमाणें मत्रयुक्त उत्पवन करावें असें सागितलें आहे. ॥ ३ ॥

**कृताकृतमाज्यहोमेषु परिस्तरणम् ॥ ४ ॥**

ज्या होमात केवळ आज्यच हविर्द्रव्य असेल त्यात, परिस्तरणें घालावीं किंवा न घालावीं म्हणजे वैकल्पिक आहेत. 'अनादेशे आज्यं द्रव्यम्' म्हणजे ज्या होमविधानात होमद्रव्याचें नाव दिलें नसेल तेथें आज्य द्रव्य घ्यावें अशी श्रौतसूत्रात परिभाषा आहे, तिच्या नियमात हा परिस्तरणाचा

निकल्प मानू नये तर, 'चतस्र आज्याहुतीर्जुहुयात्' ( गृ० १।४।२ ) असें साक्षात् आज्यपद असेल तेथेंच मानावा नाहींतर 'अनादेशे आज्यम्' ह्या परिभाषेनें भागत असता 'आज्याहुती.' मधलें आज्यपद व्यर्थ होईल. सारांश ज्या निर्दिष्ट प्रत्यक्ष, आज्य असें पद असेल, तेथेंच परिस्तरणे घालल्यास न घालावीं. इतरत्र आज्यहोमात देखील घातलींच पाहिजेत. ॥ ४ ॥

**तथाज्यभागौ पाकयज्ञेषु ॥ ५ ॥**

त्याचप्रमाणें सर्वंच पाकयज्ञात पुढें ( गृ० १।१०।१३ ) विधान केलेले आज्यभाग, कृताकृत म्हणजे वैकल्पिक आहेत. ॥ ५ ॥

**ब्रह्मा च धन्वन्तरियज्ञशूल गववर्जम् ॥ ६ ॥**

येथें, तथा आणि पाकयज्ञेषु हीं दोन पदें वरून अनुवृत्त आहेत. आता सूत्रार्थ देतो. धन्वन्तरियज्ञ व शूलगव या दोन यज्ञाशिवाय इतर सर्व पाकयज्ञात ब्रह्मा--(ऋत्विग्विशेष) ही वैकल्पिकच आहे, त्या दोन यज्ञात मात्र अवश्य आहे. जेथें ब्रह्मा असेल, तेथें कर्त्यानें प्रणीतापात्र उचलण्यापूर्वी, त्याने हात व अगठे धुवून अग्नीच्या पूर्वबाजूनें जाऊन व तेथून दक्षिणेस ठेवलेल्या दर्भावर जाऊन, 'निरस्त परावसु' असें म्हणून तेथलें गवत, अगठा व अनामिकेमध्ये धरून नैऋत्यदिशेस टाकून आचमन करावें; नतर '**इदमहमर्वावसोः सदने सीदामि**' असे म्हणून त्या दर्भावर उत्तरेकडे तोंड करून बसावें. पुढें '**बृहस्पतिर्ब्रह्मा ब्रह्मसदन आशिष्यते बृहस्पते यज्ञं गोपाय**' ह्या मत्राचा जप करावा. नतर 'ब्रह्मन्नप प्रणेष्यामि' अशी होमकर्त्यानें सूचना दिली असता '**भूर्भुवः स्वः बृहस्पतिप्रसूतः**' असा मंत्र जपून '**ॐ प्रणय**'( ठीक आहे अप्प्रणयन कर) असें कर्त्यास उत्तर द्यावें. कर्माच्या शेवटीं प्रायश्चित्त-होम व संस्थाजप हीं ब्रह्म्याचींच कृत्ये असून त्यानें उत्तरेकडे तोंड

करून यज्ञाकडे नेहमीं सावधान चित्तानें पहात असावें; अर्थात् वैगुण्य होत असल्यास सुचवावें; एकंदरींत तृणनिरसन, उपवेशन, जप, प्रायश्चित्तहोम व संस्थाजपानें उपस्थान हीं पांचच मुख्यतः ब्रह्याचीं कृत्यें आहेत असें गृह्यपरिशिष्टांत सांगितलें आहे. ॥ ६ ॥

अमुष्मै स्वाहेति जुहुयात् ॥ ७ ॥

ह्या गृह्यसूत्रांत कोठेकोठे 'सावित्र्यै, ब्रह्मणे' वगैरे नामांनीं होम सांगितला आहे, व कोठे कोठे 'अग्ने नय सुपथा राये अस्मानिति चतसृभिः' वगैरे मंत्रांनीं होम सांगितला आहे. जेथें असे दोन्ही प्रकार नसून नुसतें 'प्राजापत्यस्य स्थालीपाकस्य हुत्वा' असें मोघम विधान असेल तेथें 'प्रजापतये स्वाहा' असें चतुर्थ्यन्त देवतानाम व पुढें स्वाहा (सुहुतमस्तु=चांगलें अर्पित असो) म्हणून होम करावा असें हें सूत्र सांगतें. ॥ ७ ॥

अग्निरिन्द्रः प्रजापतिर्विश्वेदेवा ब्रह्मेत्यनादेशे ॥ ८ ॥

ज्या चौलादिकृत्यांत 'नैके कांचन' (गृ० १-४-६) ह्या, पुढें येणाऱ्या पक्षाप्रमाणें होम सांगितला असून मंत्र मात्र दिला नसेल तेथें अग्नि, इंद्र, प्रजापति, विश्वेदेव व ब्रह्मा ह्या देवता घ्याव्या.–ह्यांना अनादेशदेवता किंवा अनुल्लेखाच्या वेळच्या देवता म्हणतात. दुसरे लोक ह्या सूत्राची अशी व्याख्या करतात कीं, ज्या जातकर्म वगैरे कृत्यांत इतर शाखांनीं होम सांगितला आहे तीं कृत्यें येथें असून मंत्र मात्र दिले नसतील तर त्यांत, ह्या देवता घ्याव्या. पहिल्या मताप्रमाणें अर्थात् जात-कर्म वगैरेंत होम नाहीं, व हाच पक्ष वृत्तिकारांना पसंत आहे. कारण वरच्या सूत्रांत मंत्रप्रकरण असल्यामुळें मंत्राचा अनादेश (अनुल्लेख) असतां हे मंत्र घ्यावे, हें म्हणणें होमानादेश असतां, ह्या व्याख्येपेक्षां सयुक्तिक आहे ॥ ८ ॥

**एकबर्हिरिध्माज्यस्विष्टकृतः स्युस्तुल्यकालाः ॥ ९ ॥**

एकाच वेळीं अनेक पाकयज्ञ करण्याचा प्रसंग आला असता, त्या सर्वांचे बर्हि, इध्म, आज्य, स्विष्टकृत् (होमविशेष) वगैरे सर्व तंत्र एकच करावें म्हणजे त्या उपांगाचा भेद करूं नये. उदाहरणार्थ, पार्वणस्थाली-पाकाचे वेळीं काम्यहोमाची इच्छा झाली असता त्यांना तुल्यकालत्व येईल किंवा आग्रयण व आश्वयुजी कर्म हीं दोन्ही अश्विनी पूर्णिमेस केलीं असता तीं एककालीन होतील ॥ ९ ॥

**तदेषाभियज्ञगाथा गीयते । पाकयज्ञान्समासाद्य एकाज्यानेकबर्हिषः । एकस्विष्टकृतः कुर्यान्नानापि सति दैवते इति ॥ १० ॥ ३ ॥**

वरच्या सूत्राला प्रमाणभूत अशी यज्ञसंबंधीं कारिका याज्ञिकांच्या म्हणण्यात येत असते कीं, भिन्न भिन्न देवता असणारेही अनेक पाकयज्ञ एकावेळीं प्राप्त झाले असता, त्यांचे आज्य, बर्हि व स्विष्टकृत् वगैरे तंत्र एकच करावें, प्रत्येक देवतेला तंत्रावृत्ति करूं नये असे, ही कारिकाही उपलक्षणानें सुचवीत आहे ही कारिका सूत्रकाराच्या पूर्वीपासून प्रसिद्ध असल्यानें त्यानें आपल्या म्हणण्यास प्रमाण म्हणून उल्लेखिली आहे येथे १ ल्या अध्यायातली ३ री कण्डिका संपली हींत एकदर सूत्रें १० आहेत. ॥ १० ॥ ॥ ३ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका ४ थी.

**उदगयन आपूर्यमाणपक्षे कल्याणे नक्षत्रे चौलकर्मोपनयनगोदानविवाहाः ॥ १ ॥**

चौलकर्म, उपनयन, गोदानाचा (केशान्त) संबंध असणारें समावर्तन (सोडमुंज) व विवाह हे संस्कार उत्तरायण, शुक्लपक्ष व ज्योति-

शास्त्रोक्त शुभनक्षत्र अशा कालावर करावें हा सूत्रात समावर्तन म्हणण्याऐवजीं गोदानपदाचें ग्रहण केलें आहे ते लाघवार्थ आहे ॥ १ ॥

## सार्वकालमेके विवाहम् ॥ २ ॥

काहीं आचार्य, विवाह हा संस्कार सर्व कालांत करावा त्याला उत्तरायण वगैरे अट नाहीं संकटकाळीं केवळ कालाच्या अडचणीकरितां विवाह लांबवू नये असाच ह्या आचार्यांचा मतलब आहे कारण 'ऋतुमत्या हि तिष्ठन्त्या दोष पितरमृच्छति'=मुलगी विवाहापूर्वी पितृगृहीं ऋतुयुक्त झाली असतां तिच्या बापाला भ्रूणहत्येचा दोष लागतो अशी स्मृति असून शिवाय उपवर झाल्यामुळें, दुसऱ्याही लौकिक भानगडींची भीति असते, म्हणून हा पक्ष दिला आहे शुभकालाचा संभव असतां ह्याप्रमाणें वागणें प्रशस्त नाहीं ॥ २ ॥

## तेषां पुरस्ताच्चतस्र आज्याहुतीर्जुहुयात् ॥ ३ ॥

त्या चौलादिक कर्मांमध्ये पुढच्या सूत्रात सांगितल्याप्रमाणें चार आज्याहुतींचा होम करावा, त्यात चतस्र (चार) हें संख्याकथन, होमाच्या प्रारंभीं फक्त चारच आहुती द्याव्या पुढ येणाऱ्या आज्यभाग नावाच्या आहुती देऊं नये असा नियम सांगण्याकरता आहे. पुरस्तापदानें होमाच्या पूर्वभागींच नियम केला त्यामुळें स्विष्टकृत् हा शेवटचा होम होतोच आज्यग्रहण, सूत्रांत असल्यामुळें १।३।४ सूत्राप्रमाणें, ह्या कृत्यांत परिस्तरणें वैकल्पिक आहेत ॥ ३ ॥

## अग्न आयूंषि पवस इति तिसृभिः, प्रजापते न त्वदेतान्यन्य इतिच, व्याहृतिभिर्वा ॥ ४ ॥

मागच्या सूत्रातल्या चार आहुती अशा 'अग्न आयूंषि पवसे' (ऋग्. ७ २ १०) ह्या ऋग्संहितेंतील तीन ऋचांनीं तीन व

'प्रजापते न त्व०' (ऋक्सं. ८-७-४-५) वगैरे मत्रानें चवथी अशा चार, किंवा 'भू: स्वाहा' 'भुव स्वाहा' 'स्व. स्वाहा' 'भूर्भुव: स्व: स्वाहा' अशा चार व्याहृतींनीं चार आहुती धाव्या. कारण श्रौतसूत्रात ह्या चौघीं-नाच व्याहृती अशी संज्ञा केली आहे. (श्रौतसू० १-११-१३ पहा) ॥ ४ ॥

## समुच्चयमेके ॥ ५ ॥

काहीं आचार्य, पहिल्या चार ऋगाहुती व दुसऱ्या चार व्याहृत्याहुती ह्याचा समुच्चय (समुदाय) करावा म्हणतात. म्हणून त्याच्यामते एकदर आठ आहुति होतात. ॥ ५ ॥

## नैके कांचन ॥ ६ ॥

दुसरे काहीं आचार्य ह्या आठपैकीं, कोणतीही आहुती देऊ नये म्हणतात. एथें काचनपदात किं हें सर्वनाम आहे व पूर्वोक्ताचाच संबध करणें हा सर्वनामाचा स्वभाव असल्यामुळे ह्या सूत्रानें फक्त पूर्वोक्त आठ आहुतींचा निषेध होतो. त्या पक्षीं 'अग्निरिन्द्र०' (१।३।८) वगैरे अनादेश-देवताना आहुती धाव्याच, हे मागे एकदा त्या सूत्रावर, आम्हीं लिहिलेंच आहे. ॥ ६ ॥

## त्वमर्यमा भवसि यत्कनीनामिति विवाहे चतुर्थीम् ॥ ७ ॥ ४ ॥

त्यापैकीं विवाहामध्ये 'त्वमर्यमा भवसि०' ह्या मत्रानें चवथी आहुती धावी, व पूर्वोक्त 'प्रजापते न त्वदे०' ही पाचवी करावी. हिने तिचा बाध करूं नये. कारण सख्यानिर्देशानें पूर्वविधीचा बाध करणें असेल तेथें, 'तृतीयाहुतिस्थाने महाव्रतम्' असें स्थानपद असतें. शिवाय समानजातीय-विधीचा समानजातीयानेच बाध होतो व तें समानजातित्व 'अथ सामिधेन्य. ता: सामिधेन्य.' अशासारखें 'तद' ह्या शब्दानें निर्दिष्ट असतें. 'त्वमर्यमा०' हा विधि तच्छब्दबोधित म्हणजे समानजातीय

नसल्यामुळे पूर्णाहुतीचा बाध न होता उत्कर्ष ( पुढें ढकलणें ) झाला. येथें चवथी कंडिका पूर्ण झाली हींत सात सूत्रें आहेत ॥ ७ ॥ ॥ ४ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका ५ वी.

**कुलमग्रे परीक्षेत ये मातृतः पितृतश्चेति यथोक्तं पुरस्तात् ॥ १ ॥**

येथें 'विवाहे' हें पद अनुवृत्त आहे. विवाह कर्तव्य असता प्रथमत वराच्या व वधूच्या कुळाची परीक्षा, पूर्वी श्रौतसूत्रात ऋत्विग्वरणाच्या प्रसगीं 'ये मातृत पितृतश्च०' (श्रौतसू० ९।३।२०) वगैरे वाक्यानें सागितल्याप्रमाणें, करावी. तें वाक्य देऊन त्याचा अर्थ लिहितो 'ये मातृत पितृतश्च दशपुरुष समनुष्ठिता विद्यातपोभ्या पुण्यैश्च कर्मभिर्येषामुभयतो नाब्राह्मण्यं निनयेयु पितृतश्चैके'= जे पुरुष आपल्या मातृवशात व पितृवशात, पूर्वीच्या दहापुरुषापर्यंत सुसपादित अशा विद्यातपानीं आणि पुण्यकर्मानीं ब्राह्मण्याच्या अनुवृत्तीनें युक्त असतील, अथवा काहींच्या मतानें निदान पितृपक्षतरी पूर्वक्त असेल त्यासच ऋत्विज् निवडावें येथेंही तीच परीक्षा लागू करावयाची असल्यामुळें वधूवरही अर्थात् अशा शुभकुळातले निवडावे. सूत्रातल्या कुल ह्या प्रतिष्ठाद्योतक पदानें दोन्ही वश महापातकादि दोषरहित, व क्षयापस्मारादि आनुवशिक रोगानीं रहित पाहिजेत असें सुचविलें आहे व 'अग्रे' (आधीं) ह्या पदानें वधूवरगुणापेक्षाही कुळाची मातब्बरी मोठी आहे असें सागितलें ॥ १ ॥

**बुद्धिमते कन्यां प्रयच्छेत् ॥ २ ॥**

शास्त्राशीं विरुद्ध नसणाऱ्या सुविचारांनीं युक्त ज्याची बुद्धि असेल अशा वराला आपली मुलगी द्यावी ज्ञान हाच वराचा मुख्य गुण सागितला ॥ २ ॥

**बुद्धिरूपशीललक्षणसंपन्नामरोगामुपयच्छेत ॥ ३ ॥**

सुबुद्धि, रूप, सच्छील व सामुद्रिकोक्त सुलक्षणें ह्यांनीं युक्त असून निरोगी अशा कन्येचा स्वीकार करावा. जेथें आपलें मन रमतें तेच रूप, एवढाच अर्थ रूपपदाने विवक्षित आहे. ॥ ३ ॥

**दुर्विज्ञेयानि लक्षणानीति ॥ ४ ॥**

खरोखर पाहातां शुभाशुभसूचक लक्षणें, कष्टानेही समजण्यास कठीण आहेत, त्यांकरितां पुढें लिहिल्याप्रमाणे परीक्षा करावी ॥ ४ ॥

**अष्टौ पिण्डान्कृत्वा, ऋतमग्रे प्रथमं जज्ञ ऋते सत्यं प्रतिष्ठितम्। यदियं कुमार्यभिजाता तदियमिह प्रतिपद्यतां यत्सत्यं तद्दृश्यतामिति पिण्डानभिमन्त्र्य कुमारीं ब्रूयादेषामेकं गृहाणेति ॥ ५ ॥**

पुढें सहाव्या सूत्रांत वर्णन केलेल्या 'क्षेत्र,गोष्ठ' वगैरे आठ स्थळांतील माती आणून त्यांचे निरनिराळे आठ गोळे करावे; नंतर 'ऋतमग्रे' पासून 'तद्दृश्यताम्' येथपर्यंत वर दिलेल्या सूत्रमंत्राने, त्या गोळ्याचें अभिमंत्रण करावें; ह्यानंतर कन्येला (वधू) बोलावून आणून, ह्या आठांपैकीं एक मातीचा गोळा उचल असे सांगावें ॥ ५ ॥

**क्षेत्राच्चेदुभयतः सस्याद्गृह्णीयादन्नवत्यस्याः प्रजा भविष्यतीति विद्याद्गोष्ठात्पशुमती, वेदिपुरीषाद्ब्रह्मवर्चस्विन्यविदासिनो ह्रदात्सर्वसंपन्ना देवनात्कितवी चतुष्पथाद् द्विप्रव्राजिनीरिणादधन्या श्मशानात्पतिघ्नी ॥ ६ ॥ ५ ॥**

ती मुलगी वर्षांतून दोनदा धान्य पिकणाऱ्या (दुपिकी) शेतांतून आणलेल्या मातीचा गोळा जर उचलील तर तिची प्रजा अन्नयुक्त म्हणजे धान्यादैश्वर्ययुक्त होईल असें समजावें. गोष्ठातील (गोठा) मातीचा गोळा उचलील तर तिची प्रजा गुराढोरानीं युक्त होईल. जुन्या यज्ञभूमींतील मातीचा गोळा उचलील तर तिची प्रजा ब्रह्मतेजानें युक्त (सुब्राह्मण्ययुक्त)

होईल कधींही न आटणाऱ्या (अग्निदासी) डोहातल्या मातीचा गोळा घेतल्यास, प्रजा सर्वसंपत्तीने संपन्न होईल जुगारीच्या अड्ड्यातल्या मातीचा गोळा उचलील तर तिची संतति लबाड किंवा जुगारी होईल असे समजावें. तसेंच ती कन्या चव्हाट्यावरच्या मातीचा गोळा उचलील तर ती स्वतः दोघांकडे जाणारी अर्थात् व्यभिचारिणी होईल असे समजावें. जेथे पेरलेलें उगवत नाहीं अशा (इरिणसंज्ञक) जागेंतून आणलेल्या मातीचा गोळा उचलल्यास ती मुलगी अधन्या म्हणजे दुःखी व दरिद्री होईल; आणि स्मशानातल्या मातीचा गोळा ती उचलील तर ती मुलगी पतीचा घात करणारी आहे असें जाणावें. पहिल्या पाच वाक्यात प्रजाची स्तुति निंदा करून, त्या मुलीचाच बरेवाईटपणा दाखविला आहे असे समजावें त्या सूत्रावरून पाहता, आश्वलायनाचार्यांच्या वेळीं शकुनशास्त्रावर बराच भरवसा असावा असें दिसते तसेंच मागें कल्याणे नक्षत्रे (१–४–१) आलें आहे त्यावरून मुहूर्ताची तिरही बरेंच परिणतावस्थेस आलें असावेंसें वाटतें तथापि या सूत्रात बारा राशि, सात वार, करणें व योग ह्यांचा उल्लेख नाहीं त्याचा उल्लेख आश्वलायनगृह्यपरिशिष्टाच्या अतीतसंस्कारादिप्रकरणात मात्र आढळतो तें परिशिष्ट, आश्वलायनशिष्यविरचितच असावेंसे वाटते गृह्यसूत्रकारास सुमारें दोन हजार वर्षें झाली असावीं असे आधुनिक शोधक विद्वानांचे मत आहे. परंतु हा शौनकाचा शिष्य असल्यामुळें व शौनक महाभारताचा श्रोता असल्यामुळें आश्वलायन, ह्यापेक्षाही कांहीं तरी प्राचीन असावासें वाटते. येथें ह्या पहिल्या अध्यायाची पांचवी कण्डिका संपली. हीमध्ये, एकंदर सूत्रें सहा झालीं ॥ ६ ॥ ॥ ५ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका ६ वी.

अलंकृत्य कन्यामुदकपूर्वां दद्यादेष ब्राह्मो विवाहः । तस्यां

जातो द्वादशावरान्द्वादश परान्पुनात्युभयतः । ऋत्विजे वितते कर्मणि दद्यादलंकृत्य स दैवो दशावरान्दश परान्पुनात्युभयतः । सहधर्मं चरत इति प्राजापत्योऽष्टावरानष्ट परान्पुनात्युभयतः । गोमिथुनं दत्त्वोपयच्छेत स आर्षः सप्तावरान्सप्तपरान्पुनात्युभयतः । मिथः समयं कृत्वोपयच्छेत स गान्धर्वः । धनेनोपतोष्योपयच्छेत स आसुरः । सुप्तानां प्रमत्तानां चापहरेत्स पैशाचः । हत्वा भित्त्वा च शीर्षाणि रुदतीं रुदद्भ्यो हरेत्स राक्षसः ॥ १ ॥ ॥ ६ ॥

ह्यात एकदर चाट असलेल्या विवाहाच्या आठ प्रकाराचे वर्णन करतात. ज्या विवाहात कन्यापिता वगैरे, कन्येला अलकारानीं भूषित करून तिचे कन्यादानसल्पाप्रमाणे, उदकासह वराला दान करतो त्याचे नाव ब्राह्म विवाह होय. अशा कन्येचे ठायीं उत्पन्न झालेला पुत्र, मातृवशस्थ व पितृवशस्थ अशा दोन्हीकडील आपल्या नतर उत्पन्न होणाऱ्या बारा पिढ्याना व पूर्वींच्या झालेल्या बारा पिढ्याना पवित्र करून त्याचा उद्धार करतो, म्हणजे एकदर २४ पुरुषाना पवित्र करतो. अग्नित्रयसाध्यक (वैतानिक) धर्मामध्ये ऋत्विज म्हणून निवडलेल्या पुरुषालाच सालकृत कन्या देणे ह्या प्रकाराला दैवविवाह म्हणतात. त्या मुलीचा पुत्र दोन्ही वशामधल्या, पुढच्या व पूर्वींच्या दहा दहा म्हणजे एकदर वीस पुरुषाना पवित्र करतो. ज्यात फक्त सहधर्माचरण करण्याकरता, कन्यादानच केले असून सालकृत नसते, व त्याप्रमाणें तीं वधूवरें बरोबर धर्माचरण करीत असतात त्या विवाहाचें नाव प्राजापत्य असून अशा वधूचा पुत्र दोन्हीकडील पुढल्या व पूर्वींच्या आठ आठ म्हणजे एकदर सोळा पुरुषाना पवित्र करतो कन्यादात्याला फक्त एक गाय देऊन वर वधूचा स्वीकार करतो, त्या प्रकाराला आर्ष विवाह म्हणतात. अशा मुलीचेठायीं उत्पन्न झालेला पुत्र दोन्ही वशातील पुढच्या व मागच्या सात सात पिढ्याना म्हणजे एकदर चौदा पिढ्याना उद्धरतो. तूं

माझी पत्नी हो व मी तुझा पती होतों, असा एकांतीं आपसांतच नवरा-बायकोचा (वधूवर) ठराव होऊन विवाह होतो त्यांचें नांव गांधर्वविवाह होय. येथपासून निकृष्ट विवाहांना सुरवात झाली. ह्यांना संतति वगैरे दृष्ट फळ असलें तरी पुरुषोद्धार वगैरे अदृष्ट फळ कांहीं नाहीं. कन्यादात्याला धनादिकानें संतुष्ट करून मुलगी वरणें (अथवा विकत घेणें) ह्याचें नांव आसुर विवाह होय.

कन्येचे संबंधी निजलेले असतां किंवा वेसावध असतां कन्येला चोरून नेऊन वरणें, ह्याचें नांव पैशाच विवाह आहे. हाणामारी करून व डोकीं फोडून रडत असलेल्या संबंधींच्यापासून रडत असलेल्या मुलीला हिरावून नेऊन वरणें ह्या प्रकाराचें नांव राक्षसविवाह आहे. ह्यांतील प्रकारांच्या मिश्रणानें आणखीही प्रकार होतील; उदाहरणार्थ पुराणस्थ रुक्मिणीच्या विवाहांत गांधर्व व राक्षस ह्यांचें मिश्रण आहे. तथापि मुख्य प्रकार आठच आहेत. ह्यापैकीं पहिल्या चारांत पूर्व पूर्व श्रेष्ठ असून शेवटच्या चार प्रकारांत पुढचे पुढचे अधिक वाईट आहेत. ह्या आठ प्रकारांपैकीं पहिले दोन ब्राह्मणांनाच विहित आहेत. कारण इतरांना प्रतिग्रहाचा अधिकार नाहीं. गान्धर्व व राक्षस हे क्षत्रियांस योग्य आहेत असें पुराणांवरून दिसतें. पैशाच्या संबंधामुळें आसुर विवाह वैश्यास युक्त आहे. इतर तीन प्रासंगिक असून त्यांविषयीं कांहीं जानिवार नियम नाहीं. येथें ह्या अध्यायांतील ६ वी कंडिका संपली. हींत फक्त १ च महासूत्र आहे. ॥ १ ॥ ६ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका ७ वी.

**अथ खल्वुच्चावचा जनपदधर्मा ग्रामधर्माश्च तान्विवाहेप्रतीयात् ॥ १ ॥**

येथें अथशब्द अधिकारार्थक असून त्याचा अर्थ; ह्यापुढें जें सांगूं तें

विवाहसंबंधीं आहे असें समजावें हा आहे. आम्ही जें सांगू त्याशिवाय आणखी जें कांहीं आपल्या देशाचे परंपरागतधर्म, ग्राम, नगर वगैरेंचे धर्म आणि अशाच सारखे कुळधर्म वगैरे असतील तेही सर्व विवाहविधींत करीत जावे. देश, ग्राम व कुळ ह्याचे धर्म सर्वत्र सारखे असणें शक्य नाहीं. ह्याकरितां हे स्वतंत्र विधान केलें आहे. ह्यामध्यें परंपरागत सदाचारालाही मान दिला आहे. कारण '**श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः। सम्यक्संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम् ॥ १ ॥** म्हणजे, वेद, स्मृति, परंपरागत सत्पुरुषांचा आचार, आपलें आवडतें आणि चांगल्या संकल्पापासून उत्पन्न झालेली कामना हीं धर्माचरणाचीं मूलें आहेत. असें याज्ञवल्क्यस्मृतींत स्पष्ट म्हटलें आहे. ह्या सूत्रांत तान् हें पद जास्ती घालून कुळधर्म वगैरेंचेंही ग्रहण सूचित केलें आहे. नाहींतर सूत्रांतलीं धर्मपदेंच द्वितीयान्त करून भागलें असतें. ॥ १ ॥

यत्तु समानं तद्वक्ष्यामः ॥ २ ॥

परंतु जीं कृत्यें सर्व देशाना अवश्य व सारखींच आहेत तीं ह्यापुढें सांगतो. नुसत्या कथनानेच भागत असता, हें स्वतंत्र सूत्र अधिक घालण्याचें प्रयोजन असें कीं, देशधर्म वगैरेंचा, पुढें सांगू त्या धर्मांशीं विरोध आला असता देशधर्मादिकाचा बाध करून पुढचे गृह्योक्त धर्मच पाळावे. उदाहरणार्थ, मैथिलदेशांत विवाहानंतर लागलीच **स्त्रीसमागमाची चाल दिसते;** परंतु ह्या शाखेत '**ब्रह्मचारिणौ त्रिरात्रम्**' ( गृ० १–९–११ ) असें विधान आहे, त्याला अनुसरून शास्त्रोक्तच पाळावें. येथे देशधर्माला जागा देऊं नये. ॥ २ ॥

**पश्चादग्नेर्दृषदमश्मानं प्रतिष्ठाप्योत्तरपुरस्तादुदकुम्भं, समन्वारब्धायां हुत्वा, तिष्ठन्प्रत्यङ्मुखः प्राङ्मुख्या आसीनाया,**

**गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तमित्यङ्गुष्ठमेव गृह्णीयाद्यदि कामयीत पुमांस एव मे पुत्रा जायेरन्निति ॥ ३ ॥**

अग्नीच्या पश्चिम बाजूला दगडी पाटा व वरवंटा ( हल्लीं सहाण ठेवतात ) ठेवावा व ईशान्य दिशेस पाण्यानें भरलेला कुंभ ठेवावा. नंतर घृतपात्राचें, अग्नीच्या पश्चिमेस पसरलेल्या दर्भावर स्थापन होईपर्यंतचें सर्व याज्ञिक करून, वधूनें आपल्या कृत्यास मागून सुरवात केली असतां म्हणजे हाताला उजवा हात लावला असतां, मागें दिल्याप्रमाणें 'अग्नआयूंषि' वगैरे पांच घृताहुति द्याव्या. ह्यानंतर वरानें, पश्चिमेकडे तोंड करून उभें राहून, आपल्या समोर पूर्वेकडे तोंड करून बसलेल्या वधूच्या उजव्या हाताचा फक्त आंगठाच; आपणांस पुत्र म्हणजे पुन्नामक नरकापासून तारणारे असे मुलगेच व्हावे अशी इच्छा असल्यास 'गृभ्णामि ते सौभ०' ( ऋक्सं. ८-३-२७-१ ) ही ऋचा म्हणून आपल्या उजव्या हातानें धरावा. होमाच्या वेळेस पत्नीनें दक्षिणेस व पतीनें उत्तरेस बसावें असें इतर शास्त्रांत आहे व हेंच समन्वारम्भणास ( हाताला हात लावण्यास ) सोईचें आहे. वधूचा उताणा हात वरानें आपल्या उताण्या किंवा उपड्या हातानें धरावा असेंही शास्त्रान्तरांत आहे. आतां सूत्रस्थ पदविशेषांचें कृत्य सांगतों. श्रौतसूत्रांत '**एवंभूतोऽव्यक्तहोमे**' असें सूत्र असून त्याचा अर्थ, जेथें वेगळें स्पष्ट विधान नसेल तेथें उभ्यानें होम करावा असें आहे. ह्यानें कार्यसिद्धि होत असतां 'तिष्ठन्' हें पद व्यर्थ येऊन त्यानें, श्रौतव्यतिरिक्त म्हणजे गृह्यकृत्यामध्यें बसून कर्में करीत जावीं असें ज्ञापन केलें आहे; त्या सामान्य ज्ञापकाप्रमाणें येथेंही बसून पाणिग्रहण होऊं लागेल त्याच्या निवृत्तीकरतां '**तिष्ठन्प्रत्यङ्मुखः**' असें विशेष विधान आहे. लोकांत मातीच्या पाट्याचाही संभव असल्यामुळें अश्मानं (दगडी) हें विशेषण लावलें आहे. त्याच्या शेजारीं वरवंटा (पुत्रक) मंगलकारक म्हणून ठेवावा, असें वृत्ति-

कार म्हणतात. वरच्या 'तिष्ठन्समिश्रम्' ह्या ज्ञापकाप्रमाणे वधूला बसणेंच प्राप्त झालें असता आसीनाया. (बसलेल्या) हे निरर्थक पद, ह्या पुढचे वधूचें कृत्य उभ्यानेच करावयाचे आहे, हे सुचविण्याकरता आहे. पुत्र-शब्द अपत्यवाचकही असल्यामुळें 'पुल्लिंगी अपत्ये (पोरें) हवीं असल्यास' असाही अर्थ करता येईल; परतु पहिल्या व्युत्पत्तीच्या अर्थाला (पुत्रविशेषणार्थक) खालील मनुस्मृति प्रमाण आहे.

**'पुन्नाम्नो नरकाद्यस्मात्पितरं त्रायते सुतः ॥ तस्मात्पुत्र इति प्रोक्तः स्वयमेव स्वयम्भुवा ॥ १ ॥' (मनु ९-१३८) ॥ ३ ॥**

**अङ्गुलीरेव स्त्रीकामः ॥ ४॥**

मुलीच व्हाव्या अशी इच्छा असल्यास अगठ्या शिवाय बाकीचीं चार बोटेंच धरावीं. कन्यादानफलाच्या इच्छेनें मुलींची इच्छा सभवते, तेव्हा हल्लींसारखा हुडा बोकाळला नसावेसें दिसते ॥ ४ ॥

**रोमान्ते हस्तं साङ्गुष्ठमुभयकामः ॥ ५॥**

मुलगे व मुली दोन्हीं हवी असल्यास मनगटानंतर लव उगवते त्याच्या अलीकडे अगठा व बोटें ह्या दोन्हीसह हात धरावा. हल्लीं हाच पक्ष सर्वत्र चालू आहे. ॥ ५॥

**प्रदक्षिणमग्निमुदकुम्भं च त्रिः परिणयञ्जपति । अमोऽहमस्मि, सा त्वं; सा त्वमस्यमोहं, द्यौरहं पृथिवी त्वं, सामाहमृक्त्वं; तावेह विवहावहै । प्रजां प्रजनयावहै संप्रियौ रोचिष्णू सुमनस्यमानौ जीवेव शरदः शतमिति ॥ ६ ॥**

नतर वराने वधूला, अग्नि व पूर्वोक्त उदकपूर्ण कुभ ह्याच्या सभोवतीं प्रदक्षिणेप्रमाणे उजवी घालीत तीनदा फिरवावी, व फिरवितांना प्रत्येक फेरीला 'अमोह' पासून 'शरद शतम्' पर्यंत असलेल्या सूत्रोक्त मत्राचा जप

करावा. ह्यांत उदकुंभ ह्या विशेष पात्राच्या ग्रहणानें इतर यज्ञपात्रांच्या भोंवतीं परिणयन (भोंवतीं फिरविणें) करूं नये असा अर्थ द्योतित केला आहे. दुसरे व्याख्याकार, ह्यानें फक्त पात्र्याभोंवतींच फिरवूं नये असें म्हणतात. हा पक्ष कुमारिलभट्टांना संमत आहे. ॥ ६ ॥

**परिणीय परिणीयाश्मानमारोहयति । इममश्मानमारोहाश्मेव त्वं स्थिरा भव। सहस्व पृतनायतोऽभितिष्ठ पृतन्यत इति ॥ ७ ॥**

प्रत्येक परिणयनाच्या शेवटीं, वरानें पश्चिमेस ठेवलेल्या पाट्यावर किंवा सहाणेवर, 'इममश्मानं' पासून 'पृतन्यतः' पर्यंत असलेला वरचा सूत्रोक्त मंत्र म्हणून, वधूला चढवावी, म्हणजे तिचे दोन्ही पाय वर ठेवून पूर्वाभिमुख उभी करावी, ह्याला विवाह म्हणतात ॥ ७ ॥

**वध्वञ्जलावुपस्तीर्य, भ्राता भ्रातृस्थानो वा द्विर्लाजानावपति ॥ ८ ॥**

प्रत्येक परिणयनानंतर, वरानें वधूच्या ओंजळीमध्यें आज्याचें उपस्तरण (सेचन) घालावें, व त्यावर तिच्या भावानें किंवा भावाच्या जागीं असलेल्या चुलतभाऊ, मामेभाऊ वगैरेनें, दोनदां थोडथोड्या लाह्या घालाव्या. ॥ ८ ॥

**त्रिर्जामदग्न्यानाम् ॥ ९ ॥**

जामदग्न्यगोत्रांतला म्हणजे पञ्चावत्ती वर असल्यास ह्या लाह्या तीनदां घालाव्या. ॥ ९ ॥

**प्रत्यभिघार्य हविः ॥ १० ॥**

नंतर वरानें सुपांतल्या शिल्लक राहिलेल्या लाह्यांवर तुपानें अभिघार (सेचन) करावा. ॥ १० ॥

**अवत्तं च ॥ ११ ॥**

त्याचप्रमाणें वधूच्या ओंजळींतील अवदानावर म्हणजे होमार्थ खंडित करून घेतलेल्या भागावरही अभिघार करावा. आठव्या सूत्रांत

भ्राता उपस्तीर्य; असें न म्हणता, उलटापालट केली आहे त्या अर्थी उपस्तरण व अभिघारण ह्याचा कर्ता भ्रातृभिन्न म्हणने वरच आहे हें सुचविनें आता समानकर्तृकयो पूर्वकाले (पाणिनि ३–४–२१) असें पाणिनीचें सूत्र असून त्याचा अर्थ, ज्या दोन धातूचा कर्ता एकच असेल त्यापैकीं पूर्वकालीन–क्रियार्थक धातूहून क्त्वा प्रत्यय होतो असा आहे ह्या क्त्वाच्याच जागीं समासात ल्यप् आदेश होतो एकदरीत ल्यबन्ताचा व पुढच्या मुख्य क्रियापदाचा कर्ता नेहमीं एक पाहिजे, परतु येथे तर उपस्तीर्य व प्रत्यभिघार्य ह्याचा कर्ता वर आणि आनयतीचा कर्ता भ्राता मानला आहे, हे कसे? ह्याचें उत्तर असे कीं, क्वचित्स्थलीं भिन्नकर्तृकत्व असताही फक्त धातु, पूर्वकालीन क्रियेचा वाचक असला म्हणने क्त्वा, ल्यप् होतात उदाहरणार्थ, '**आज्याहुतिं हुत्वा मुख्यं धनं दद्यात्**' येथे आहुतीचा कर्ता ब्रह्मा असून धनदानाचा कर्ता यजमान असतो अवत्त म्हणजे होमाकरता विभागून हातात घेतलेलें द्रव्य. उपस्तरण, लाह्या दोनदा, व प्रत्यभिघार अशीं सर्वाचीं चार अवत्तें होतात व जामदग्न्य तीनदा लाह्या घेतात असल्यामुळें त्याचीं पाच अवत्तें (अवदानें) प्रत्येक आहुतीला होतात, म्हणून त्याना पचावत्ति म्हणतात. ॥ ११ ॥

एषोऽवदानधर्मः ॥ १२ ॥

ह्या अवदानाचा धर्म सार्वत्रिक समजावा त्याचे अवयव, स्रुव्यात किंवा हातात प्रथम उपस्तरण, नतर दोनदा किंवा तीनदा (पचावत्ति पक्षीं) हविर्ग्रहण, हविःशेषाचा अभिघार, व अवदानाचा अभिघार, असे आहेत ॥ १२ ॥

**अर्यमणं नु देवं कन्या अग्निमयक्षत। सइमां देवो अर्यमा प्रेतो मुञ्चातु नामुतः स्वाहा। वरुणं नु देवं कन्या अग्निमयक्षत। सइमां**

**देवो वरुणः प्रेतो मुञ्चातु नामुतः स्वाहा ॥ पूषणं नु देवं कन्या अग्निमयक्षत । सइमां देवःपूषा प्रेतो मुञ्चातु नामुत. स्वाहेत्यविच्छिन्दत्यञ्जलिं स्रुचेव जुहुयात् ॥ १३ ॥**

असो, नंतर वरानें 'अर्यमण नु०' वगैरे एकेक स्वाहाकारान्त मंत्र म्हणावा व स्वाहाकार होताच आपली ओंजळ न मोडता, तींत धरलेल्या स्रुचेप्रमाणें (स्रुक्स्थानीं) असणाऱ्या वधूच्या ओंजळीनें त्या लाह्यांचा होम करावा. नंतर पुन्हा परिणयन, अश्मारोहण, उपस्तरण, लाजावाप वगैरे करून, दुसऱ्या मंत्रानें होम करावा व असेच तिसऱ्या मंत्राचे वेळेसही करावें. स्त्रियांना पत्नीवाचनादिकांप्रमाणें स्वतंत्र विधान असल्याशिवाय मंत्रोच्चाराचा अधिकार नाहीं; म्हणून व 'सइमां मुञ्चातु' (तो देव हिला येथें सोडून देवो) असा तिऱ्हाइतासारखा उल्लेख असल्यामुळें मंत्रपठन वरानेंच करावें असें ठरतें. आणि 'अविच्छिन्दती' हें स्त्रीलिंगी पद असल्यामुळें होम वधूनेंच करावा असें ठरतें. 'अध्वर्युर्जुहोति, होता वषट्करोति'=अध्वर्यु होम करतो व होता वषट् म्हणतो, वगैरे क्वचित् स्थलीं ह्याप्रमाणें, मंत्रपठनकर्ता व होमकर्ता भिन्न असूं शकतो ॥ १३ ॥

**अपरिणीय शूर्पपुटेनाभ्यात्मं तूष्णीं चतुर्थम् ॥ १४ ॥**

नंतर चवथ्या वेळीं परिणयन न करतां वरानें मनांत प्रजापतये स्वाहा असा मंत्र म्हणावा व वधूनें सुपाच्या कोपऱ्यानें आपल्याकडून होमपतन दिसेल अशा रीतीनें, शिल्लक राहिलेल्या लाह्यांची चवथी आहुति द्यावी. येथें पूर्वीची अनुवृत्ति नसतां 'अपरिणीय' (परिणयन न करतां) हें पद घातलें आहे त्याचा उद्देश प्रत्येक परिणयनाच्या वेळीं एकेक होम करावा हें सुचविणें [redacted] आहे. कोणाच्या मतें चवथें अर्थात परिणयन मागून करावें हें सुचविण्याकरितां 'अपरिणीय' हें पद आहे.

तूष्णीम् हें पद प्रजापतीचे स्मरण सुचविण्याकरिता आहे. कारण त्याचा होम अव्यक्त असतो. अनुक्रमानें संख्याज्ञान शक्य असता 'चतुर्थ' हे पद, ह्या लाजद्रव्याचा स्विष्टकृद्धोम नाहीं व पहिल्या तीन आहुतींप्रमाणें हिचाही होमकर्ता वधूच आहे हे सुचविण्याकरिता घातलें आहे. ॥ १४ ॥

**ओप्योप्य हैके लाजान्परिणयन्ति तथोत्तमे आहुती न सन्निपततः ॥ १५ ॥**

ओप्य+ओप्य येथें पाणिनीच्या 'ओमाङोश्च' ह्या सूत्रानें पररूप झाले आहे म्हणून ओप्योप्य अशी वृद्धि झाली नाहीं. तसेच उत्तमे आहुती येथे 'ईदूदेद्द्विवचन प्रगृह्यम्' ह्या सूत्रानें उत्तमे ह्या पदाला प्रगृह्य-संज्ञा झाल्यामुळें 'प्लुतप्रगृह्या अचिनित्यम्' ह्या सूत्राप्रमाणे प्रकृतिभाव (संधीचा अभाव) झाला आहे. पाणिनीय सूत्राचे अर्थ, पुढें अष्टाध्यायीच्या व्याख्यानात देणार आहोंत. येथें सूत्रकार होमाविषयीं दुसरा पक्ष सांगून 'ह' ह्या अक्षरानें त्याची प्रसिद्धि व स्वमत मान्यता सुचवीत आहेत. आता सूत्रार्थ देतो. कित्येक दुसरे आचार्य, प्रथम लाह्याचा होम करकरून नतर परिणयन करतात. ह्यापक्षीं चालाच्या सूत्रातल्या अपरिणीय पक्षाप्रमाणे ३ री व चवथी आहुती लागोपाठ पडत नाहीं तर मध्ये, परिणयन घडतें. 'उत्तमे आहुती न सन्निपतन' हीं पदें आद्यपक्षीं व चतुर्थ असल्याने परिणयन मानणाराच्या पक्षींही तिसऱ्या व चवथ्या किंवा कोणत्याही आहुतीमध्ये परिणयन यावें; त्या लागोपाठ पाडू नयेत हें सुचविण्याकरिता आहे.॥ १५ ॥

**अथास्यै शिखे विमुञ्चति यदि कृते भवतः ॥ १६ ॥**

नतर लागलीच वर, देशधर्माप्रमाणें वधूचे केश दोन्ही बाजूला बाधले असतील तर ते सोडून टाकतो. येथें अथ (लागलीच) ह्या पदानें येथून स्विष्टकृताची निवृत्ति केली. ॥ १६ ॥

**ऊर्णास्तुके केशपक्षयोर्बद्धे भवतः। प्रत्वा मुञ्चामि वरुणस्य पाशादिति ॥ १७ ॥**

केशमोक्षणाचा संभव कसा हें आश्वलायनाचार्य स्वतःच सांगतात. कोठें कोठें लोकरीचे दोर ( अगरळ ) दोन्ही बाजूंच्या केसांना वेगवेगळे बांधलेले असतात. असो, त्यांपैकीं दक्षिण बाजूचें म्हणजे उजवीकडचें केसांचें बंधन 'प्रत्वा मुञ्चामि०' (ऋक्सं. ८-३-२४) हा मंत्र म्हणून सोडावें ॥ १७ ॥

**उत्तरामुत्तरया ॥ १८ ॥**

'प्रेतो मुञ्चामि' ह्या तिच्या पुढच्या ऋचेनें डावीकडचें केशबंधन सोडावें ॥ १८ ॥

**अथैनामपराजितायां दिशि सप्तपदान्यभ्युत्क्रामयतीष एकपदूर्जे द्विपदी रायस्पोषाय त्रिपदी मायोभव्याय चतुष्पदी प्रजाभ्यः पञ्चपदृतुभ्यः षट्पदी सखा सप्तपदी भव सा मामनुव्रता भव। पुत्रान्विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टयइति ॥ १९ ॥**

नंतर वर लागलीच वधूला, प्रत्येक पावलाला एकेक वर दिलेला मंत्र म्हणत, ईशान्य दिशेकडे सात पावलें बरोबर चालवीत नेतो. ह्या कृत्याला सप्तपदी म्हणत असून त्यानंतर झालेलें लग्न बदलणार नाहीं असें इतर स्मृतींत म्हटलेलें आहे. या सूत्रांत 'इष एकपदी' वगैरे सात पदांत यासंबंधी क्रियापदाविषयी मतभेद असल्यामुळें, व ऋग्वेदाप्रमाणेच दुसऱ्या ऐतरेय वगैरेंच्या सूत्रांतून 'सखादि सर्वत्र समानम्' असें म्हटलें असल्यामुळें, 'भव मा मामनु०' वगैरे 'जरदष्टय' पर्यंतचा मंत्रांश प्रत्येक मंत्रास जोडावा. उदाहरणार्थ एक पूर्ण मंत्र देतों. 'इष एकपदी भव सा मामनुव्रता भव। पुत्रान्विन्दावहै बहूंस्ते सन्तु जरदष्टय' ॥ १९ ॥

**उभयोः सन्निधाय शिरसी उदकुम्भेनावसिच्य ॥ २० ॥**

सातवें पाऊल चालल्यावर तेथेंच आपलें व वधूचें मस्तक एकमेकाला जोडून कोणाकडून तरी तो पूर्वोक्त उदककुम्भ आणून त्यांतल्या पाण्यानें दोघांच्याही मस्तकावर सेचन (शिंपडणें) करावें त्यानंतर आज्यानें स्विष्टकृत् करून हा चालू विवाहहोम संपवावा ॥ २० ॥

**ब्राह्मण्याश्च वृद्धाया जीवपत्न्या जीवप्रजाया अगार एतां रात्रिं वसेत् ॥ २१ ॥**

विवाहाच्या दिवशींच दुसऱ्या गावास जातांना वाटेंत कोठें मुक्काम करण्याचा प्रसंग आल्यास त्या पहिल्या रात्रीं, वधूवरानीं, जिचा नवरा व मुलें जिवंत आहेत अशा वृद्ध ब्राह्मणीच्या घरीं रहावें. गांवांतल्या गांवांत लग्न असल्यास हा विधि नाहीं ॥ २१ ॥

**ध्रुवमरुन्धतीं सप्तऋषीनिति दृष्ट्वा वाचं विसृजेत जीवपत्नी प्रजां विन्देयेति ॥ २२ ॥**

विवाहहोमापासून वधूनें मौन धरावें, तें रात्रीं ध्रुव, अरुंधती व सप्तऋषि ह्याच्या ताऱ्याचें दर्शन करून 'जीवपत्नी प्रजां विन्देय' (मी सौभाग्यवती राहो, व सुप्रजा मिळवो) असें म्हणून नंतर सोडावें. येथें ह्या पहिल्या अध्यायाची सातवी कंडिका पूर्ण झाली. हीमध्यें लहान मोठीं मिळून बावीस सूत्रें आहेत ॥ २२ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय १ ला—कंडिका ८ वी.

**प्रयाणे उपपद्यमाने पूषा त्वेतो नयतु हस्तगृह्येति यानमारोहयेत् ॥१॥**

विवाहहोमानंतर घरीं जावयाचें परंतु आपलें घर दूरच्या गांवीं असल्यामुळें वाहनांतून जाण्याचा प्रसंग आला तर वरानें, 'पूषा त्वेतो नयतु'

ही ऋचा ( ऋक्स० ८ ३ २५-१ ) म्हणून वधूला घोडा, हत्ती वगैरे वाहनावर बसवावी पालखी वगैरे निर्भय साधनातून नेणे असल्यास मंत्रपाठ नको असे वृत्तिकार गार्ग्यनारायण म्हणतात गावातल्या गावातही हा विधि नाहीं ॥ १ ॥

अश्मन्वती रीयते संरभध्वमित्यर्धर्चेन नावमारोहयेत् ॥ २ ॥

जर प्रवासात नदी लागून नावेत बसावे लागले तर, वराने, ' अश्मन्वतीरीयते०' ( ऋक्स० ८–१–१४–३ ) वगैरे अर्ध्या ऋचेने ( म्हणजे ती म्हणून ) वधूला नावेत बसवावी. ॥ २ ॥

उत्तरेणोत्क्रमयेत् ॥ ३ ॥

व ' अत्राजहाम०' वगैरे तिच्याच उत्तरार्धाने नावेतून उतरवून पाण्याबाहेर न्यावी. ह्या सर्व ऋचा ऋग्वेदसंहितेत पहाव्या ॥ ३ ॥

जीवं रुदन्तीति रुदत्याम् ॥ ४ ॥

वधू पतिगृहीं जाताना मातादिकांच्या वियोगानें रडू लागेल तर 'जीवं रुदन्ति०' ( ऋक्स ७-८ १९-५ ) हा मंत्र म्हणावा हें विधान गावातल्या गावात जाणें असताही करावे. कारण रडण्याचा आहे ॥ ४ ॥

विवाहाग्निमग्रतोऽजस्रं नयन्ति ॥ ५ ॥

आपल्या घरीं जाईपर्यंत, विवाहाग्नि सारखा ( न विझलेला ) वधूवराच्यापुढें न्यावा अर्थात् फार दूरचें प्रयाण असल्यास अग्निसमारोपण करून न्यावा असे दिसतें हाही विधि एका गावात चालेल. हल्ली प्राय सर्वत्र समारोपण करूनच अग्नि नेत असतात समारोपण म्हणजे समिधेंत किंवा स्वशरीरात मंत्रानें अग्निस्थापना करणे होय ॥ ५ ॥

कल्याणेषु देशवृक्षचतुष्पथेषु मा विदन्परिपन्थिन इति जपेत् ॥ ६ ॥

जाताना विवाहादि मंगलयुक्त देश, वृक्ष किंवा चवाठे यांचें दर्शन

झाल्यास तेथें तेथें, 'माविदन्परिपन्थिन' (ऋक्स० ८-३-२६-२) हा मंत्र म्हणावा. ॥ ६ ॥

**वासे वासे सुमङ्गलीरियं वधूरितीक्षकानीक्षेत ॥ ७ ॥**

प्रत्येक मुक्कामाला कोणी प्रेक्षक, नवरा नवरींना पहाण्याकरिता येतील त्याची भेट, 'सुमङ्गलीरिय०' (ऋक्सं. ८-३-२६) हा मंत्र म्हणून नंतर घ्यावी. रस्त्यात प्रेक्षक भेटल्यास मंत्रपठन नको. ॥ ७ ॥

**इह प्रियं प्रजया ते समृध्यतामिति गृहं प्रवेशयेत् ॥ ८ ॥**

वराने, 'इह प्रिय प्रजया०' (ऋक्स. ८ ३-२५) हा मंत्र म्हणून वधूला आपल्या घरात प्रविष्ट करावी. येथपासून पुढचे विधि गावातल्या गावात गृहप्रवेश असताही चालतील. ॥ ८ ॥

**विवाहाग्निमुपसमाधाय पश्चादस्यानडुहं चर्मास्तीर्य प्राग्ग्रीवमुत्तरलोम, तस्मिन्नुपविष्टायां समन्वारब्धायाम्। आ नः प्रजां जनयतु प्रजापतिरिति चतसृभिः प्रत्यृचं हुत्वा, समञ्जन्तु विश्वेदेवा इति दध्नः प्राश्य, प्रतिप्रयच्छेदाज्यशेषेण वानक्ति हृदये ॥ ९ ॥**

नंतर आपल्या घरीं गेलेल्या वरानें अग्निप्रणयनापर्यंत कृत्य झाल्यावर त्या पूर्वोक्त विवाहाग्नीला प्रज्वलित करून त्याच्या पश्चिमेस बैलाचें कातडें पूर्वेकडे गळा व वर केंस असें पसरून त्यावर वधूस बसवावी. नंतर तिनें आपल्या हातास हात लावून (अन्वारम्भणकरून) होमकृत्यास दुजोरा दिला असता, 'आन. प्रजा जनयतु०' (ऋक्सं० ८-३-२८ .) वगैरे चार स्वाहान्त मंत्रानीं चार आज्याहुति द्याव्या. नंतर 'समञ्जन्तु विश्वेदेवा ०' (स. ८-३-२८) हा मंत्र म्हणून आपण थोडें दहीं पिऊन शिल्लक राहिलेलें पत्नीस पिण्यास द्यावें व तें तिनें अमंत्रकच प्यावें. कारण ह्यांत 'नौ' (आम्हा दोघास) असें द्विवचन असल्यानें एकदा उच्चारलेला मंत्र दोघाच्या दधि-

प्राशनास चालेल, त्याची आवृत्ति नको. हें दधिप्राशन करावें किंवा तोच मंत्र म्हणून घृतशेषानें, दोघांच्या हृदयास विलेपन करावें. येथें 'हृदये' हें एकारांत द्विवचन आहे. त्याला १।७।१५ ह्या सूत्राच्या व्याख्यानांत लिहिलेल्या 'ईदूदेद्द्विवचनं०' ह्या पाणिनीय सूत्राप्रमाणें प्रगृह्यसंज्ञा असल्यामुळें पुढच्या अतऊर्ध्वं ह्या पदाशीं संधि करूं नये. मागून विवाहाग्नीचें प्रकरण असूनही येथें 'विवाहाग्निम्' हीं अक्षरें पुन्हां घालण्याचें कारण, दायविभागकालीं ज्यानें पृथक् अग्निग्रहण केलें असेल त्याच्या अग्नीवर हा होम होऊं नये, हें आहे. शिवाय त्या पदानें विवाहाग्नीला केवळ विवाहहोमानें गृह्यत्व येत नाहीं, तर हा गृहप्रवेशनीय होम केल्यानंतरच गृह्यत्व येतें, हेंही सूचित केलें. त्यामुळें ह्या गृहप्रवेशनीयापूर्वीं दर्शपूर्णमास आले असतांही पार्वण स्थालीपाक होत नाहीं. **पाणिग्रहणादि गृह्यं परिचरेत्** (१।९।१) ह्या विशेष वचनानें नित्यपरिचरणहोम मात्र होतो. तसाच वैश्वदेवही करावा. कारण त्याला विशेष अग्नि लागत नाहीं. असो एकंदरींत ह्या अग्नीचा नाश झाला असतां हे दोन्ही होम (विवाहहोम व गृहप्रवेशनीयहोम) केले पाहिजेत हें सिद्ध झालें. 'उपसमाधाय' (प्रज्वलित करून) हें अर्थात् सिद्ध असतां देण्याचें कारण येथें प्रज्वलन व होम एककर्तृकच पाहिजेत. जेथें असें पद नसेल तेथें दुसऱ्यानें उपसमाधान (प्रज्वलन) केल्यास चालेल. 'तस्मिन्' (त्यावर) ह्याचा अर्थही प्रकरणसिद्ध असतां तें पद घालण्याचें कारण, चर्म पसरल्यानंतर इतर तंत्र करावें असें सुचविणें होय. 'ऋगन्ते होमः' म्हणजे होम, मंत्र संपल्यावरोवर स्वाहा म्हणत असतांच करावा हें सुचविण्याकरितां 'प्रत्यृचं' हें जास्त पद घातलें आहे. त्यामुळें जेथें प्रत्यृचग्रहण नसेल तेथें स्वाहा म्हणून नंतर होम करावा असें ज्ञापित झालें. तसेंच पूर्वीं आज्यद्रव्य न सांगतां शेवटीं एकदम ठल्याप्रमाणेंच 'आज्यशेषेण

चानक्ति' असे म्हणून सूत्रकारानें, जेथे हविर्द्रव्याचा उपदेश नसेल तेथें आज्य घ्यावें; म्हणजे 'अनादेशे द्रव्यमाज्यम्' असें सूचित केलें आहे. हें शेवटचें ज्ञापक मागे दुसऱ्या कण्डिकेत आम्ही प्रसगाने सागितलेंच आहे. ॥ ९ ॥

अतऊर्ध्वमक्षारालवणाशिनौ ब्रह्मचारिणावलंकुर्वाणावधःशायिनौ स्याताम् ॥ १० ॥

विवाहापासून वधू आणि वर दोघांनींही, क्षाररहित व अळणी असें अन्न खावें, ब्रह्मचर्यव्रतस्थ असावें, अलंकार धारण करावे, आणि भूमीवर निजावें, ( पलंगावर नाहीं ) असें व्रत पाळावें. आम्हीं, प्रथम अध्यापनाच्या वेळेस, सवृत्तिक गृह्यसूत्राच्या एकंदर सहा पोथ्या मिळविल्या होत्या; त्यापैकीं कांहींच्या मूळांत, ह्या सूत्राच्या आरंभीं 'अतऊर्ध्वम्' हीं पदें नाहींत, परंतु ह्या ( दहाव्या ) मागच्या सूत्रावरील वृत्तिग्रंथ पाहता ह्याच पाठ वृत्तिकाराचे वेळीं चालू होता असें दिसते. वृत्तिग्रंथ कुमारिलभट्टाच्याही ( सातवें शतक ) पूर्वीचा आहे; म्हणून आम्ही ह्याच पाठ कायम केला. 'हैडिम्बिका राजमाषा माषा मुद्गमसूरिकाः । लङ्क्याढक्याश्च निष्पावास्तिलाद्याः क्षारसंज्ञिताः ॥' म्हणजे, हैडिंबिक (मटकी,) चवळी, उडीद, मूग, मसूर, लाक, तूर, पावटे आणि तीळ वगैरे धान्यें क्षारसंज्ञक होत असें वृत्तीच्या कांहीं पोथ्यांतून लिहिलें आहे. सारांश वातडें, वातूळ, द्विदल व उत्तेजक पदार्थ खाऊं नयेत. व्रतोपयोगी हलकें व शुद्ध असें अन्न खावें असें ठरतें. ह्या व पुढच्या सूत्रामध्यें योगविभाग ( सूत्रभेद ) केल्यामुळें हें व्रत गृहप्रवेशनीयहोमापूर्वी, विवाहापासूनही पाळावें असें सूचित केलें आहे. ॥ १० ॥

अतऊर्ध्वं त्रिरात्रं द्वादशरात्रम् ॥ ११ ॥

मागच्या सूत्रांत ह्या व्रताची पूर्वमर्यादा, विवाहारंभ ही सांगितली. ह्या सूत्राने पुढची मर्यादा सांगतात. हें विवाहांगव्रत, ह्या गृहप्रवेशनीय होमानतर तीन दिवस किंवा शक्य असल्यास बारा दिवस पाळावें. येथे रात्रि हा शब्द दिवसाचा उपलक्षक आहे ॥ ११ ॥

**संवत्सरं वैक ऋषिर्जायत इति ॥ १२ ॥**

किंवा सामर्थ्य असल्यास एक वर्षभर हें विवाहव्रत पाळावें. ह्याने त्या दंपत्याला एक ऋषितुल्य पुत्र होतो. परंतु दुसरे व्याख्याकार म्हणतात, त्याप्रमाणें शक्य त्या मुदतीपर्यंत व्रत पाळल्यानंतर वधू आपलें पितृगोत्र सोडून पतिगोत्रांत येते म्हणजे दोघांचा एक ऋषि होतो, असा अर्थ आहे. हाच पक्ष खरा दिसतो. व्रतपालनाच्या उत्तरोत्तर मुदतींत अर्थात् पुण्याधिक्य आहे. ह्या विवाहप्रकरणांतील 'प्रजां प्रजनयावहै' 'ब्रह्मचारिणी' 'प्रजां जनयतु' वगैरे सूत्रस्थ व मंत्रस्थ पदांवरून सूत्रकाळीं जननयोग्य अशा तरुणींचेच विवाह चालू असावे असें अनुमान कांहीं विद्वान् काढीत असतात, परंतु हे विधी आठही प्रकारच्या विवाहांना व त्रैवर्णिकांनाही समान असल्यानें ह्यावरून सरसहा ब्राह्मणांस देखील, असा नियम काढणें युक्त होणार नाहीं. **'अष्टवर्षा भवेत्कन्या नववर्षा तु रोहिणी, दशवर्षा भवेद्गौरी अत ऊर्ध्वं रजस्वला ॥'** वगैरे स्मृत्यंतराचाही विचार केला पाहिजे. शिवाय ब्रह्मचर्य म्हणजे श्रवण, कीर्तन, प्रेक्षण वगैरे अष्टविध मैथुनांचा अभाव असतो. केवळ संभोगाचाच अभाव नसतो. ह्या सर्व प्रकरणांत तरुणी-बोधक एकही पद नसून कन्या, कुमारी, वधू असे बाल्यबोधक शब्द आहेत; व चढवावी, बसवावी, उतरवावी, चालवावी असे असामर्थ्यसूचक शब्द आहेत. तसेच रडूं लागली असतां, असाही बाल्याचा खासा उल्लेख एके ठिकाणी आहे. पाणिग्रहणाचा मुख्य पारमार्थिक उद्देश, 'मह्यं त्वादुर्गार्हप-

त्याय देवा ' हे कन्ये ! भग वगैरे देव, गृहपति जो अग्नि त्याच्या परिचर्येला व गार्हस्थ्याला उपयोगी पडावीस म्हणून मला तुझें दान करते झाले ' असा, पाणिग्रहणाच्या मंत्रात स्पष्ट सांगितला आहे. 'पाणिग्रहणादि गृह्यं परिचरेत्' ( गृ० १।९।१ ) ह्या विवाहानंतर लागलीच येणाऱ्या विधीवरूनही हीच गोष्ट ठरते. आता विवाहाचें लौकिक फळ 'रतिपुत्रफला दारा ह्मणजे कामभोग व संतति हीं स्त्रीचीं फळें आहेत' असे असल्यामुळें भावी पत्नीला अनुलक्षून 'प्रजाजनयतु' वगैरे उल्लेखही बाधक नाहींत. नुसत्या स्वमतानुकूल अशा थोड्याशा शब्दावर तर्कट रचून सत्यापलाप करणे बरें नाहीं हें सुचविण्याकरिता हें थोडेसें विषयांतर केलें आहे. आचार्यांनीं, कन्यादानाची प्रशंसा करून कन्यापित्याच्या जबाबदारीला महत्त्व दिलें आहे, व स्वयंवरादिकांना ( गांधर्व ) अधम कोटींत ढकलले आहे हें मागें गेलेल्या सहाव्या कंडिकेवरून समजून येईलच. ॥ १२ ॥

चरितव्रतःसूर्याविदे वधूवस्त्रं दद्यात् ॥ १३ ॥

ह्याप्रमाणें व्रतपालन केल्यानंतर वरानें विवाहकालीं नेसलेलें वधूचें वस्त्र ( अष्टपुत्री ), सूर्यानामक आचार्यैनें पाहिलेला मंत्र, स्वर, वर्ण व अर्थ यासह जाणणाऱ्या ब्राह्मणाला द्यावें. तो मंत्र म्हणजे 'सत्येनोत्तभिता' ( ऋक्सं० ८–३–२० ) हें सूक्त होय ॥ १३ ॥

अन्नं ब्राह्मणेभ्यः ॥ १४ ॥

आणि ब्राह्मणाना अन्नदान करावें. ह्या सूत्रात वरून 'दद्यात्' ( द्यावें ) ह्या पदाची अनुवृत्ति करावी ॥ १४ ॥

अथ स्वस्त्ययनं वाचयीत ॥ १५ ॥

नंतर समन्त्र्य व प्राङ्मुख अशा ( गृह्यपरिशिष्ट पहा ) ब्राह्मणाकडून स्वस्त्ययन बोलवावें. ह्या विधि असा. वरानें ब्राह्मणाना 'ॐ स्वस्ति भवन्तो

ब्रुवन्तु[1] ( अहो माझें कल्याण असो असें आपण म्हणा ) असें म्हणावें व नंतर ब्राह्मणांनीं ॐ स्वस्ति ( होय तुझें कल्याण असो ) असा आशीर्वाद द्यावा येथें ८ वी कंडिका संपली. हीमध्ये १५ सूत्रें आहेत. ॥ १५ ॥ ॥ ८ ॥

## अध्याय १ ला—कंडिका ९ वी.

**पाणिग्रहणादि गृह्यं परिचरेत्स्वयं पत्न्यपि वा पुत्रःकुमार्यन्तेवासी वा ॥ १ ॥**

पाणिग्रहण झालेल्या दिवशीं सायंकाळीं प्रारंभ करून दररोज सायंकाळीं व सकाळीं, पूर्वोक्त गृह्याग्नीची, पुढें दिल्याप्रमाणे स्वतः उपासना करावी; किंवा स्वतः न साधल्यास पत्नी, मुलगा, मुलगी अथवा शिष्य ह्यापैकीं कोणाकडून तरी करवावी. ह्या विशेष वचनावरून पत्नी व कुमारी ह्या स्त्रिया असल्यातरी त्यांनीं होमासुद्धा कृत्य करावें असे दिसतें. दुसरे काहीं लोक त्यांनी फक्त प्रादुष्करण ( प्रज्वलन ) मात्र करावें असें म्हणतात ॥ १ ॥

**नित्यानुगृहीतं स्यात् ॥ २ ॥**

हें अग्न गृहस्थानें नित्य धारण केलें पाहिजे, म्हणजे नित्याग्नि कदाचित् नष्ट झाल्यास त्याचें प्रायश्चित्त व पुनःस्थापन करून होम अखंड चालू ठेवावा तसेंच आपण किंवा पत्नी दोहोंपैकीं एक कोणीतरी अग्निसंनिध जरूर अखंड उपस्थित पाहिजे. आणखी नित्यपदानें स्थण्डिलोपलेपनादि होमधर्मांची निवृत्ति केली ॥ २ ॥

**यदि तूपशाम्येत्पत्न्युपवसेदित्येके ॥ ३ ॥**

जर प्रज्वलनाच्या वेळीं अग्नि विझला तर दुसऱ्या होमाच्या वेळेपर्यंत पत्नीनें उपवास करावा असें काहीं ( एक ) आचार्य म्हणतात. एके दा

पदानें, यजमानानेंच उपास करावा, किंवा 'अयाश्चाग्ने०' ह्या मंत्रानें, शास्त्रांतरांत सांगितल्याप्रमाणें एक आज्याहुति प्रायश्चित्त म्हणून द्यावी असें सूचित केलें आहे. वारंवार अग्नि गेल्यास पहिल्या उपासाची शिक्षा अमलांत आणीत असतील!! दुसरे कांहीं लोक वरच्या दुसऱ्या सूत्राचा अर्थ वेगळा करतात तो असा, त्याने, दायभागकालीं अग्नि घेतला असून तो नष्ट झाला असेल किंवा बारा दिवस होमावाचून राहिला असेल, त्यानेंही पूर्वोक्त प्रकारानें पुनःसंधान करून होम चालू ठेवावा. त्याच्यापक्षीं, पत्नी केल्यावर पुनःसंधान असल्यास विवाहाज्याहुति, लाजाहुति, गृहप्रवेशनीयाज्याहुति व हृदयाञ्जन (घृतलेपन) एवढींच कर्में होतात व दोन्हीं होम एकतंत्रानें करावे. बाकीचीं कन्यासंस्कार-रूपकर्में करूं नये. ह्यांत लाजावाप पतीनेंच करावा. हा पक्ष हल्लीं कोठेंही चालू नाहीं. त्याचप्रमाणें दायविभागकालीं, अग्निग्रहणाचा प्रयोग ग्रंथांतरीं शोधावा असें वृत्तींत म्हटलें आहे. ॥ ३ ॥

तस्याग्निहोत्रेण ॥ ४ ॥

त्या परिचरणाचें विधान, श्रौतसूत्रांतल्या अग्निहोत्रविधीवरून जाणावें. ह्या सूत्रानें पान्यज्ञतंत्र त्याला लावूं नये असें सुचविलें. ह्या सूत्राप्रमाणें प्राशनादिक विधिही ह्यांत येऊं लागले, त्याच्या निवृत्तिकरितां पुढील विशेष कृत्यें सुचविणारीं सूत्रें आहेत. ॥ ४ ॥

प्रादुष्करणहोमकालौ व्याख्यातौ ॥ ५ ॥

अग्निहोत्रप्रकरणानेंच, गृह्यपरिचरणाचे प्रादुष्करण (प्रज्वलन) व होम ह्याचे काल व्याख्यात होऊन गेले. म्हणजे ह्याचेही ते काल, अग्निहोत्राप्रमाणें जाणावे. दिवसाच्या तीस घटकांत प्रात, संगव, मध्याह्न, अपराह्न, व सायाह्न असे सहा सहा घटकांचे पांच विभाग केले असून, सूर्यास्तापूर्वीची दीड घटका व नंतरची दीड घटका ह्याला प्रदोषकाळ

म्हणतात. सायंहोमपक्षीं, अपराह्णकालीं प्रादुष्करण करून प्रदोष संपे-पर्यंत केव्हां तरी होम करावा; व प्रातर्होमपक्षीं पहांटे प्रादुष्करण करून संगव संपेपर्यंत होम करावा. असे काल, श्रौतसूत्रांतल्या अग्निहोत्रप्रकरणांत दिले आहेत व त्यांचाच अतिदेश (हवाला) येथें आहे. ॥ ५ ॥

हौम्यं च मांसवर्जम् ॥ ६ ॥

होमद्रव्यांचा निर्णयही श्रौतस्थ अग्निहोत्रावरूनच जाणावा, मात्र ह्या होमांत मांस हें हवि नसावें. तेथें दूध, यवागू, ओदन, दहीं व तूप हीं पांच द्रव्यें सांगितलीं आहेत. (यवागू म्हणजे भाताची पेज). शिवाय इतरत्र 'पयो दधि यवागूश्च सर्पिरोदनतण्डुलाः। सोमो मांसं तथा तैलमापस्तानि दशैव तु' म्हणजे दूध, दहीं, कण्हेरी, तूप, भात, तांदूळ, सोमरस, मांस, तेल व पाणी हीं दहा होमद्रव्यें सांगितलीं आहेत. ह्यांपैकीं मांस सोडून बाकीच्यांपैकीं पातळ पदार्थांचा पळीनें, व घट्ट असलेल्या पदार्थांचा हातानें होम करावा. मात्र संध्याकाळचें व दुसऱ्या दिवशीं सकाळचें होमद्रव्य एकच असावें. ह्या सूत्रांत मांसवर्ज ह्या पदानें शास्त्रान्तरस्थ द्रव्येंही चालतील हें सुचविलें आहे. ॥ ६ ॥

कामं तु व्रीहियवतिलैः ॥ ७ ॥

*अग्निहोत्रांतील दूध वगैरे न मिळतील तर साळी, सातू व तीळ ह्यांचाच, आपल्या इच्छेप्रमाणें होम करावा. हीं द्रव्यें एकेकटीं घ्यावीं, मिश्र नसावीं.* ॥ ७ ॥

अग्नये स्वाहेति सायं जुहुयात्सूर्याय स्वाहेति प्रातस्तूष्णीं द्वितीये उभयत्र ॥ ८ ॥ ॥ ९ ॥

*सायंकाळीं 'अग्नये स्वाहा' ही पहिली आहुति असून 'सूर्याय स्वाहा' ही प्रातर्होमाची पहिली आहुति आहे. व दोन्ही वेळीं 'प्रजापतये'*

अशा चतुर्थ्यन्त रूपाचें मनात ध्यान करून व स्वाहा असें हळूच म्हणून दुसरी आहुति द्यावी. सूत्रात 'तूष्णीम्' हें पद प्रजापतीचें ध्यान सुच विण्याकरता आहे. कारण प्रजापतीचा होम मौनानें करावा ह्याविषयीं शतपथब्राह्मणात, वाणी व प्रजापति ह्याच्या कलहाची सविस्तर कथा आहे. आता वृत्तिकारोक्त विधि संक्षेपानें लिहितों. परिसमूहन, परिस्तरण व पर्युक्षण करून होमद्रव्याचा अग्निहोत्राप्रमाणेंच, अमंत्रक संस्कार करावा. नंतर वर सांगितल्याप्रमाणें दोन आहुति देऊन पुन्हा परिसमूहन-पर्युक्षणें करावीं. असेंच सकाळीं करावें. मात्र तेथे अग्नये स्वाहाच्या जागीं सूर्याय स्वाहा अशी पहिली आहुति द्यावी. येथें नववी कंडिका संपली हींत आठ सूत्रें असून गृह्याग्नीची नित्यपरिचर्या सांगितली ॥ ८ ॥ ॥ ९ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका १० वी.

### अथ पार्वणः स्थालीपाकः ॥ १ ॥

आता ह्यापुढे पूर्णिमा व अमावास्या ह्या पर्वांच्याठायीं होणारें स्थाली-पाक नावाचें गृह्यकर्म सांगण्यास सुरवात करतों. पार्वण म्हणजे पर्वाचे ठिकाणीं होणारा होय. खालच्या सूत्रात दिलेल्या दर्शपूर्णमासाच्याच काळावरून ह्याच्या काळाचा निर्णय होत असता, येथें पार्वणपद घाल ण्याचें कारण, मागच्या प्रकरणावरून आलेल्या ह्या कृत्याच्या दररोज विधानाच्या शंकेचें निरसन करावें हें आहे, विवाहानंतर जी पहिली पूर्णिमा येईल त्या दिवशीं ह्या कृत्याला प्रथमारंभ करावा. प्रतिपदेचे दिवशीं औपासनाग्नीला ( गृह्याग्नि ) नित्य होम देऊन नंतर ह्या कृत्याच्या परिसमूहन वगैरेस सुरवात करावी. ॥ १ ॥

### तस्य दर्शपूर्णमासाभ्यामुपवासः ॥ २ ॥

ह्या कृत्याचा उपवास, श्रौतसूत्रोक्त दर्शपूर्णमासाच्या उपवासाप्रमाणेंच आहे. उपवास म्हणजे, पर्वदिवशीं ( इष्टिपूर्वदिन ) घृतदधिमिश्र व क्षारलवण ( पूर्वोक्त क्षारगण व मीठ ) ह्यानीं रहित अशा अन्नाचें एकवारच भोजन करून व उद्या स्थालीपाक करीन असा संकल्प करून गृह्याग्नीवरच दोन समिधांचा होम करणें होय. ह्याला अन्वाधानही म्हणतात. उपवासपदानें दर्शपूर्णमास प्रकरणातले इतर नियमही येथें पाळावे असें सुचवलें आहे. ॥ २ ॥

इध्माबर्हिषोश्च सन्नहनम् ॥ ३ ॥

इध्म व बर्हि ह्यांचें बंधनही दर्शपूर्णमासाप्रमाणेंच स्थालीपाकनिर्धीत आहे. कोपरापासून करंगळीच्या शेंड्या इतक्या लांबीच्या पळसाच्या किंवा खैराच्या पंधरा समिधांचा इध्म करावा असें वृत्तिकारांचें मत असून दोन टिची लांबीच्या २१ समिधांचा इध्म असावा असें जयन्ताचार्यांचें मत आहे. वरच्या समिधा न मिळाल्यास शमी वगैरे इतर यज्ञिय वृक्षांच्याही चालतील. बर्हि म्हणजे एक मूठभर तोडलेले दर्भ होत. तिपेडी व तीन ठिकाणीं सांधे असलेली अशी दर्भाची एक दोरी वळावी. ही डावखुरी असावी; म्हणजे वळताना उजवा हात खालीं व डावा हात वर पाहिजे. हिचें नाव सन्नहन ( बंधन ) आहे. उत्तरेकडे अग्र ठेवून त्या दोरीनें इध्माच्या समिधांना एकच वेढा देऊन दोरी मागें व त्यावर पूर्वाग्र करून इध्म स्वस्थानीं ठेवावा. बर्हिसंनहन रज्जुही अशीच करून ती आपल्यासमोर उत्तरेकडे शेंडा येईल अशी ठेवून तीवर बर्हि ठेवावा. व त्याच रज्जूनें दोन वेढे देऊन त्यांत रज्जूच्याही टोकें खोवून टाकावें. नंतर बर्हिस्थानीं बर्हि ठेवावें. हें विवरण कुमारिलकारिकानुसार लिहिलें आहे.

देवताश्चोपांशुयाजेन्द्रमहेन्द्रवर्जम् ॥ ४ ॥

स्थालीपाकाच्या देवताही, दर्शपूर्णमासांतीलच [illegible] घेऊन घ्या.

मात्र त्यापैकीं उपांशुयाज इंद्र व महेंद्र, ह्या नाहींत. त्यामुळें अग्नि व अग्निषोम ह्या देवता पूर्णिमेच्या स्थालीपाकाच्या आणि अग्नि व इंद्राग्नी ह्या अमावास्येच्या असे ठरलें. हीं गृह्यकृत्यें सर्वांप्रमाणे अग्निहोत्र्यालाही अवश्य आहेत व तो जर सोमयाजी (सोमयज्ञ केलेला) असेल तर त्याला दर्शदिवशीं '**इन्द्रं महेन्द्रं वा सन्नयत**' ह्या वचनाप्रमाणें इंद्र किंवा महेंद्र ह्यांच्या उद्देशानें दह्यादुधाचा सान्नाय्यहोम करावा लागतो. त्याच्यापक्षीं स्थालीपाकांतही त्या देवता येऊं लागतील म्हणून इन्द्रमहेन्द्राचा निषेध सांगितला व पूर्णिमेंत अग्नीषोमदेवताक उपांशुयाजाचा निषेध तर, सर्वांकरिताच अवश्य आहे. ॥ ४ ॥

## काम्या इतराः ॥ ५ ॥

वर निषेध केलेल्या तीन इतर देवतांना कामनाविशेषाच्या सिद्धीकरता होम दिल्यास चालेल. परंतु त्या ह्या कृत्यांत नित्यविहित नाहींत. त्यापैकीं उपांशुयाजाचें द्रव्य आज्य असून इन्द्रमहेन्द्राचें चरूनेच, ह्या कृत्यात (कामना असल्यास) यजन करावें. कारण ह्यात सान्नाय्य मुळींच नाहीं ॥ ५ ॥

## तस्यै तस्यै देवतायै चतुरश्चतुरो मुष्टीन्निर्वपति, पवित्रे अन्तर्धायामुष्मै त्वा जुष्टं निर्वपामीति ॥ ६ ॥

नंतर इष्टिदिवशीं प्रणीताप्रणयनान्त कृत्य झाल्यावर सुपात दोन पवित्रें (अप्रच्छिन्नाग्र वगैरे मागें लक्षण दिलेलें दर्भ) टाकून त्यांवर, मागें दिलेल्या प्रत्येक देवतेच्या उद्देशाने, चतुर्थ्यंत देवतानामानंतर 'त्वा जुष्टं निर्वपामि' असे शब्द प्रत्येक वेळीं उच्चारून भाताच्या (साळी) किंवा ते न मिळाल्यास इतर हौम्य धान्याच्या चार चार मुठी टाकाव्या. जसें, 'अग्नये त्वा जुष्टं निर्वपामि' (अग्निला आवडलेल्या तुझा मी

निर्वाप म्हणजे होमार्थ सुपात टाकणें करतों.) असा मंत्र म्हणून चार मुठी भात टाकावे वगैरे. ॥ ६ ॥

**अथैनान्प्रोक्षति यथा निरुप्तममुष्मै त्वा जुष्टं प्रोक्षामीति ॥ ७ ॥**

नंतर सर्वांच्या राशीवर दोन पवित्रें (दर्भ) टाकून जसें निर्वाप केले असतील त्याच क्रमानें, 'अग्नये त्वा जुष्टं प्रोक्षामि, वगैरे मंत्राचें ऊह करून प्रत्येक देवतेकरता समंत्रक मिळून चारदा प्रोक्षण करावें. अमंत्रक कृत्यात निर्वाप व प्रोक्षणें अमंत्रकच करावीं. हीं दोहीं कृत्यें मात्र एकाच पात्रात करावीं. 'एनान्' (ह्या सर्वांना) ह्या सूत्रस्थपदानें निर्वाप एकत्र मिळालेलेच प्रोक्षित करावें हें सुचविलें. ॥ ७ ॥

**अवहतांस्त्रिःफलीकृतान्नाना श्रपयेत् ॥ ८ ॥**

नंतर कृष्णाजिनावर (हरिणाचें काळें कातडें) उखळ ठेवून, पत्नीनें सडून व पाखडून त्या सर्व धान्याचे तिसडी स्वच्छ तांदूळ तयार करावे. नंतर प्रत्येक देवतेकरता वेगवेगळ्या भांड्यात ते शिजवावे. ॥ ८ ॥

**समोप्य वा ॥ ९ ॥**

किंवा सर्व देवताकरिता, एकाच भांड्यात शिजवावे. ॥ ९ ॥

**यदि नाना श्रपयेद्विभज्य तण्डुलानभिमृशेदिदममुष्मा इद-ममुष्मा इति ॥ १० ॥**

जर वेगवेगळे शिजवील तर, एकत्र झालेले तांदूळ शिजविण्याच्या भांड्यात टाकताना, 'इदमग्नये' (हें अग्निकरता) 'इदमग्नीषोमाभ्याम्' (हें अग्नीषोमाकरिता) वगैरे इदंपूर्वक चतुर्थ्यन्त देवतानाम उच्चारून टाकावे. अमुष्मै (अमक्याला) ह्या शब्द चतुर्थ्यन्त देवतानाम उच्चारावें हें सांगण्याकरिता आहे. ॥ १० ॥

**यद्यु वै समोप्य व्युद्धारं जुहुयात् ॥ ११ ॥**

जर एकत्र शिजविले असतील तर होमाच्या आधीं वेगवेगळ्या पात्रात 'इदमग्नये' वगैरे मन्त्रोहानीं उकरून नतर होम करावा. ॥ ११ ॥

**शृतानि हवींष्यभिघार्योदगुद्वास्य, बर्हिष्यासाद्येध्ममभिघार्या-ऽयन्त इध्म आत्मा जातवेदस्तेनेध्यस्व वर्धस्व चेद्ध, वर्धय चास्मान्प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेनान्नाद्येन समेधय स्वाहेति ॥ १२ ॥**

अग्नीच्या उत्तरभागीं होप्यधर्मात ( गृ० १।३।४ ) सागितल्याप्रमाणे, आयोपरन करून, पश्चिमभागीं पूर्वोक्त बर्हि पसरावा व त्यावर ते आज्यपात्र ठेवून त्या आज्यानें शिजलेल्या चरूवर अभिघार करावा. पुढें तीं हविर्द्रव्यें अग्नीच्या उत्तरेस थोडाबेळ निवत ठेवून नतर तुपा-च्याच दक्षिणेस, पसरलेल्या बर्हिवर आणून ठेवावीं. बर्हिबधन, बर्हीचेच खालीं, उत्तराग्र पसरून ठेवलेलें असावें. असो, नतर मागें सागितलेला इध्म, बन्धनरहित करून त्यावर घृताचा अभिघार करावा, व तो इध्म हातात घेऊन 'अयन्त इध्मपासून समेधय स्वाहा' पर्यंत वर सूत्रात दिलेला मन्त्र म्हणून त्याचा अग्नींत होम करावा. ॥ १२ ॥

**तूष्णीमाधारावाधार्याज्यभागौ जुहुयादग्नये स्वाहा सोमाय स्वाहेति ॥ १३ ॥**

ह्या नतर स्रुव्यात घृत घेऊन, अग्नीवर वायव्य दिशेकडून आग्नेयीपर्यंत एक व नैर्ऋत्येपासून ईशान्यकोणापर्यंत एक असे दोन अविच्छिन्नघृत धाराचे आधारहोम वेगवेगळे देऊन नतर अग्नये स्वाहा व सोमाय स्वाहा ह्या मन्त्रानीं दोन आज्यभागाचा होम करावा म्हणजे दोन घृताहुति द्याव्या. ह्याना याज्ञिकात आज्यभाग म्हणतात. सूत्रातल्या 'तूष्णीम्' ह्या पदानें वर दिलेला शास्त्रातरातला विधीही पाळावा हें सुचविलें असून ह्या वेळीं मनात प्रजापतये स्वाहा म्हणाव असाही अभिप्राय आहे. याज्ञिकाचा आचारही असाच आहे. ॥ १३ ॥

उत्तरमाग्नेय दक्षिणं सौम्यम् ॥ १४ ॥

त्यापैकीं अग्नये स्वाहा, ही आहुति अग्नीवर उत्तर बाजूला द्यावी व सोमाय स्वाहा, हीं दक्षिणेस द्यावी हे दोही आज्यभाग अर्थात् स्रुव्यानें द्यावे ॥ १४ ॥

विज्ञायते चक्षुषी वा एते यज्ञस्य यदाज्यभागौ ॥ १५ ॥

चवदाव्या सूत्राप्रमाणें उलटापालट करून कर्मसमाप्ती दक्षिणेस करण्याचे कारण असें कीं, हे आज्यभाग म्हणजे यज्ञाचे दोन डोळे आहेत अशी श्रुति आहे

असली तथापि येथें तिचा संबंध काय, ह्याचें उत्तर देण्याकरिता पुढील खुलासा करतात

तस्मात्पुरुषस्य हि प्रत्यङ्मुखस्यासीनस्य दक्षिणमक्ष्युत्तरं भवत्युत्तरं दक्षिणम् ॥ १६ ॥

यज्ञपुरुषाचा उजवा डोळा अग्नि असून डावा सोम आहे व तो अग्निस्थ यज्ञपुरुष यजमानाकडे म्हणजे पश्चिमेकडे तोंड करून बसलेला असतो, त्यामुळें त्याचा उजवा डोळा उत्तरेकडे व डावा डोळा दक्षिणेकडे झालेला असतो म्हणून ह्या खंडातील चवदाव्या सूत्रात आहुतींची उलटापालट करावी लागली येथे मुद्दाम श्रुतिप्रमाण देऊन, अन्य ठिकाणीं कर्म, उदक्संस्थ होतें हें सुचविल्यामुळें, बलिहरणात 'ब्रह्मणे' वगैरे प्रधानपुरुषाच्या उत्तरेस त्याच्या पुरुषास बलिदान करावें हें सिद्ध होतें ॥ १६ ॥

मध्ये हवींषि प्रत्यक्तरं वा, प्राक्संस्थान्युदक्संस्थानिगोत्तरपुरस्तात्सौविष्टकृतम् ॥ ७ ॥

आतां ह्या सूत्रानें हविःप्रक्षेप कोठे करावा तें सांगतात हविर्द्रव्याच्या प्रथम आहुति प्रज्वलित अग्नीच्या मध्यभागीं टाकाव्या, किंवा त्यातल्या

त्यात पश्चिमेच्या बाजूला आडव्या रेघेच्या सुमारें टाकण्यास आरंभ करावा; व नंतर पूर्वेकडे ( प्राक्संस्थ ) किंवा उत्तरेकडे ( उदक्संस्थ ) इतर आहुति संपेपर्यंत टाकीत जाव्या. स्विष्टकृत् आहुति मात्र अग्नीवर ईशान्य कोपऱ्यात टाकावी. ॥ १७ ॥

मध्यात्पूर्वार्धाच्च हविषोऽवद्यति ॥ १८ ॥

पात्रात उकरलेल्या चरूच्या मध्यभागातून व पूर्वार्धातून अंगठ्याच्या पेऱ्याएवढें दोनदा अवदान घेऊन एकेक आहुति बनवावी ॥ १८ ॥

मध्यात्पूर्वार्धात्पश्चार्धादिति पञ्चावत्तिनाम् ॥ १९ ॥

पञ्चावत्ती ( पञ्चप्रवरी ) यजमान असल्यास त्यानें, मध्यभाग पूर्वभाग व पश्चिमभाग ह्या तिहींतून क्रमानें तीनदा अवदान घेऊन आहुति तयार करावी. येथें 'पश्चार्धाच्च' एवढ्यानेंच काम भागत असता, पूर्वीचा सूत्रभाग पूर्वोक्त क्रमानें अवदानाचें ग्रहण सुचविण्याकरिता आहे. ॥ १९ ॥

उत्तरार्धात्स्विष्टकृतम् ॥ २० ॥

सर्व हविर्द्रव्याचीं जीं मुख्य अवदानें पूर्वी तोडून घेतलीं असतील त्याच्या शिल्लक राहिलेल्या अंशापैकीं, उत्तरेकडच्या सर्वाच्या भागातून स्विष्टकृत् होमाकरिता, अवदानें घेऊन एक आहुति तयार करावी; व पचावत्तिनें ह्याप्रमाणें उत्तरभागातून घेऊन शिवाय पूर्वभागामधूनही एकेक अवदान घेऊन स्विष्टकृदाहुति बनवावी; कारण असा प्रचार आहे. ह्याचें कारण इतरसूत्राचा अनुरोध हे असावें ॥ २० ॥

नात्र हवींषि प्रत्यभिघारयति स्विष्टकृतं द्विरभिघारयति ॥ २१ ॥

ह्या स्विष्टकृताच्या वेळेस मात्र हविशेषाचा पुन्हा अभिघार करू नये. फक्त स्विष्टकृदाहुतीवरच, पचावत्ती व चतुरवत्ती ह्या दोघानींही दोनदा अभिघार करावा ॥ २१ ॥

**यदस्य कर्मणोऽत्यरीरिचं यद्वा न्यूनमिहाकरम् । अग्निष्टद्स्विष्टकृद्विद्वान्सर्वं स्विष्टं सुहुतं करोतु मे । अग्नये स्विष्टकृते सुहुतहुते सर्वप्रायश्चित्ताहुतीनां कामानां समर्धयित्रे सर्वान्नः कामान्समर्धय स्वाहेति ॥ २२ ॥**

ह्यानंतर वर दिलेल्या यदस्यपासून समर्धय स्वाहा एथपर्यंत असलेल्या मंत्राने, स्विष्टकृत् ( यजनास शोभन करणारा ) नावाच्या अग्नीच्या उद्देशानें, पूर्वी सांगितल्याप्रमाणें तयार केलेली आहुति द्यावी. ह्या मंत्रात होमकृत्यामध्यें कमीजास्त कांहीं झालें असल्यास तें दुरस्त करून घेऊन यज्ञाला चांगलेपणा आणण्याबद्दल, व स्वतःच्या सर्व कामना पूर्ण करण्याबद्दल प्रार्थना केली आहे. ह्या आहुतीला स्विष्टकृद्धोम म्हणतात. ॥ २२ ॥

**बर्हिषि पूर्णपात्रं निनयेत् ॥ २३ ॥**

ह्या होमानंतर पूर्वी ठेवलेलें पूर्णपात्र ( प्रणीतापात्र ) समोर पसरलेल्या बर्हिवर आणून शिंपावें ( ओतावें ) ॥ २३ ॥

**एषोऽवभृथः ॥ २४ ॥**

हें पूर्णपात्राचे निनयनच ह्या कर्मीचें अवभृथ म्हणजे यज्ञान्तस्नान आहे. अवभृथत्वाचा आरोप केल्यानें त्याचें धर्म म्हणजे कालविशेष आणि प्रोक्षण, मार्जन हीं ज्ञापित केलीं. त्यामुळें अवभृथापूर्वी होणारीं सर्व प्रायश्चित्तें व नंतरचा 'ॐचमे स्वरश्चमे०' वगैरे मंत्राचा संस्थाजप ( समाप्तिजप ) हींही कल्पनें पूर्णपात्रनिनयनाच्या क्रमानें मागें व पुढें करावीं असें सुचविलें गेलें असो. पूर्णपात्र बर्हिवर ठेवल्यावर, त्यांतील जल हातावर ओतून त्यानें, 'माहप्रजा परासिचम्०' 'आपो अस्मान्०' 'इदमाप०' व 'सुमित्र्या न' हें मंत्र म्हणून आपल्या

अगावर मार्जन करून शेष बाहेर शिंपावें. पुसवनादिकृत्यामध्यें पत्नी-वरही मार्जन करावें. मात्र मार्जन हें अभिषेक (स्नान) स्थानीं असल्यामुळें ह्या वेळीं तिनें (पत्नीनें) पतीच्या डावीकडे बसावें. ह्या येथील अवभृथपदानें सुचविलेला अर्थ आहे. कांहीं थोडे लोक फक्त निनयन (पात्र ठेवणें) मात्र करावें म्हणतात, 'अयाश्च०' वगैरे मंत्रानीं सात आज्याहुति देणे, ह्याला सर्वप्रायश्चित्त म्हणतात. संस्थाजपानंतर परिसमूहन–पर्युक्षणें करून यज्ञ संपवावा. कांहीं ग्रंथात यापूर्वी विभूति-ग्रहण सांगितलें आहे. यज्ञात ब्रम्हा असल्यास यजमानानंतर त्यानेंही सर्वप्रायश्चित्त होम व संस्थाजप पुन्हा वेगळे करावे. ॥ २४ ॥

पाकयज्ञानामेतत्तन्त्रम् ॥ २५ ॥

स्थालीपाकासारख्या म्हणजे हुतसंज्ञक सर्व यज्ञाचें तंत्र (कृति) हेंच आहे. ह्या सूत्रातल्या 'पाकयज्ञानाम्' ह्या अधिक पदानें, 'ह्या जातीचें' असा विशेष अर्थ ज्ञापित केल्यामुळे प्रहुत व ब्राह्मणिहुत ह्यामध्यें हे तंत्र होत नाहीं. हें ज्ञापक मागेंच पहिल्या कंडिकेंत दुसऱ्या सूत्रावर लिहून ठेवलें आहे. तंत्रपदानें अंगभूत कृति एवढाच अर्थ घ्यावा, कारण प्रत्येक यज्ञाच्या प्रधानदेवता वेगवेगळ्या असतात–देवताऽऽगमे नित्याना-मपायः असें शास्त्र आहे. ॥ २५ ॥

हविरुच्छिष्टं दक्षिणा ॥ २६ ॥ ॥ १० ॥

हविशेष राहील तें, ब्रह्म्याला किंवा तो नसल्यास दुसऱ्या ब्राह्मणाना दक्षिणा म्हणून द्यावें. कारण दक्षिणादान हें एक कर्माचें अंगच आहे. येथे पहिल्या अध्यायाची दहावी कंडिका संपली. हीमध्यें २६ सूत्रें असून स्थालीपाकविधि सांगितला ॥ २६ ॥ ॥ १० ॥

## अध्याय १ ला कण्डिका ११ वी

### अथ पशुकल्पः ॥ १ ॥

आतां ह्या पुढच्या कंडिकेंत पशुहोमाचें फक्त तंत्र ( कृति ) मात्र देतों. अष्टकांत व शूलगवांत ह्या पुढच्या विधीपैकीं उपाकरणाचा जरी निषेध आहे ( गृह्यसूत्र २-४-१३ व ४।९।१५ पहा ). तथापि मधुपर्कांत पशुमारणपक्षीं व काम्यपशुहोम कर्तव्य असतां, ह्या विधीला सार्थक्य आहे. मधुपर्क, ऋत्विजांस केला असतां त्यांतील पशूची देवता बृहस्पती आहे. तसेंच स्नातकाच्या मधुपर्कांत इंद्राग्नी, राजाच्या मधुपर्कांत इन्द्र, मित्राच्या मधुपर्कांत मित्र; वरोद्देश्यक मधुपर्कांत प्रजापति आणि अतिथीच्या मधुपर्कांत अग्निवैश्वानर अशा पशुदेवता असतात; असें दुसऱ्या शास्त्रांतून म्हटलें आहे. ॥ १ ॥

**उत्तरतोऽग्नेः शामित्रस्यायतनं कृत्वा पाययित्वा पशुमाप्लाव्य पुरस्तात्प्रत्यङ्मुखमवस्थाप्याग्निं दूतमिति द्वाभ्यां हुत्वा सपलाशयार्द्रशाखया पश्चादुपस्पृशेदमुष्मै त्वा जुष्टमुपाकरोमीति ॥ २ ॥**

आज्यभागान्त कृत्य संपवून अग्नीच्या उत्तरेस शामित्र नांवाच्या अग्नीकरितां जागा तयार करावी. शमिता म्हणजे पशु मारणारा, तदुपयोगी अग्नि तो शामित्र होय. असो. नंतर पशूला पाणी पाजून व स्नान घालून गृह्याग्नीच्या पूर्वेस, पश्चिमेकडे ( अग्नीकडे ) तोंड करून बांधून ठेवावा, ह्यापुढें 'अग्निं दूतं०' ( ऋक्सं० १-१-२२ ) वगैरे दोन ऋचांनीं दोन आज्याहुति देऊन शेवटीं पानें असलेली ओली अशी यज्ञिय वृक्षाची डहाळी घेऊन तिनें अग्नये वगैरे चतुर्थ्यंत देवतानामांपुढें 'त्वा जुष्टमुपाकरोमि' असें म्हणून ह्या पशूच्या पाठीला स्पर्श करावा. ह्याचें नांव उपाकरण म्हणजे देवतेकरितां बळी देण्यासाठीं पुढें करणें

होय. 'अग्निं दूत' हें प्रतीक जरी पुष्कळ ऋचाच्या आरभीं आहे तथापि पादापेक्षा कमी भागाचें ग्रहण असल्यानें ह्यानें प्रारभ होणाऱ्या सूक्ताच्याच दोन ऋचा घ्याव्या. दोन सूक्तें मात्र समजू नये, कारण दोन सूक्तें पाहिजे असल्यास सूत्रकार तेथें 'सूक्ते' ( दोन सूक्ते ) असे स्पष्ट लिहीत असतात. ॥ २ ॥

**व्रीहियवमतीभिरद्भिः पुरस्तात्प्रोक्षत्यमुष्मै त्वा जुष्टं प्रोक्षामीति ॥ ३ ॥**

नतर साळी व सातू आत घातलेल्या पाण्याने, त्या पशूच्या पुढच्या भागावर, 'अग्नये' त्वा जुष्टं प्रोक्षामि' वगैरे देवतोद्देशपूर्वक मत्र म्हणून प्रोक्षण करावें. ऊह म्हणजे कल्पना ॥ ३ ॥

**तासां पाययित्वा दक्षिणमनु बाहुं शेषं निनयेत् ॥ ४ ॥**

पुढें त्यापैकीं काहीं पाणी त्या पशूला पाजून बाकीचे त्याच्या उजव्या बाहूवर ( पुढचा पाय ) शिंपावें. 'तासा' हे अधिकपद अष्ट काश्राद्धात जरी प्रोक्षणनिषेध असला, तरी पशूस हे पाणी पाजावेंच हे सूचित करते. ॥ ४ ॥

**आवृतैव पर्यग्नि कृत्वोदञ्चं नयन्ति ॥ ५ ॥**

नतर त्या पशूभोवतीं जळकें लाकूड तीनदा फिरविणें वगैरे श्रौतोक्त विधि, *गृह्य कर्मांत अमत्रकच करून पशूला उत्तरेकडे शामित्राग्निस्थानात* घेऊन जावें. आवृत् शब्द अमत्रक असा अर्थ सुचवितो ॥ ५ ॥

**तस्य पुरस्तादुल्मुकं हरन्ति ॥ ६ ॥**

तो पशु नेला जात असता त्यापुढें जळते लाकूड घेऊन चालत जावें. ॥ ६ ॥

**शामित्र एष भवति ॥ ७ ॥**

हे जळतें लाकूडच शामित्र नावाचा अग्नि होय. अर्थात् ह्यापुढें उत्तरेकडच्या शामित्रायतनात ह्या अग्नीची स्थापना करावी. ॥ ८ ॥

**वपाश्रपणीभ्यां कर्ता पशुमन्वारभते ॥ ८ ॥**

नतर जो कोणी अध्वर्यूच्या जागीं होम करणारा असेल त्यानें वपाश्रपणी ह्या नावाचीं दोन मास शिजविण्याचीं पात्रें घेऊन त्यानीं पशूच्या पाठीस स्पर्श करावा. वपाश्रपणी हीं दोन काष्ठाचीं भाडीं असून त्यापैकीं एकीला झारीसारखी तोटी असते. ॥ ८ ॥

**कर्तार यजमानः ॥ ९ ॥**

व यजमान त्या कर्त्याला ( अध्वर्यूला ) त्याच वेळीं स्पर्श करतो. ॥ ९ ॥

**पश्चाच्छामित्रस्य प्राक्शिरसं प्रत्यक्शिरसं वोदक्पादं संज्ञप्य पुरा नाभेस्तृणमन्तर्धाय, वपामुत्खिद्य, वपामवदाय, वपाश्रपणीभ्यां परिगृह्याद्भिरभिषिच्य, शामित्रे प्रताप्याग्रेणैनमग्निं हृत्वा दक्षिणत आसीनः श्रपयित्वा परीत्य जुहुयात् ॥ १० ॥**

नतर अध्वर्यूनें, शामित्राग्नीच्या पश्चिमेस दर्भ पसरून त्यावर पशूला पूर्वेकडे किंवा पश्चिमकडे डोकें व उत्तरेकडे पाय येतील असा निजवून त्याचें सज्ञपन ( ठार मारणें ) करावें. व पशूच्या बेंबीखालीं उजव्या बाजूला वपेच्या स्थानावर गवतानें झाकून, तेथें कापून, वपा ( पशूची अन्तस्त्वचा ) उकरावी, व सर्व वपा, वपाश्रपणीमध्यें काढून घेऊन पाण्यानें प्रोक्षण करून शामित्राग्नीवर सस्कारार्थ तापवून, दोन्हीं भाडीं हातात घेऊन, शामित्राच्या उत्तरेकडून निघून त्याला उजवी घालून गृह्याग्नीच्या समोरून ( पश्चिम ) दक्षिणेस जाऊन बसावें. तेथें तूप घालघालून ती वपा शिजवावी, व तिच्यावर अभिघार करून बर्हिवर

पिंपरीच्या (प्लक्ष) ढहाळीवर उतरून ठेवावी. नंतर आल्यावाटेनें दोन्ही अग्नीभोवतीं परत फिरून येऊन गृह्याग्निसमोर बसावे व स्रुचेत, आज्य, सुवर्णशकल आज्य ह्या क्रमानें अवदानें घेऊन अग्नये स्वाहा वगैरे इष्ट मंत्रांनीं वपेचा होम करावा. सुवर्णशकलें नसल्यास त्याजागीं आज्यच घ्यावें, व चतुरवत्ती जरी यजमान असला तरी त्याच्याही वपाहोमांत वरच्याप्रमाणें पांचच अवत्तें होतात अशी श्रुति आहे. वर सूत्रांत 'वपामुत्खिद्य वपामवदाय' असें दोनदां वपाग्रहण करून सर्व वपेचें अवदान घ्यावें असें सुचविलें व त्यामुळें वपेशिवाय इतर अंगांचें सर्वांशीं अवदान करूं नये असें ठरतें. ॥ १० ॥

## एतस्मिन्नेवाग्नौ स्थालीपाकं श्रपयन्ति ॥ ११ ॥

ह्या औपासनाग्नीवरच पशुयागाचें अंग म्हणून पशुदेवतेच्या उद्देशानें स्थालीपाक शिजवितात. 'श्रपयन्ति' (शिजवितात) ह्या बहुवचनानें स्थालीपाकाच्या कर्त्याचा नेम नाहींसें दिसतें. तो कोणीही शिजविल्यास चालेल. ॥ ११ ॥

## एकादश पशोरवदानानि सर्वाङ्गेभ्योऽवदाय शामित्रे श्रपयित्वा हृदयं शूले प्रताप्य, स्थालीपाकस्याग्रतो जुहुयात् ॥ १२ ॥

नंतर श्रौताप्रमाणेंच (सत्याषाढीयश्रौतसू० ४-४ पहा.) हृदय, जिव्हा, वक्ष वगैरे अकरा; पशूच्या अंगातून अकरा अवदानें काढून घेऊन शामित्राग्नीवर शिजवावीं. त्यापैकीं काळजामध्यें सळई घालून तिनें ते, शामित्रावर शिजेपर्यंत तापवावें. शिजल्यावर अभिघार (आज्य) घालून तीं पश्वंगांचीं अवदानें उतरून ठेवावीं. नंतर स्थालीपाकाच्या भागाचा आधीं होम करून त्यानंतर अवदानाचा होम करावा. ह्यापक्षीं दोहोंचें स्विष्टकृतही वेगवेगळे करावे. ॥ १२ ॥

अवदानैर्वासह ॥ १३ ॥

किंवा अवदानाबरोबरच स्थालीपाकाचाही होम करावा. ह्यापक्षीं एकच स्विष्टकृद्धोम होतो. ॥ १३ ॥

एकैकस्यावदानस्यद्विर्द्विरवद्यति ॥ १४ ॥

एकेका अवदानाचे कोठेतरी दोनदा तुकडे तोडून ( अवदान ) घ्यावे. येथें स्थालीपाकासारखा 'मध्यान्' वगैरे देशनियम नाहीं. पञ्चावत्ती यजमान असल्यास त्यानें तीन तुकडे तोडून घ्यावे ह्या प्रसंगींहि उपस्तरण प्रत्यभिघारण हीं करून आहुती द्याव्या. ॥ १४ ॥

आवृतैव हृदयशूलेन चरन्ति ॥ १५ ॥ ॥ ११ ॥

येथे आवृत् ( तूष्णीम् ) हे अधिक घातलेले पद, मन्त्रवर्ज इतर वैतानिक विधि ( श्रौतसू० ३–६ पहा ) येथल्या शूलनिरसनातही येनात हे बोधित करते. त्यामुळे सर्वप्रायश्चित्तापर्यंत कृत्य झाल्यानर ओल्या व सुक्या जमिनीच्या सधीवर हृदय भाजण्याचा शूल टाकावा, नतर आचमन करून, समिद्ग्रहण, उपस्थान, समिदर्पण हीं करावीं हें ठरलें. ह्यानतर पूर्णपात्रनिनयन वगैरे करून यज्ञ सपवावा. ह्या विधींत श्रौताचा अतिदेश फार असल्यामुळें तें प्रकरण पाहिल्याशिवाय अधिक प्रयोगज्ञान होणार नाहीं. येथें अकरावी कडिका सपली. हीमध्ये १५ सूत्रें आहेत. ॥ १५ ॥ ॥ ११ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका १२ वी

चैत्ययज्ञे प्राक् स्विष्टकृतश्चैत्याय बलिं हरेत् ॥ १ ॥

शकर, आर्या, ज्येष्ठा, भद्रकाली, यक्षिणी वगैरे वेदोक्त नसलेल्या, पुराणोक्त किंवा लौकिक देवता आपल्या चित्तात पूज्य मानलेल्या नसलेल्या असतील त्यांचें नाव चैत्य होय, अथवा चितास्थाना-

तला देवही चैत्य समजतो. त्याच्या उद्देशानें यज्ञ केला असता त्यात स्विष्टकृतापूर्वी त्या चित्तस्थ देवतेला (चैत्य) बलि (अन्न व पूजा) पोचवावा. माझें अमुक इच्छित झालें असता मी तुझ्या उद्देशानें, आज्य, स्थालीपाक किंवा पशु ह्याचा होम करीन असा नवस केल्यावर तें इच्छित मिळालें असता हे चैत्ययज्ञ समजतात. हें बलिदान 'शवराय नम' वगैरे नमोऽन्त मन्त्रांनीं द्यावें असे मागें बलिहरणप्रकरणातच सिद्ध केलें आहे. सूत्रात दोनदा चैत्यपद घालून हें बलिदान प्रत्यक्ष पोंचविलें पाहिजे, जागच्याजागीं स्मरणानें अर्पण करून चालणार नाहीं हें ज्ञापित केलें आहे. म्हणून चैत्याच्या देवळातच स्थण्डिलादि करावें. ॥ १ ॥

**यद्यु वै निदेशस्थं पलाशदूतेन यत्र वेत्थ वनस्पत इत्येतयर्चा द्वौ पिण्डौ कृत्वा वीवधेऽभ्याधाय दूताय प्रयच्छेदिमं तस्मै बलिं हरेति चैनं ब्रूयादयं तुभ्यमिति यो दूताय ॥ २ ॥**

जर तो चैत्यदेव दूरदेशाचा असेल तर पळसाच्या तिवड्याचा दूत करून त्याकडून हा बलि नेववावा, म्हणजे तो पोचवील अशी भावना करावी एक पळसाच्या तिवड्याचीच कावड करून त्या दूताच्या (पुतळा) खांद्यावर ठेवावी; व 'यत्र वेत्थ वनस्पते०' (ऋक्सं० ३ ८-२१) ह्या ऋचेनें बलीच्या अन्नाचे दोन गोळे करून ते त्या कावडीत टेवून त्या दूताच्या स्वाधीन करावे. नतर 'इमं तस्मै (येथें चतुर्थ्यन्त देवतानाम घ्यावे) बलिं हर' (हा बलि त्या माझ्या इष्ट देवतेला पोंचव) असें त्या दूताला, देवतेचा पिंड दाखवून म्हणावें, व नतर दुसरा दूताचा पिंड दाखवून 'अयं तुभ्यम्' (हा तुला) असें म्हणावें. एतयर्चा हीं अधिक अक्षरें, क्वचित्पादग्रहण असताही सूक्तग्रहण होतें, असें ज्ञापन करण्यास्तव आहेत त्यामुळें 'आत्वाहार्षमन्तरेधि' (स ८ ८-३१-१) येथें व ऋषभ मा समाना-

नाम् (म ८-८ २४ १) येथे पादग्रहण असून संपूर्ण सूक्तें घेतलीं जातात. दुसरे कोणी, त्या पदांनीं पिंडकरण, विनधात (कावडींत) स्थापन व दूताला अर्पण करणें ह्या तिहींचे वेळीं मंत्रावृत्ति सूचित केली असा अर्थ करतात तर दिलेले ज्ञापक व्याकरणशास्त्रातील प्रसिद्ध ज्ञापनाप्रमाणे "आदौ वैयर्थ्यम्, ततः इष्टार्थज्ञापनम्, स्वस्मिन् चारितार्थ्यम्, अन्यत्र फलम्" ह्या चारही अवयवांनीं युक्त आहे ॥ २ ॥

**प्रतिभयं चेदन्तरा शस्त्रमपि किञ्चित् ॥ ३ ॥**

आपल्या व वराच्या मध्यदेशीं चोराचिन्ह्यासारखें काहीं भयस्थान असल्यास दूताजवळ एखादें शस्त्रही द्यावें ॥ ३ ॥

**नाव्याचेन्नद्यन्तरा प्लवरूपमपि किञ्चिदनेन तरितव्यमिति ॥४॥**

मार्गामध्ये, नौकेनें तरण्याइतकी मोठी नदी असल्यास, पळसाचा द्रोण वगैरे नौकेसारखें तरणसाधन, 'अनेन तरितव्यम्' (ह्यानें तरून जा) असें म्हणून दूताला अर्पण करावें ॥ ४ ॥

**धन्वन्तरियज्ञे ब्राह्मणमग्निं चान्तरा पुरोहितायाग्रे बलिं हरेत् ॥५॥ ॥ १२ ॥**

चैत्यदेश धन्वंतरि ( आयुर्वेदाचार्य ) असल्यास त्याच्या यज्ञानें अगोदर त्याच्या व अग्नीच्यामध्ये, 'पुरोहिताय नमः' म्हणून पुरोहिताला बलि द्यावा नंतर धन्वंतरये नमः म्हणून त्याला द्यावा. धन्वंतरि दूरदेशी असल्यास 'इदं पुरोहिताय धन्वंतरये च' म्हणून दोघांकरितां एकच बलि दूताच्या स्वाधीन करावा व दुसरा त्या दूताला द्यावा एवढा फरक आहे. हा गद्य यत्न पाहतां, आश्वलायनांच्या वेळीं राजस तामस भक्तीचा प्रचारहि बराच चालू होता असें दिसतें. येणें १२वी कंडिका संपली. हींत सूत्रें पांच आहेत ॥५॥ ॥ १२ ॥

## अध्याय १ ला कण्डिका १३ वी.

**उपनिषदि गर्भलम्भनं पुंसवनमनवलोभनं च ॥ १ ॥**

ह्या सूत्रांत 'आम्नातम्' (सांगितले आहे) असा शेष आहे. एका उपनिषदेंत (बृहदारण्यक) गर्भलम्भन, पुंसवन व अनवलोभन हे संस्कार सांगितले आहेत. एवढेचसे काय, गर्भाधानापासून आमश्नाना-पर्यंत सर्वच संस्कार सांगितले आहेत. ती उपनिषद् आमच्या शाकल-शाखेंत नाहीं, तथापि ते संस्कार करावे हें सुचविण्याकरितां येथें उपनिष-देचा उल्लेख केला आहे ॥ १ ॥

**यदि नाधीयात्तृतीये गर्भमासे तिष्येणोपोषितायाः सरूपवत्साया गोर्दधनि द्वौ द्वौ माषौ यवं च दधिप्रसृतेन प्राशयेत् ॥ २ ॥**

ह्या खटांत गर्भलम्भन न सांगतां, आचार्यांनें एकदम पुंसवन सांग-ण्यासच सुरवात केली आहे, त्यावरून ते करू नये असा एक पक्ष आहे; परंतु वरच्या सूत्रांत उल्लेख असल्यामुळें, शौनकादिकांच्या इतर स्मृतीप्रमाणें गर्भलम्भनहि अगोदर करावें असें दुसरे आचार्य म्हणतात. हाच पक्ष युक्त दिसतो. गर्भलम्भन म्हणजे ज्या कर्मानें गर्भ लब्ध (प्राप्त) होतो, वीर्यसेचन फुकट जात नाहीं ते होय. तसेच ज्या कृत्यानें तो लब्ध गर्भ पुमान् ( पुरुष ) ह्या रूपानें प्रसूत होतो ते पुंसवन होय. असो. आतां सूत्रार्थ लिहितो. जर त्या संस्कारबोधक उपनिषदाचें अध्ययन केलेलें नसेल तर गर्भधारणेपासून तिसऱ्या महिन्यांत पुनर्वसु नक्षत्र असेल त्या दिवशीं गर्भिणीनें एकदांच भोजन ( उपवास ) करावें. नंतर दुसऱ्या दिवशीं पुष्य नक्षत्रावर, स्वत प्रमाणेंच वासराचा रंग असलेल्या गाईचें पसाभर दहीं तिच्या हातांत देऊन व त्यांत दोन उडीद अडासारखे, व एक सातू शिश्नरूप म्हणून टाकून तें तिजकडून पिववावें. सूत्रांतल्या तिष्येण ह्या पदाचा प्राशयेत्पदाशीं दूरान्वय करावा लागतो ॥ २ ॥

**किं पिबसि किं पिबसीति पृष्ट्वा पुंसवनं पुंसवनं पुंसवनमिति त्रिः प्रतिजानीयात् ॥ ३ ॥**

प्राशनाच्या आधीं, पतीनें किं पिबसि किं पिबसि किं पिबसि ( काय पितेस ) असा तीनदा पत्नीस प्रश्न करावा व नंतर तिनेंहि पुंसवनम् पुंसवनम् पुंसवनम् ( पुरुषोत्पादक द्रव्य ) असे त्रिवार उत्तर द्यावें. हा एक पसा पिण्याचा प्रकार सांगितला ॥ ३ ॥

**एवं त्रीन्प्रसृतान् ॥ ४ ॥**

वर सांगितल्याप्रमाणे प्रश्नोत्तरादि प्रकारासह एकंदर तीन पसे ( ओंजळी ) दहीं पाजवावें हा प्राशनापूर्वी प्रजापतिदेवताक स्थालीपाकाचें तंत्र आज्यभागांपर्यंत करून ठेवावें. ह्या कृत्याला पुंसवन म्हणतात गर्भिणी स्थितींत जें चिंतावें किंवा पहावें त्याप्रमाणे खुणा गर्भांवर होतात, ह्या मानसशास्त्राच्या नियमाला अनुसरूनच दह्यांत २ उडीद व १ यव ह्यांचा प्रक्षेप आहेसें वाटतें ॥ ४ ॥

**अथास्यै मण्डलागारच्छायायां दक्षिणस्यां नासिकायामजीतामोषधीं नस्तःकरोति ॥ ५ ॥**

ह्या कृत्यानंतर लागलीच त्या गर्भिणीला वर्तुळाकृति घर ( मखर ) छता सहित तयार करून, त्याच्या सावलींत बसवावी, व तिच्या उजव्या नाकपुडींत, जीर्ण न होणाऱ्या औषधीचा म्हणजे दूर्वेचा रस पतीनें पिळावा ह्यांतील अथ शब्द आनंतर्यद्योतक म्हणजे निरंतरपणा सुचविणारा असल्या मुळें पुंसवनानंतर लागलीच हें कृत्य करावें पुढच्या सातव्या सूत्रांतल्या मंत्रांतील ' माहं पौत्रमघं नियाम् '= मी पुत्रसंबंधी गर्भपातरूपी अनिष्टाला प्राप्त होऊं नये, ह्या वचनावरून हें दूर्वारससेचन कृत्य म्हणजे अनवलोभन होय. एतीत मूळशब्द अनवलोभन असून त्याला गूढार्थप्रियतेमुळें

( परोक्षप्रियता ) अथवा योगरूढता आणण्याकरिता, पृषोदरादिगणात घालून पच्या जागीं भ केला आहे. योगरूढ म्हणजे ठराविक अर्थीच अवयवार्थाचें ( व्युत्पत्ति ) नियमन असणें होय. योगरूढ करण्याचें कारण केवळ यौगिकार्थ ( व्युत्पत्तिसिद्ध ) जो लुप्त होणें, त्याचा संशय येऊ नये हें आहे. अनवलोभन ( पन ) म्हणजे ज्या संस्कारामुळे, पुंसवनानें पुल्लिंगी बनलेल्या त्या गर्भाचें लोपन ( पतन ) होत नाहीं तें होय अशी ह्याची व्युत्पत्ति आहे ॥ ५ ॥

*मागच्या सूत्रात अमन्त्रक दूर्वारस पिळणाराचा पक्ष सांगितला आता,* पुढच्या सूत्राने दुसऱ्या मताचें विधान सांगतात—

**प्रजावज्जीवपुत्राभ्यां हैके। आते गर्भो योनिमैतु पुमान्बाण इवेषुधिम्। आ वीरो जायतां पुत्रस्ते दशमास्यः॥ अग्निरेतु प्रथमो देवतानां सोऽस्यै प्रजां मुञ्चतु मृत्युपाशात्। तदयं राजा वरुणोऽनुमन्यतां यथेयं स्त्री पौत्रमघं न रोदादिति ॥ ६ ॥**

दुसरे आचार्य म्हणतात, प्रजावान् आणि जीवपुत्र ह्यांना प्रथमदर्शन झालेल्या ( सुचलेल्या ) मंत्रांनीं हें दूर्वारससेचन करावें. ते दोन मंत्र म्हणजे, वर सूत्रात दिलेलेच. 'आते' पासून 'दशमास्य' पर्यंत पहिला; व 'अग्निरेतु' पासून 'न रोदात्' पर्यंत दुसरा; असें समजावें ह्या सूत्रात 'ह' हें पद घालून ह्या पक्षाबद्दल सूत्रकारानीं आपली पसंती व्यक्त केली आहे. ॥ ६ ॥

**प्राजापत्यस्य स्थालीपाकस्य हुत्वा हृदयदेशमस्या आलभेत। यत्ते सुशीमे हृदये हितमन्तः प्रजापतौ। मन्येऽहं मां तद्विद्वांसं माहं पौत्रमघं नियामिति ॥ ७॥ ॥ १२ ॥**

नंतर ह्या खंडातील दुसऱ्या सूत्रात सांगितलेल्या प्रजापतिदेवताक स्थालीपाकाचा होम करून, पत्नीनें 'यत्ते सुशीमे पासून नियाम्' पर्यंत वर

सूत्रात दिलेला मंत्र म्हणून गर्भिणीच्या हृदयाला स्पर्श करावा. पुढें स्विष्टकृदादि करून होम संपवावा. हें कर्म गर्भसंस्काररूप असल्यामुळें, प्रत्येक गर्भाचे वेळीं ह्याची आवृत्ति करावी. प्रथम गर्भाचे वेळीं दिवस न समजल्यास चवथ्या महिन्यातच करावें. पुढें पाचव्यात मात्र गर्भाचे अवयव उत्पन्न होतात. वर आलेल्या मंत्रात 'अहं' ( मी ) हें पद असल्यामुळें हें कर्म पतीनेंच करावें असें ठरतें; तो नसल्यास तत्स्थानीय दिरानें करावें. हें पुढें ( गृ० ४।२।१८ पहा ) स्पष्ट येणार आहे. येथें ही ७ सूत्राची १३ वी कंडिका संपली ॥ ७ ॥ ॥ १३ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका १४ वी.

### चतुर्थे गर्भमासे सीमन्तोन्नयनम् ॥ १ ॥

गर्भिणीला चवथा महिना लागला असतां, सीमन्तोन्नयन नावाचा संस्कार करावा. ज्या कृत्यात सीमन्ताचें म्हणजे भांगाचें उन्नयन (पृथक्करण ) केलें जातें तें सीमन्तोन्नयन होय. हें कर्म क्षेत्र–( पत्नी ) संस्काररूप असल्यामुळें प्रत्येक गर्भास ह्याची आवृत्ति करू नये. ह्याला हल्लीं प्रचारात अठांगुळ ( अष्टांगुलशल्लीयुक्त ) असें म्हणत असून, एखादेवेळीं गर्भाधानसंस्कारापूर्वींच गर्भधारणा झाल्यास त्याचा प्रतिनिधि म्हणून हें करीत असतात. परंतु हाही, त्या गर्भाधानाप्रमाणेंच एक वेगळा आवश्यक संस्कार आहे हें लक्षात पाहिजे ॥ १ ॥

पुढच्या सूत्रानें त्याचा काल सांगतात.

### आपूर्यमाणपक्षे यदा पुंसा नक्षत्रेण चन्द्रमा युक्तः स्यात् ॥ २ ॥

शुक्लपक्षात जेव्हा पुंनक्षत्रीं चंद्र असेल तेव्हा पुंसवन करावें. पुष्य, हस्त, पुनर्वसु, अभिजित्, पूर्वाभाद्रपदा ( प्रोष्ठपाद् ) अनुराधा आणि

अश्विनी हीं पुनक्षत्रें असून ह्याच्या मञल्या दोन पादात (एकेक पाद १५ घटका) हें कृत्य करावें असे गृह्यकारिकात म्हटलें आहे ॥ २ ॥

**अथाग्निमुपसमाधाय पश्चादस्यानडुहं चर्मास्तीर्य प्राग्ग्रीवमुत्तरलोम तस्मिन्नुपविष्टायां समन्वारब्धायां, धाता ददातु दाशुष इति द्वाभ्यां राकामहमिति द्वाभ्यां, नेजमेषेति तिसृभिः प्रजापते नत्वदे-तान्यन्य इतिच ॥ ३ ॥**

नतर गृह्याग्नि प्रदीप्त करून गृहप्रवेशनीयाप्रमाणेंच आज्यभागान्तकृत्य सपवून त्याच्या पश्चिमेस, पूर्वेकडे मान व वर केस करून पसरलेल्या बैलाच्या कातड्यावर गर्भिणीस बसवून तिनें हातास हात लावल्यावर पतीनें 'धाता ददातु०' वगैरे दोन ऋचा, (श्रौतसू.अ.६ ख. १४), 'राकामहम्' वगैरे दोन ऋचा, 'नेज मेष०' वगैरे तीन ऋचा व 'प्रजापते न त्व०' ही एक अशा आठ ऋचानीं आठ आज्याहुति द्याव्या. ह्या सूत्रात जुहुयात् 'होम करावा' असा अध्याहार आहे व अथ ह्या अधिक पदानें, शास्त्रान्तरोक्ताप्रमाणे सहाव्या व आठव्या महिन्यातहि हा संस्कार केल्यास चालेल असे बोधन केले आहे ॥ ३ ॥

**अथास्यै युग्मेन शलाटुग्लप्सेन त्र्येण्याच शलल्या त्रिभिश्च कुशपिञ्जूलैरूर्ध्वं सीमन्तं व्यूहति भूर्भुवः स्वरोमिति त्रिः ॥ ४ ॥**

नतर लगलीच पतीने समसख्याक कच्च्या फळाचे घड (घूड), वर तीन पाढरे पट्टे असलेले साळईचें पीस व तीन दर्भाचे मध्याकुर (गर्भ), हीं एकत्र घेऊन, त्यानीं गर्भिणीचा भाग, 'भूर्भुव स्वरोम्' हा मत्र प्रत्येक वेळीं म्हणून तीनदा कपाळापासून ताळूसपेपर्यंत पृथक् करावा, म्हणजे त्याची जुडी भागात फिरवावी. सूत्रात 'त्र्येण्याच' येथें 'प्रातिपदिकान्तनु-म्विभक्तिषु' ह्या पाणिनीयसूत्रानें णत्व होतें. वृत्तिग्रयात 'श्याम्या नोण' हें

णन्यसूत्र लिहिलें आहे, परंतु तें सूत्र फक्त अधिकारबोधक आहे; नाहींतर समानपद नसल्यामुळें प्रमाद म्हणावा लागेल ॥ ४ ॥

**चतुर्वा ॥ ५ ॥**

किंवा मतभेदानें वरच्याप्रमाणेंच चारदां सीमन्तोन्नयन करावें ॥ ५ ॥

**वीणागाथिनौ संशास्ति सोमं राजानं संगायेतामिति ॥ ६ ॥**

ह्यानंतर तंबोऱ्यावर गाणाऱ्या दोन गवयांना, 'सोमं राजानं संगायेताम्' म्हणजे तुम्ही सोमराजाचें गीत गा अशी आज्ञा द्यावी ॥ ६ ॥

**सोमो नो राजावतु मानुषीः प्रजा निविष्टचक्राऽसाविति यां नदीमुपवसिता भवन्ति ॥ ७ ॥**

व त्या गवयांनीं 'सोमोनो राजावतु मानुषीः प्रजा निविष्टचक्रा' ही गाथा गावी व तिच्या शेवटीं असौ ह्या पदाच्या जागीं, ज्या नदीच्या जवळ यजमानाची वस्ती असेल तिचें संबोधनांत नांव उच्चारावें. जसें 'निविष्टचक्रा गंगे, निविष्टचक्रा तापि' वगैरे म्हणावें ॥ ७ ॥

**ब्राह्मण्यश्च वृद्धा जीवपत्न्यो जीवप्रजा यद्यदुपदिशेयुस्तत्तत्कुर्युः ॥ ८ ॥**

ह्याशिवाय, पति व प्रजा जिवंत असलेल्या म्हाताऱ्या ब्राह्मणी, ओटी भरणें वगैरे जे जे सोहाळे करावे असा उपदेश करतील ते तेही करावे. येथें शिष्टाचार व कुलाचार ह्यांना मान दिला आहे. नंतर स्विष्टकृदादि कर्मशेष संपवावें ॥ ८ ॥

**ऋषभो दक्षिणा ॥ ९ ॥ ॥ १४ ॥**

ह्यानंतर कर्मपूर्त्यर्थ, प्रजोत्पादनसमर्थ ( तरुण ) असा बैल ब्रह्याला किंवा तो नसल्यास दुसऱ्या ब्राह्मणाला दक्षिणा म्हणून द्यावा, 'अस्यै

मे ( माझ्या ) पुत्रकामाये ' वगैरे मन्त्रार्थावरून पाहतां हें कृत्य स्वत. पतीनेंच करावें, असें ठरतें. येथे चवदावी कंडिका समाप्त. हीमध्ये एकदर ९ सूत्रानी सीमन्तोन्नयन सांगितलें आहे ॥ ९ ॥ ॥ १४ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका १५ वी.

*पुढच्या कंडिकेनें मुख्यतः जातकर्म, नामकरण व अन्नप्राशन हे तीन* संस्कार सांगतात.

**कुमारं जातं पुराऽन्यैरालम्भात्सर्पिर्मधुनी हिरण्यनिकापं हिरण्येन प्राशयेत् । प्रते ददामि मधुनो घृतस्य वेदं सवित्रा प्रसूतं मघोनाम् । आयुष्मान्गुप्तो देवताभिः शतं जीव शरदो लोके अस्मिन्निति ॥ १ ॥**

आता जातकर्मास आरभ करतात, सुईण वगैरे नेमलेल्या व्यक्तीशिवाय इतराचा स्पर्श होण्यापूर्वीच बापानें जन्मलेल्या मुलाचें जातकर्म करावें तें असें तुपात व मधात सोनें ( किंचित् ) उगाळून ते, सोन्याच्याच आगठी वगैरेनें, प्रतेददामिपासून लोकेअस्मिन्पर्यंत असलेला सूत्रोक्त मत्र म्हणून आईच्या मांडीवर असलेल्या मुलाला चाटवावें. हें कृत्य अमंत्रक, मुलीचेही करावें, असे मनुस्मृतींत म्हटलें असून आचार्यास इष्ट आहे. दुसरे काहीं लोक मुलीचे जातकर्म करू नये म्हणतात. सूत्रारंभींचे कुमार ( मुलगा ) हें पद पुढें अनुवृत्ति नेण्याकरिता असल्यामुळें पुढें ( १-१९-१ ) अनुवृत्ति जाऊन फक्त मुलाचाच उपनयनसंस्कार करावा, मुलीचा करू नये असें ठरतें; नाहींतर जातिग्रहण असता लिंगाची विवक्षा, 'ब्राह्मणो न हन्तव्य ' ( ब्राह्मण किंवा ब्राह्मणी मारू नये ) वगैरे ठिकाणीं होत नसल्यामुळें तेथल्या ( गृ. १-१९-१ मध्ये )

ब्राह्मणपदानें कुमारीची निवृत्ति झाली नसती. त्याचप्रमाणें 'जातम्' (जन्मलेला) हें पदही अनुवृत्तिकरतांच आहे त्यामुळें, पुढें 'गोदानं षोडशे वर्षे' येथें जन्मापासून सोळाव्या वर्षी गोदान करावें, असा निर्णय करतां येतो ॥ १ ॥

**कर्णयोरुपनिधाय मेधाजननं जपति। मेधां ते देवः सविता मेधां देवी सरस्वती। मेधां ते अश्विनौ देवावाधत्तां पुष्करस्रजाविति ॥ २ ॥**

बालकाच्या कानावर सुवर्ण ठेवून, मेधांतेपासून पुष्करस्रजौ पर्यंत असलेला सूत्रोक्त मेधाजनन (बुद्धयुत्पादक) नांवाचा मंत्र, त्याच्या तोंडाजवळ तोंड नेऊन म्हणावा. एथें एकदांच मंत्र म्हणावा असा एक पक्ष असून प्रत्येक कानाच्या वेळेस मंत्रावृत्ति करावी असें दुसऱ्यांचें म्हणणें आहे ॥ २ ॥

**अंसावभिमृशति। अश्माभव परशुर्भव हिरण्यमस्तृतं भव। वेदो वै पुत्रनामासि स जीव शरदः शतमिति। इन्द्र श्रेष्ठानि द्रविणानि धेह्यस्मे प्रयन्धि मघवन्नृजीपिन्निति च ॥ ३ ॥**

ह्यानंतर, अश्माभवपासून शरदः शतम्पर्यंत असलेला सूत्रोक्त मंत्र आणि 'इन्द्रश्रेष्ठानि द्रवि०' व 'अस्मे प्रयन्धि मघवन्०' ह्या दोन संहितोक्त ऋचा म्हणून मुलाच्या दोन्ही असांना (स्तन व बाहु यांचा सांधा) एकदम स्पर्श करावा, असें वृत्तिकारांचें म्हणणें आहे. एकदांच तिन्ही मंत्र म्हणून भार्याभिमर्शवत् आळीपाळीनें अंसस्पर्श करावे, असें कोणी म्हणतात; व सूत्रोक्त मंत्रानें उजव्या अंसास स्पर्श करून पुढच्या दोन ऋचांनीं डाव्यास स्पर्श करावा, कारण मध्यें 'इति' हें पद आहे, असें दुसरे कोहीं लोक म्हणतात. त्या तिहींपैकीं कोणत्याही पक्षानें

असाभिमर्शन केलें असता दोष नाहीं, असें गृह्यसूत्राचे भाष्यकार देवस्वामी (देवरात) यांचें मत आहे. कारण प्रत्येक पक्षास काहींना काहीं तरी चांगला आधार आहे, परंतु भाष्यकाराचा कल मात्र वृत्तिमताकडेच आहे ॥ ३ ॥

## नाम चास्मै दद्युः ॥ ४ ॥

येथपासून नामकरण सांगण्यास सुरवात करतात. असो. नंतर व्यवहारसिद्धीकरता त्या मुलाचें नाव ठेवावें. सूत्रकारानें ह्या कृत्याचा काल सांगितला नाहीं, त्याकरिता, शास्त्रान्तरोक्त काल घ्यावा.

**'नामधेयं दशम्यां तु द्वादश्यां वापि कारयेत्। पुण्ये तिथौ मुहूर्ते वा नक्षत्रे वा गुणान्विते'** म्हणजे जन्मापासून दहाव्या किंवा बाराव्या तिथीस अथवा पुढें शुभतिथि शुभमुहूर्त किंवा शुभनक्षत्रावर मुलाचें नामकरण करावें, असें मनुस्मृतींत (अ २।३० ) म्हटलें आहे हल्लीं प्राय बाराव्या दिवशी नाव ठेवतात ॥ ४ ॥

## घोषवदाद्यन्तरन्तस्थमभिनिष्ठानान्तं द्व्यक्षरम् ॥ ५ ॥

घोषवाह्यप्रयत्नवान् वर्ण, ज्याच्या आरंभीं आहे आणि ज्यांत यरलव ह्या अंतस्थापैकीं वर्ण आहे व शेवटीं विसर्ग ( अभिनिष्ठान ) असून जें दोन अक्षरी आहे, असें देव, हरि, रुद्र, वगैरे मुलाचें नाव ठेवावें. कख, चछ, टठ, तथ, पफ आणि शषस हे अघोषवर्ण सोडून बाकीचीं व्यञ्जनें घोषवान् समजावीं. 'अघोषा खयशर, शेषा वर्णाघोषा स्मृता बुधै' असा, पाणिनीय परिभाषेनें, घोषा अघोषाचा संग्रह होईल ॥ ५ ॥

## चतुरक्षरं वा ॥ ६ ॥

किंवा वरच्या लक्षणांनीं युक्त असें चार अक्षरीं, देवदत्त, महादेव, भवनाथ वगैरे नाव ठेवावें ॥ ६ ॥

वरच्या दोन प्रकारच्या नामकरणाचीं इच्छाभेदाने, भिन्नभिन्न फळें पुढच्या सूत्रानें सांगतात

**द्व्यक्षरं प्रतिष्ठाकामश्चतुरक्षरं ब्रह्मवर्चसकामः ॥ ७ ॥**

वरच्यापेक्षां दोन अक्षरीं नाव, मुलगा प्रतिष्ठायुक्त म्हणजे वशवृद्धीनें युक्त व्हावा अशी इच्छा असल्यास ठेवावें, व मुलगा ब्रह्मवर्चसानें म्हणजे विद्यातपोवृद्धीने प्रसिद्ध व्हावा अशी इच्छा असल्यास चार अक्षरीं नाव ठेवावं ॥ ७ ॥

**युग्मानि त्वेव पुंसाम् ॥ ८ ॥**

अथवा, वरचे घोषवदादि वगैरे नियम न पाळता फक्त समाक्षरयुक्तच मुलाचीं नावें ठेवावीं म्हणजे झालें अर्थात् मागचे नियम कामनाविशेषा करिता आहेत असें ठरतें ह्या सूत्राप्रमाणें, राम, दत्त, कृष्ण, नारायण, चिंतामणि वगैरे नावें ठेवावीं असे ठरतें ॥ ८ ॥

**अयुजानि स्त्रीणाम् ॥ ९ ॥**

मुलींचीं नावें, शारदा, सुभद्रा, सावित्री, कीर्तिमालिनी वगैरे विषमाक्षरानीं युक्त अशीं ठेवावीं ॥ ९ ॥

**[अभिवादनीयं च समीक्षेत तन्मातापितरौ विद्यातामोपनयनात् ॥ १० ॥]**

मागच्या सूत्रानीं सांगितल्याप्रमाणें व्यावहारिक नाव ठेवल्यावर ह्याशिवाय अभिवादनाच्या वेळचें दुसरें नावही ( सध्येंतल नाव, नाक्षत्रनाम ) पाहून ठेवावें तें नाव, मुलाचें उपनयन होईपर्यंत फक्त आईबापाना मात्र माहीत असावें, मुंजीच्या वेळेस मुलाला कळवितात हल्लीं हें नाव, बहुधा नक्षत्राच्या ज्या चरणावर जन्म होईल त्याला अनुसरून, ' चूचेचोला अश्विनी ' वगैरे ज्योतिःशास्त्रोक्त आद्याक्षरानीं युक्त असेंच ठेवतात अधिक माहिती आमच्या सार्थवेदाङ्गज्यौतिषात पहावी ॥ १० ॥

प्रवासादेत्य पुत्रस्य शिरः परिगृह्य जपति। अङ्गादङ्गात्सम्भ-
सि हृदयादधिजायसे। आत्मा वै पुत्रनामासि स जीव शरदःश-
मिति मूर्धनि त्रिरवघ्राय ॥ ११ ॥

प्रवासाहून घरी आल्यावर मुलाचें मस्तक सर्व बाजूंनीं हातात धरून तीनदां हुंगावें व नंतर 'अंगादंगात् वगैरे शरदःशतमूपर्यंत असलेला सूत्रोक्त मंत्र जपावा ॥ ११ ॥

आवृतैव कुमार्यै ॥ १२ ॥ ॥ १५ ॥

हें मस्तकावघ्राण मुलीच्या विषयांत अमंत्रक करावें, असे एक मत असून, हें व ह्यापूर्वीचें जातकर्मादिकही मुलीचें अमंत्रक करावें असा ह्या सूत्राचा अर्थ आहे, असें मुख्य मत आहे. येथें पंधरावी कंडिका संपली. हीमध्यें सूत्रें बारा आहेत ॥ १२ ॥ ॥ १५ ॥

## अध्याय १ ला—कंडिका १६ वी

षष्ठे मास्यन्नप्राशनम् ॥ १ ॥

जन्मापासून सहाव्या महिन्यात मुलाचा अन्नप्राशन संस्कार करावा ॥ १ ॥

आजमन्नाद्यकामः ॥ २ ॥

मुलाला, अन्नपान वगैरेची समृद्धि व्हावी अशी इच्छा असल्यास अन्ना-बरोबर बोकडाच्या मांसाचें तोडीं लावणेंही चाटवावें. पुढच्या सूत्रात 'तैत्तिर' ( टिव्याचें मास ) असे पद असल्यामुळें येथे त्याच्या शेजा-रामुळे अजमांस असा अर्थ होतो ॥ २ ॥

तैत्तिरं ब्रह्मवर्चसकामः ॥ ३ ॥

मुलाचें ब्रह्मतेज वाढावे अशी कामना असल्यास अन्नासह तित्तिरपक्षाचे ( टिटवा ) मांसही तोंडीं लावण्यास द्यावे लोकांत मांस हें मुख्यान्न नसल्यामुळें वृत्त्यनुसार येथे तोंडीं लावणें असा अर्थ केला ॥ ३ ॥

घृतौदनं तेजस्कामः ॥ ४ ॥

मूल तेजस्वी व्हावें अशी इच्छा असल्यास, चुलीवरून उतरायच्या वेळेस आंत तूप टाकून संस्कृत केलेला भात चारावा आरंभींच तूप घातल्यास तांदूळ मऊ होणार नाहींत म्हणून हा केलेलाच अर्थ युक्त आहे ह्या वरच्या दोन सूत्रांवरून, सूत्रकालीं, विधिप्रयुक्त मांसाहाराबद्दल बिलकूल शंका वाटत नसावी असे दिसून येते शिवाय क्षत्रियादिकांत मांसभक्षण चालूच असावें ॥ ४ ॥

दधिमधुघृतमिश्रमन्नं प्राशयेत् । अन्नपतेऽन्नस्यनोदेह्यनमीवस्य शुष्मिणः । प्र प्रदातारं तारिष ऊर्जं नोधेहि द्विपदे चतुष्पद इति ॥ ५ ॥

वरच्यापैकीं कोणत्याही अन्नांत दहीं, मध व तूप मिश्रित करून ते अन्न, 'अन्नपतेपासून चतुष्पदे' पर्यंत असलेला वरचा मंत्र म्हणून मुलाला पाजावें ॥ ५ ॥

आवृतैव कुमार्यै ॥ ६ ॥ ॥ १६ ॥

कुमारीचें ( मुलगी ) ही ह्याप्रमाणेंच परंतु मंत्ररहित असें, अन्नप्राशन करावें येथे १६वी कंडिका संपली हीमध्यें एकंदर सहा सूत्रें आहेत ॥ ६ ॥ ॥ १६ ॥

## अध्याय १ ला—कंडिका १७ वी.

**तृतीये वर्षे चौलं यथाकुलधर्मं वा ॥ १ ॥**

जन्मापासून तिसऱ्या वर्षी मुलाचा चौलसंस्कार करावा, किंवा आपला कुलाचार असेल त्यावेळी करावा. कोणाच्या शाखेंत उपनयनाबरोबर हा विधि सांगितला आहे. म्हणून हा दुसरा पक्ष सांगितला आहे. हल्लीं बहुतेक ठिकाणीं हा दुसराच पक्ष चालू आहे ॥ १ ॥

**उत्तरतोऽग्नेर्व्रीहियवमाषतिलानां पृथक्पूर्णशरावाणि निदधाति ॥ २ ॥**

ह्या कर्मांत प्रणीताप्रणयनापर्यंत विधि झाल्यावर, अग्नीच्या उत्तरेस भात ( साळी ) सातू उडीद व तीळ ह्यांचे चार परळ ( किंवा द्रोण ) वेगवेगळे पूर्ण भरून ठेवावे ॥ २ ॥

**पश्चात्कारयिष्यमाणो मातुरुपस्थ आनडुहं गोमयं नवे शरावे शमीपर्णानि चोपनिहितानि भवन्ति ॥ ३ ॥**

तसेंच अग्नीच्या पश्चिमेस आईच्या मांडीवर सत्कार्य कुमार बसलेला असावा व तिच्याजवळच एका कोऱ्या परळांत बैलाचें शेण, व दुसऱ्या तशाच परळांत शमीचीं पानें आणून ठेवलेलीं असावीं ॥ ३ ॥

**मातुः पिता दक्षिणत एकविंशतिकुशपिञ्जूलान्यादाय ॥ ४ ॥**

तसेंच आईच्या दक्षिण बाजूला कुमाराचा बाप हातांत एकवीस दर्भांचे अंकुर घेऊन बसलेला असावा ॥ ४ ॥

**ब्रह्मा वैतानि धारयेत् ॥ ५ ॥**

किंवा ब्रह्मा असल्यास त्यानें हे २१ दर्भ घेऊन आपल्या जागीं असावें. ह्यानंतर ' अग्न आयूंषि ' वगैरे पूर्वोक्त ( गृ० अ० १—४—४ पहा ) चार आहुतींचा होम करावा ॥ ५ ॥

**पश्चात्कारयिष्यमाणस्यावस्थाय शीतोष्णा अपः समानीयोष्णेन वाय उदकेनेहीति ॥ ६ ॥**

ह्यापुढें पित्यानें कुमाराच्या मागें उभें राहून ' उष्णेन वाय उदकेनेहि ' हा मंत्र म्हणून थंड व उष्ण पाणी एका पात्रांत ओतावें ॥ ६ ॥

**तासां गृहीत्वा नवनीतं दधिद्रप्सान्वा प्रदक्षिणं शिरस्त्रिरुन्दति । अदितिः केशान्वपत्वापउन्दतु वर्चस इति ॥ ७ ॥**

त्या पाण्यांतील थोडेंसें पाणी व लोणी किंवा सायीच्यासकट दह्याच्या कवड्या घेऊन, मुलाच्या डोक्यास प्रदक्षिणाकृति 'अदितिः केशान्वपत्वापउन्दतु वर्चसे ' हा मंत्र म्हणून तीनदां चोळावें प्रत्येक वेळीं मंत्रावृत्ति करावी ॥ ७ ॥

**दक्षिणे केशपक्षे त्रीणि त्रीणि कुशपिञ्जूलान्यभ्यात्माग्राणि निदधाति ओषधे त्रायस्वैनमिति ॥ ८ ॥**

नंतर मागें घेतलेल्या २१ दर्भांपैकीं तीन दर्भ घेऊन मुलाच्या दक्षिणबाजूच्या ( उजव्या ) केशांवर, ' ओषधे त्रायस्वैनम् ' ( हे औषधि, ह्याचें रक्षण कर ) असा मंत्र म्हणून आपल्याकडे अग्रें करून ठेवावें ( धरावें ) ॥ ८ ॥

**स्वधिते मैनं हिंसीरिति निष्पीडयति लोहेन क्षुरेण ॥ ९ ॥**

ह्यापुढें, ' स्वधिते मैनं हिंसी ( शस्त्रा ! ह्याला पीडा करूं नको ) हा मंत्र म्हणून तांब्याच्या वस्तऱ्यानें ते तीन दर्भ किंचित् दाबावे लोखंडी लोखंडी वस्तराच प्रसिद्ध असतां, येथें लोहपद घातलें आहे, तें भिन्नार्थद्योतनाकरितां आहे, म्हणून इतर शास्त्राप्रमाणें लोहपदाचा अर्थ तांबें असा, येथें करावा, कारण लोहशब्द सामान्य धातुवाचकही आहे ॥ ९ ॥

**प्रच्छिनत्ति । येनावपत्सविता क्षुरेण सोमस्य राज्ञो वरुणस्य विद्वान् । तेन ब्रह्माणो वपतेदमस्यायुष्मानजरदष्टिर्यथा सदिति ॥ १० ॥**

नतर येनावपत्‌पासून यथासत्‌पर्यंन वर दिलेला मत्र म्हणून झटकन्‌ ते तीन दर्भ कापावे. ह्याबरोबर खालच्या जावळ्याचे काहीं केसही कापावे असें गृह्यकारिकाकार म्हणतात ॥ १० ॥

**प्रच्छिद्य प्रच्छिद्य प्रागग्राञ्छमीपर्णैःसह मात्रे प्रयच्छति तानानडुहे गोमये निदधाति ॥ ११ ॥**

ह्याप्रमाणें पिता दर्भ कापकापून शमीपर्णासह, पूर्वाग्र असे मातेच्या ओंजळींत देतो व ती नतर ते दर्भ, समोरच्या बैलाच्या शेणावर ठेवते. येथे पूर्वाग्रच ठेवावे असा नेम नाहीं ॥ ११ ॥

**येन धाता बृहस्पतेरग्नेरिन्द्रस्य चायुषेऽवपत्‌ । तेन त आयुषे वपामि सुश्लोक्याय स्वस्तय इति द्वितीयम्‌ । येन भूयश्च रात्र्यां ज्योक्च पश्याति सूर्यम्‌ । तेन त आयुषे वपामि सुश्लोक्याय स्वस्तय इति तृतीयम्‌ ॥ १२ ॥**

मागच्या प्रमाणेच दुसऱ्यादा तीन दर्भ ठेवून त्याचें छेदन येनधातापासून सुश्लोक्याय स्वस्तयेपर्यंतच्या मत्राने करावें, व तिसऱ्यादा तीन दर्भ ठेवून त्याचे छेदन ( वपन ) 'येन भूय० स्वस्तये' ह्या मत्राने करावे ॥ १२ ॥

**सर्वैर्मन्त्रैश्चतुर्थम्‌ ॥ १३ ॥**

नतर येनावपत्‌ वगैरे तिन्ही मत्र एकदम म्हणून चवथ्यादा ठेवलेल्या तीन दर्भांचे छेदन करावें ॥ १३ ॥

**एवमुत्तरतस्त्रिः ॥ १४ ॥**

ह्याचप्रमाणें उत्तर बाजूच्या ( डाव्या ) केसावरही समत्रक तीनदा तीन तीन दर्भ तोडावे. त्यावेळीं चवथी सर्वमत्राची पाळी करू नये. ह्याप्रमाणें एकवीस दर्भांची वाट लागली ॥ १४ ॥

**क्षुरतेजो निमृजेत्। यत्क्षुरेण मर्चयता सुपेशसा वप्ता वपसि केशान्। शुन्धि शिरो मास्यायुः प्रमोषीरिति ॥ १५ ॥**

नंतर 'यत्क्षुरेण० प्रमोषी' ह्या मंत्रानें शेंड्यापासून मुळापर्यंत वस्तऱ्याची धार पुसून धुवावी ॥ १५ ॥

**नापितं शिष्याच्छीतोष्णाभिरद्भिरनर्थं कुर्वाणोऽक्षुण्वन्कुशलीकुर्विति ॥ १६ ॥**

ह्यापुढें 'शीतोष्णाभिरद्भिरनर्थं कुर्वाणोऽक्षुण्वन्कुशलीकुरु' ( हे कारागिरा ! पूर्वोक्त शीतोष्ण पाणी लावून न कापता ह्या मुलाचें केशवपन कर ) अशा वाक्यानें न्हाव्याला आज्ञा द्यावी व त्यानें मागें तयार केलेलें शीतोष्ण उदक लावून मुलाचें मुण्डन करावें ॥ १६ ॥

**यथाकुलधर्मं केशवेशान्कारयेत् ॥ १७ ॥**

ह्यावेळीं, आपला कुलधर्म असेल त्याप्रमाणें एक, तीन किंवा पांच शेंड्या न्हाव्याकडून ठेवाव्या. कुमाराचें गोत्र जितक्या प्रवराचें असेल तितक्या राखाव्या असा येथें कुलधर्मपदाचा अभिप्राय आहे, ह्यानंतर स्विष्टकृत् वगैरे होमशेष संपवावा ॥ १७ ॥

**आवृतैव कुमार्यै ॥ १८ ॥ ॥ १७ ॥**

हें कृत्य कुमारीचेंही अमंत्रक असें करावें. त्यांत होमही अमंत्रक करावा असें कांहींचें मत असून, होम करूंच नये असें बहुमत आहे. हल्लीं बहुधा मुलींचा हा संस्कार प्रचारांत नाहीं. येथें हा पहिल्या अध्यायाची १७ वी कंडिका संपली. हीं १८ सूत्रांनीं चौल म्हणजे शेंडी राखणें हा संस्कार सांगितला ॥ १८ ॥ ॥ १७ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका १८ वी.

### एतेन गोदानम् ॥ १ ॥

ह्या पूर्वोक्त चौलसंस्कारानेंच बहुतेक गोदाननावाचा संस्कार सांगितल्यासारखा झाला. ह्याचे विशेष फरक ह्यापुढें आहेत ॥ १ ॥

### षोडशे वर्षे ॥ २ ॥

मात्र गोदानसंस्कार सोळाव्या वर्षी करावा. ह्यावेळीं अर्थात् अयोग्यतेमुळे आईच्या मांडीवर मुलास बसवूं नये ॥ २ ॥

### केशशब्देतु श्मश्रुशब्दान्कारयेत् ॥ ३ ॥

तसेंच चौलविधींतल्या केशशब्दाचे जागीं गोदानात श्मश्रुशब्द घालावा म्हणजे, 'अदिति केशान्वपतु' 'यत्ना वपसि केशान्' व दक्षिणे केशपक्षे ह्याजागीं 'अदिति श्मश्रूणि वपतु' 'यत्ना वपसि श्मश्रूणि' आणि 'दक्षिणे श्मश्रुपक्षे' असे ऊह करावे. वर 'श्मश्रुशब्दान्' असे बहुवचन असल्यामुळे त्याच्या उपपत्तीकरिता, तिसरा केशशब्द 'केशपक्षे' ह्या सूत्रस्थच घेतला आहे. ( १-१७-८ पहा ) कारण मंत्रात नाहीं ॥ ३ ॥

### श्मश्रूणीहोन्दति ॥ ४ ॥

ह्या ( गोदान ) विधींत नवनीत वगैरे दाढीमिशानाच चोळावें ॥ ४ ॥

### शुन्धि शिरो मुखं मास्यायुः प्रमोषीरिति ॥ ५ ॥

क्षुरनिमार्जनाच्या ( स्वच्छ करणें ) मंत्रात उत्तरार्धामध्यें, वरच्यासारखा फरक करावा म्हणजे 'शिरो' व 'मास्यायु' ह्यामध्ये मुख हे पद जास्ती घालावें ॥ ५ ॥

### केशश्मश्रुलोमनखान्युदक्संस्थानि कुर्वीति संप्रेष्यति ॥ ६ ॥

न्हाव्याला प्रेष ( आज्ञा ) देताना, 'शीतोष्णाभिरद्भिरत्रर्थं कुर्वाणोऽक्षुण्वन्केशश्मश्रुलोमनखान्युदक्संस्थानि कुशलीकुरु' असा फरक करावा.

ह्याचा अर्थ 'हे न्हाव्या! हें शीतोष्ण जल लावून ह्या ब्रह्मचाऱ्याचीं केश, दाढीमिशा, आणि नखें ह्याचें उत्तम प्रकारें व उदक्संस्थ (उत्तरेकडे समाप्ति होणारें) असे वपन कर ॥ ६ ॥

आप्लुत्य वाग्यतः स्थित्वाहःशेषमाचार्यसकाशे वाचं विसृजेत वरं ददामीति ॥ ७ ॥

वपन झाल्यावर त्या ब्रह्मचाऱ्याने स्नान करून, दिवस सपेपर्यंत मौनानें उभें रहावें व सूर्यास्तानंतर आचार्याजवळ (गुरु) जाऊन 'वरं ददामि०' (आपलें इच्छित देतों) असें म्हणून नंतर मौन सोडावें ॥ ७ ॥

गोमिथुनं दक्षिणा ॥ ८ ॥

एक गाईचा जोडा (१ गाय व १ बैल) ही दक्षिणा गुरूला अर्पण करणें म्हणजेच येथील वरदान होय. ह्यामुळेंही प्रकृतसंस्काराला गोदान हें नाव जमतें ॥ ८ ॥

संवत्सरमादिशेत् ॥ ९ ॥ ॥ १८ ॥

दुसरे दिवशी गोमिथुन दिल्यावर गुरूनें त्याला पुढें उपनयनात सांगितल्याप्रमाणें पुन्हा एक संवत्सरपर्यंत ब्रह्मचर्यव्रत पाळण्याची आज्ञा द्यावी. गोदान म्हणजे केशान्त किंवा केशवपन ज्या कर्मात होतें तो संस्कार होय कारण गोशब्द केशवाचक असून दान शब्द खंडनार्थकही (दो' अवखण्डने दिवादि, दाप्‌लवने अदादि) आहे. येथे अष्टार्थी पंडितांचा संमती. हीमध्यें ९ सूत्रांनी गोदानविधीचा संक्षेप आहे ॥ ९ ॥ ॥ १८ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका १९ वी.

**अष्टमे वर्षे ब्राह्मणमुपनयेत् ॥ १ ॥**

ब्राह्मणाच्या मुलाच्या जन्मापासून आठव्या वर्षी, त्याचा उपनयन ( मुंज ) नांवाचा संस्कार करावा. १५ व्या कंडिकेतील १ल्या सूत्रांतून येथें 'कुमारम्' अशी अनुवृत्ति येत असल्यामुळें, हा व ह्यापुढचे व्रतरूप संस्कार मुलीचे होत नाहींत असे दिसते, व इतर स्मृतींतही **'वैवाहिको विधिःस्त्रीणामौपनायनिकः स्मृतः'** असे म्हटलें आहे ॥ १ ॥

**गर्भाष्टमे वा ॥ २ ॥**

अथवा गर्भधारणेपासून आठव्या वर्षी ब्राह्मणबटूचें उपनयन करावें ॥ २ ॥

**एकादशे क्षत्रियम् ॥ ३ ॥**

जन्मापासून किंवा गर्भापासून अकराव्या वर्षी क्षत्रियकुमाराचा उपनयन-संस्कार करावा ॥ ३ ॥

**द्वादशे वैश्यम् ॥ ४ ॥**

जन्मापासून किंवा गर्भापासून बाराव्या वर्षी वैश्याचे उपनयन करावें ॥ ४ ॥

**आषोडशाद्ब्राह्मणस्यानतीतः कालः ॥ ५ ॥**

सोळाव्या वर्षापर्यंत ब्राह्मणाच्या मुंजीचा अतिक्रांत न झालेला ( सवलतीचा ) काल समजावा ॥ ५ ॥

**आद्वाविंशात्क्षत्रियस्याऽऽचतुर्विंशाद्वैश्यस्यात ऊर्ध्वं पतितसावित्रीका भवन्ति ॥ ६ ॥**

बाविसाव्या वर्षापर्यंत क्षत्रियाची मुंज केल्यास चालेल, तसेंच चोविसाव्या वर्षापर्यंत वैश्यकुमाराच्या उपनयनाची मर्यादा आहे. ह्या सवलतीच्या मुदतीनंतर मात्र ते कुमार पतितसावित्रीक ( गायत्रीभ्रष्ट झालेले ) होतात. 'पतितसावित्रीक उद्दालकव्रतं चरेत्'= पतितसावित्रीक झालेल्यानें उद्दालक नावाचें शास्त्रोक्त व्रत प्रायश्चित्त म्हणून करावें ह्या शास्त्रविधीकरता ' पतितसावित्रीक ' ही संज्ञा सांगितली आहे आणखी ह्या सूत्रात ' अत ऊर्ध्वम् ' ( ह्यानंतर ) असे म्हटलें आहे तें, वर निर्दिष्ट केलेल्या वर्षांसुद्धा मर्यादाकाल आहे हें सुचविण्याकरता आहे. म्हणजे १६वें वर्ष संपेपर्यंत ब्राह्मणाची मुंज केल्यास चालते वगैरे अर्थ समजावे ॥ ६ ॥

**नैनानुपनयेन्नाध्यापयेन्न याजयेन्नैभिर्व्यवहरेयुः ॥ ७ ॥**

त्या पतितसावित्रीक पुरुषानीं प्रायश्चित्त घेतल्याशिवाय, त्याचें उपनयन करू नये, त्याना वेद शिकवू नये व त्याच्याशीं रोटीबेटीव्यवहार वगैरे वगैरे संबंध ठेवू नयेत कारण ते व्रात्य म्हणजे संस्कारहीन असतात. त्याच्या शुद्धीकरता प्र यातरीं (आथर्वणवेदात) व्रात्यस्तोमही सांगितला आहे. ह्या सूत्रात ' अचीर्णप्रायश्चित्तान् ' ( प्रायश्चित्त न केलेले ) असा शेष, शास्त्रान्तरास अनुसरून अवश्य मानला पाहिजे ॥ ७ ॥

**अलंकृतं कुमारं कुशलीकृतशिरसमहतेन वाससा संवीतमैणेयेन वाऽजिनेन ब्राह्मणं, रौरवेण क्षत्रियमाजेन वैश्यम् ॥ ८ ॥**

कुमाराला अलंकार घालावे त्याचें मुंडन करवावें नंतर स्नान झाल्यावर, पूर्वी एकदाही न वापरलेल्या कोऱ्या वस्त्रानें त्याचे अंग वेष्टित करावें म्हणजे तें वस्त्र पांघरवावें अथवा वस्त्राऐवजीं ब्राह्मणाच्या मुलास हरिणाचें कातडें पांघरण्यास द्यावें, क्षत्रियकुमाराला रुरूचें ( रोही हरिण ) कातडें पांघरण्यास द्यावें आणि वैश्याचे मुलास बोकडाचें चामडें पांघरण्यास

घ्यावें, सूत्रांत ' वा ' ( विकल्प ) हा शब्द असल्यानें वस्त्र घ्यावें किंवा कातडीं पांघरावीं असे दोन पक्ष आहेत. ह्या संस्काराच्या पूर्वदिवशीं आभ्युदायिक श्राद्ध ( नांदीश्राद्ध ) करावें असें कुमारिलकृत गृह्यकारिकांमध्यें आहे ॥ ८ ॥

**यदि वासांसि वसीरन्रक्तानि वसीरन् काषायं ब्राह्मणो माञ्जिष्ठं क्षत्रियो हारिद्रं वैश्यः ॥ ९ ॥**

जर कुमारांना रंगविलेलीं वस्त्रें नेसविणें असेल तर ह्याप्रमाणे नेसावीं. ब्राह्मणकुमारानें, भगवें वस्त्र नेसावें, क्षत्रियानें कुसुंब्यानें रंगविलेलें ( लाल ) वस्त्र नेसावें, व वैश्यकुमाराने हळदीने रंगविलेले ( पिवळे ) वस्त्र नेसावें. येथे ' वसीरन् ' ह्या पदाची पुनरावृत्ति करून वस्त्रें नेसविणें अवश्य आहे हें बोधित केलें, आणि ' यदि ' ह्या 'पदानें, **सर्वेषां कार्पासं वाऽविकृतम्'** ( अथवा सर्व जातीच्या कुमारानीं शुद्ध कापसाचेंच वस्त्र नेसावें ) ह्या गौतमस्मृतींतल्या दुसऱ्या पक्षालाही वाव ठेविली आहे, असा सूत्राचा सरळ अर्थ मला दिसतो. आता वृत्तिव्याख्या देतो. वृत्तिकार म्हणतात, ' वासासि वसीरन् ' येथें सूत्रच्छेद करणे इष्ट आहे त्यामुळें वस्त्र नेसविणें अवश्य आहे. नंतर ' यदि ' हे पद ' यदि रक्तानि वसीरन् ' ( जर रंगविलेलीं नेसलें तर ) असे पुढें अन्वित करावें. त्यामुळे पक्षीं पांढरे वस्त्र नेसावें असेंही ठरतें. ह्या विवरणात, सूत्रभेदाचें गौरव व यदीची ओढाताण करावी लागते; परंतु वस्त्रें नेसविणें ( निदान लंगोटी तरी ) आचारप्राप्त असून ते ह्या पक्षाला अनुकूल आहे. पहिल्या पक्षींही रक्तानिपर्यंत वाक्यान्वय केल्यामुळें, दोष न राहतां, अन्वयही सरळ राहतो ॥ ९ ॥

**तेषां मेखलाः ॥ १० ॥**

त्या कुमाराच्या मेखला ( कडदोरे, करगोटे ) क्रमाने सांगतो ॥१०॥

**मौञ्जी ब्राह्मणस्य, धनुर्ज्या क्षत्रियस्य, आवी वैश्यस्य ॥ ११ ॥**

ब्राह्मणाची मेखला मोळाची असावी, क्षत्रियाची धनुष्याच्या दोरीची ( मूर्वेलीची = मौर्वी ) असावी आणि वैश्यकुमाराची मेंढ्याच्या लोकरीची करावी मौंजी, ब्राह्मणाशिवाय दुसऱ्याना चालायची नाहीं, ब्राह्मणानें मौंजी किंवा पुढच्या व्याच्या व क्षत्रियानें धनुर्ज्या किंवा आवी करावी, आणि वैश्यानें फक्त एकच म्हणजे लोंकरीची करावी असे वृत्ति-व्याख्यान आहे हें बहुधा इतर शास्त्रास धरून असावें ॥ ११ ॥

**तेषां दण्डाः ॥ १२ ॥**

आता त्या कुमाराचे दड ( काठ्या ) क्रमानें सागतो ॥ १२ ॥

**पालाशो ब्राह्मणस्यौदुम्बरः क्षत्रियस्य बैल्वो वैश्यस्य केशसंमितो ब्राह्मणस्य ललाटसंमितः क्षत्रियस्य प्राणसंमितो वैश्यस्य ॥ १३ ॥ ॥ १९ ॥**

ब्राह्मणकुमाराचा दड पळसाचा असावा, क्षत्रियाचा दड उंबराचा असावा आणि वैश्यकुमाराचा दड बेलाच्या झाडाचा असावा. ब्राह्मणाचा दड, डोक्यावर केश उगवतात तितक्या उंचीचा असावा, क्षत्रियाचा दड त्याच्या कपाळाइतक्या उंचीचा असावा आणि वैश्यकुमाराचा दड प्राण वायु वाहतो तेथपर्यंत म्हणजे नाकाइतक्या उंचीचा असावा ह्या सूत्रातही अकराव्या सूत्रातल्या मेखलाप्रमाणेंच ब्राह्मणाला स्वतःच्या किंवा पुढच्या दोघाचे दड चालतील व क्षत्रियाला स्वतःचा किंवा त्या पुढच्या वैश्याचाही दड चालेल येथें ह्या अध्यायातली १९वी कंडिका संपली. हींत सूत्रें १३ आहेत ॥ १३ ॥ ॥ १९ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका २० वी.

सर्वे वा सर्वेषाम् ॥ १ ॥

अथवा सर्व जातींचे दंड तीनही वर्णांना चालतील ॥ १ ॥

समन्वारब्धे हुत्वोत्तरतोऽग्नेः प्राङ्मुख आचार्योऽवतिष्ठते ॥ २ ॥

आज्यपात्राचें, बर्हीवर स्थापन होईपर्यंतचें कृत्य संपल्यानंतर, ब्रह्मचाऱ्यानें आचार्यहस्त्यास दुजोरा दिला असतां आधारान्त कृत्य करून आचार्यानें चौलोक्त चार आहुतींचा होम करावा ( १-४-३ पहा ) ह्यानंतर आचार्यानें अग्नीच्या उत्तरेस, पूर्वेकडे तोंड करून बसावें ॥ २ ॥

पुरस्तात्प्रत्यङ्मुख इतरः ॥ ३ ॥

नंतर, कुमारानें तीर्थांतून म्हणजे प्रणीतापात्राच्या पश्चिम बाजूनें पूर्वेकडे जाऊन आचार्यासमोर पश्चिमेकडे तोंड करून बसावें. कोणत्याही हालचालीमध्यें कुमार व अग्नि ह्यामध्यें आचार्यवगैरेचें व्यवधान नसावें ॥ ३ ॥

अपामञ्जली पूरयित्वा तत्सवितुर्वृणीमह इति पूर्णेनास्य पूर्णमवक्षारयत्यासिच्य, देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यां हस्तं गृह्णाम्यसाविति तस्य पाणिना पाणिं साङ्गुष्ठं गृह्णीयात् ॥ ४ ॥

नंतर आचार्यानें कुमाराची ओंजळ पाण्यानें भरून आपलीही ओंजळ दुसऱ्या कोणाकडून तरी भरावी व ' तत्सवितुर्वृणीमहे ' हा मंत्र ( ऋक्सं. ४-४-२५-१ ) म्हणून आपली जलपूर्ण ओंजळ मुलाच्या जलपूर्ण ओंजळीवर सोडून अवक्षारण ( पाणी गाळणे ) करावें. ह्यापुढें मुलानेंही आपली ओंजळ सोडून दिल्यावर आचार्यानें देवस्यत्वापासून हस्तं गृह्णामि-

पर्यंत सूत्रोक्त मंत्र म्हणून ‘ असौ ’ या पदाच्या जागीं गोविन्दशर्मन्, कृष्ण-वर्मन् वगैरे कुमाराचें संबोधनान्त नाव उच्चारावें व लागलीच त्याचा उजवा हात आपल्या उजव्या हातानें धरावा ॥ ४ ॥

**सविता ते हस्तमग्रभीदसाविति द्वितीयम्। अग्निराचार्यस्तवासाविति तृतीयम् ॥ ५ ॥**

त्यानंतर पूर्ववत् अञ्जलींचें पूरण व अवक्षारण पुन्हा करून सविता ते हस्तमग्रभीत् ( गोविन्दशर्मन् वगैरे ) हा मंत्र म्हणून पुन्हा हस्तग्रहण करावें आणि अग्निराचार्यस्तव ( कृष्णवर्मन् वगैरे ) हा मंत्र म्हणून तिसऱ्यानें पाणिग्रहण करावें. ‘ द्वितीय तृतीय ’ असें संख्या सांगण्याचें कारण, प्रथम हस्तग्रहणाप्रमाणेच अञ्जलिपूरणादिक धर्म यावे हें आहे ॥ ५ ॥

**आदित्यमीक्षयेत। देव सवितरेष ते ब्रह्मचारी तं गोपाय स मा मृतेत्याचार्यः ॥ ६ ॥**

पुढें आचार्यानें देव सवितर्पासून मामृतपर्यंत सूत्रोक्त मंत्र म्हणून ब्रह्मचाऱ्यास सूर्याचें दर्शन करवावें. येथें मंत्रार्थावरूनच मंत्रपठन आचार्यानें करावें हें समजून येत असताही पुन्हा ‘ आचार्य ’ हें जास्ती पद घालून दुसऱ्या ठिकाणीं ईक्षणमंत्र ब्रह्मचाऱ्यानें म्हणावा असें ज्ञापित केलें. त्यामुळें ‘ मित्रस्यत्वा चक्षुषा प्रतीक्षे ’ ( गृ. १।२४।१३ ) हा मंत्र ब्रह्मचाऱ्यानें ( वटु ) पठन करावा हें सिद्ध झालें ॥ ६ ॥

**कस्य ब्रह्मचार्यसि प्राणस्य ब्रह्मचार्यसि कस्त्वा कमुपनयते काय त्वा परिददामीति ॥ ७ ॥**

नंतर आचार्यानें कस्य वगैरे परिददामिपर्यंत सूत्रोक्त मंत्राचें पठन करून मनानें, प्रजापतीला वटूचें समर्पण करावें. ‘ काय त्वा परिददामि ’ ( मी प्रजापतीला तुझें अर्पण करतों ) हा मंत्रार्थावरून आचार्यानेंच हा मंत्र म्हणावा हें सिद्ध आहे ॥ ७ ॥

**युवा सुवासाः परिवीत आगादित्यर्धर्चेनैनं प्रदक्षिणमावर्तयेत् ॥ ८ ॥**

ह्यानंतर 'युवा सुवासाः' ही अर्धी ऋचा म्हणून त्या कुमाराला प्रदक्षिणाकृति फिरवून आपल्या समोर पूर्वाभिमुख उभा करावा ॥ ८ ॥

**तस्याध्यंसौ पाणी कृत्वा हृदयदेशमालभेतोत्तरेण ॥ ९ ॥**

पुढें त्याच्या दोन्ही खांद्यावरून आपले दोन्ही हात नेऊन 'तंधीरासः' हें त्या ऋचेचें उत्तरार्ध म्हणून त्याच्या हृदयप्रदेशाला स्पर्श करावा ॥ ९ ॥

**अग्निं परिसमुह्य ब्रह्मचारी तूष्णीं समिधमादध्यात्तूष्णीं वै प्राजापत्यं प्राजापत्यो ब्रह्मचारी भवतीति विज्ञायते ॥ १० ॥ २० ॥**

नंतर ब्रह्मचाऱ्यानें मंत्र न म्हणतांच त्या पूर्वोक्त अग्नीवर प्रजापतीच्या उद्देशानें समिध् टाकावी. कारण, प्रजापतिविषयक कृत्य नेहमीं अमंत्रकच असतें, व ब्रह्मचाऱ्याची देवता प्रजापति आहे अशी प्रत्यक्ष श्रुति आहे. म्हणून अमंत्रक समिध् द्यावी हे सांगणे बरोबर आहे. ह्या उपनयनाग्नि संस्कृतच असल्यामुळे येथे 'अग्निं परिसमुह्य' ह्याचा कांहीं उपयोग नाहीं, म्हणून तीं दोन पदे ब्रह्मचाऱ्यानें सकाळीं व संध्याकाळीं अग्नीला ज्या समिधा द्यावयाच्या त्यावेळीं पर्युक्षण परिसमूहनें करावीं हे सुचविण्याकरिता घातलीं आहेत. येथे विसावी कंडिका संपली. हीमध्ये एकंदर दहा सूत्रें आहेत ॥ १० ॥ ॥ २० ॥

## अध्याय १ ला—कण्डिका २१ वी.

**मन्त्रेण हैके अग्नये समिधमाहार्षं बृहते जातवेदसे। तया त्वमग्ने वर्धस्व समिधा ब्रह्मणा वयं स्वाहेति ॥ १ ॥**

दुसऱ्या कांहीं ऋषींचे मत, 'अग्नये समिधंपासून स्वाहापर्यंत' मंत्र

## अध्याय १ ला—कण्डिका २२ वी.

**मेखलामाबध्य दण्डं प्रदाय ब्रह्मचर्यमादिशेत् ॥ १ ॥**

पुढें बटूच्या कमरेला पूर्वोक्त मेखला बाधून व पालाशादिक दंड देऊन पुढें सागितल्याप्रमाणे त्याला ब्रह्मचर्यव्रत पाळण्याचा उपदेश करावा ॥ १ ॥

**ब्रह्मचार्यस्यपोऽशान, कर्म कुरु, दिवा मा स्वाप्सीराचार्याधीनो, वेदमधीष्वेति ॥ २ ॥**

तो उपदेश असा. तू ब्रह्मचारी आहेस म्हणजे विद्याप्राप्तीचें व्रत धारण करणारा आहेस हें लक्षात ठेव. मूत्रोत्सर्ग वगैरेंनीं अपवित्रता आल्यास शुद्ध्यर्थ आचमन करीत जा, म्हणजे कायिक, वाचिक व मानसिक शुद्धि ठेव असें सुचविलें. सध्योपासनादि विहित कर्म करीत जा. दिवसा झोंप घेऊ नको. नेहमीं आचार्यांच्या अधीन रहा म्हणजे त्याची आज्ञा घेतल्याशिवाय काहीं करू नको आणि नित्य वेदपठन कर ॥ २ ॥

**द्वादशवर्षाणि वेदब्रह्मचर्यम् ॥ ३ ॥**

एकेक वेदाचें अध्ययन करण्यास हें व्रत बारा वर्षें आचरावें. त्यानतर महानाम्न्यादि व्रतत्रय करून उपनयनापासून १६व्या वर्षी, शेवटचें गोदानव्रत आचरावें असा एक पक्ष असून तीं व्रतेंही ह्या १२ वर्षांतच आचरावीं व ह्यातच जन्मापासून १६व्या वर्षी गोदानव्रत करावें हा मुख्य पक्ष आहे.

मत्र आणि ब्राह्मणग्रथ ह्याना वेद अशी सज्ञा आहे. प्रत्येक वेदाच्या अध्ययननिमित्तक व्रताला १२ वर्षें म्हणजे चारी वेदांच्या अध्ययनाला एकदर ४८ वर्षें लागतात हें सुचविण्याकरितां सूत्रात ' वेद ' हीं अक्षरें

आहेत. पहिला पक्ष घेतला असता दोष येतो तो असा. बारा वर्षे वेद-ब्रह्मचर्यव्रत ( गायत्रीव्रत ) आहे. त्यानतर महानाम्नीव्रत, महाव्रत, उपनिषद्व्रत आणि गोदानव्रत ह्या प्रत्येकाचे अनुष्ठान एकेक वर्ष सांगितले असल्यामुळे त्यानतर म्हणजे १६ वर्षे पूर्ण झाल्यानतर १७ व्या वर्षी गोदानाची प्राप्ती येते ती, 'षोडशे वर्षे' (गृह्य. १।१८।२ ) ह्या पूर्वोक्त कालाला विरुद्ध आहे. दुसऱ्या मुख्य पक्षी जन्मापासून बारावें चालू असताच महानाम्नीव्रताला सुरवात केली असता, सोळाव्या वर्षी गोदान-विधि निर्विवाद येतो, म्हणून हा पक्षच योग्य आहे. आता उपनयनाचा मुख्य काल टळला असता मात्र ह्या व्रताचे काल पुढें सरतील ॥ ३ ॥

ग्रहणान्तं वा ॥ ४ ॥

किंवा वेदग्रहण होईपर्यंत हे ब्रह्मचर्यव्रत पाळ असा शिष्यास उपदेश करावा. मग ते वेदाध्ययन बारा वर्षांपूर्वीच समाप्त होवो किंवा नतर होवो. *ह्या सूत्रावरून स्नातक ( अविप्लुतब्रह्मचर्य असा वर ) तीन प्रकारचे ठरतात.* एक विद्यास्नातक, दुसरा व्रतस्नातक व तिसरा विद्याव्रतस्नातक होय. बारा वर्षांपूर्वीच विद्या सपवून समावर्तन ( सोडमुंज ) करून गृहस्थाश्रमाकरता गुरुगृहाहून परत जातो तो विद्यास्नातक होय. बारा वर्षे व्रताचरण करून वेद सपविण्यापूर्वीच समावर्तन करतो तो व्रतस्नातक व बारा वर्षांनीं दोन्ही पूर्ण करून परत जातो तो विद्याव्रतस्नातक होय. *आता 'विद्यान्ते गुरुमर्थेन निमन्त्र्य' ( गृह्य० ३।९।४ ) ह्या सूत्रात पुढें* विद्यान्त हा समावर्तनाचा काल सांगितला आहे, तर केवळ व्रतस्नातक कसा असे म्हणाल तर त्यापक्षीं विद्येचा अन्त म्हणजे शेवट जें उपनिषद् त्याचेच एकदम ( मागला वेद न म्हणता ) अध्ययन करून समावर्तन करावें असा अर्थ आहे. उपनिषद् हेंच मुख्य स्नाननिमित्त आहे असें रहस्यग्रथात म्हटलें आहे. म्हणून वेद अपुरा असताही स्नातक

होतो त्यास प्रमाण 'वेदमनधीयन्स्नातको भवति' वगैरे वाक्यें रहस्य-ग्रन्थात आहेत असो. ह्यानतर स्विष्टकृत् वगैरे होमशेष सपवावा ॥ ४॥

[ सायंप्रातर्भिक्षेत ॥ ५ ॥]

ब्रह्मचाऱ्यानें, सकाळीं व सध्याकाळीं गुरूकरता व स्वत करता अन्नभिक्षा मागावी. शिळे अन्न निषिद्ध असल्यामुळें दोन वेळा भिक्षेचें विधान आहे. हल्लींचे माधुकरी फक्त दुपारींच मागतात व रात्रीं त्याना शिळें खावें लागतें ॥ ५ ॥

सायंप्रातः समिधमादध्यात् ॥ ६ ॥

सध्याकाळीं व सकाळीं अग्नीला समिध् द्यावी. ह्यावेळीं परिसमूहना दिक उपस्थानापर्यंत धर्म आचरावे हें मागेंच सागितले आहे. येथें पुन्हा 'साय प्रात' पदे घालून भिक्षा, समिद्धोमापूर्वी किंवा नतर केव्हाही मागावी ह्या कृत्याशीं तिचा काहीं सबध नाहीं हें बोधित केलें ॥ ६ ॥

[अप्रत्याख्यायिनमग्रे भिक्षेताप्रत्याख्यायिनीं वा ॥ ७ ॥]

सर्वाआधीं नाहीं न म्हणणाऱ्या पुरुषाजवळ किंवा स्त्रीजवळ भिक्षा मागावी म्हणजे नाट लागता उपयोगी नाहीं. हा नियम अनुप्रवचनीय-भिक्षेपुरताच आहे ॥ ७ ॥

भवान्भिक्षां ददात्विति अनुप्रवचनीयमिति वा ॥ ८ ॥

'भवान् भिक्षा ददातु' किंवा प्रथम दिवस असल्यास 'भवान् अनुप्रवचनीय ददातु' असा भिक्षा मागण्याचा मत्र म्हणावा. भिक्षा घालणारी बाई असल्यास 'भवान्' च्या जागीं 'भवती' हें पद घालावें. क्षत्रिय बटूनें भवच्छब्द मध्यें घालावा म्हणजे 'भिक्षां भवान् ददातु' असा मत्रोह करावा. वैश्यबटूनें भवच्छब्द शेवटीं म्हणावा म्हणजे 'भिक्षां ददातु भवान्' असा उह करावा, असें शाखान्तरांत म्हटलें आहे ॥ ८ ॥

तदाचार्याय वेदयीत तिष्ठेदहःशेषम् ॥ ९ ॥

ती भिक्षा ( तण्डुलादि ) आचार्याला अर्पण करून त्या दिवशीं सूर्यास्तापर्यंत उभें रहावें. आसनावर बसूं नये ॥ ९ ॥

अस्तमिते ब्रह्मौदनमनुप्रवचनीयं श्रपयित्वाचार्याय वेदयीत ॥ १० ॥

सूर्यास्त झाल्यावर अनुप्रवचनीय होमाला उपयोगी पडणारा ब्रह्मौदन शिजवून तयार झाल्यावर आचार्यास कळवावें. ब्रह्मशब्द ब्राह्मणवाचक असल्यामुळे पुढें सांगितलें जाणारें ब्राह्मणभोजन ह्याच अन्नानें करावें असें ब्रह्मौदनपदानें सिद्ध झालें. अनुप्रवचन म्हणजे गुरूच्चारणानंतर जें गायत्र्यादिकांचे पठन तें होय. तत्संबंधीं होमाचें नाव अनुप्रवचनीय होम जाणावें. ह्याच्या स्थालीपाकाला ब्रह्मौदन असे शास्त्रीय नांव आहे ॥ १० ॥

आचार्यः समन्वारब्धे जुहुयात्सदसस्पतिमद्भुतमिति ॥ ११ ॥

नंतर आचार्यानें, ब्रह्मचाऱ्यास आपल्या उजव्या बाजूस बसवून 'सदसस्पतिम्०' (ऋक्सं० १-१-२५) ह्या ऋचेनें, त्या स्थालीपाकाची पहिली आहुति द्यावी. ह्या आहुतीपूर्वी इध्माधानादि आधारांत कृत्य अर्थात् करावें ॥ ११ ॥

सावित्र्या द्वितीयम् ॥ १२ ॥

'तत्सवितुर्वरेण्यम्' (मं० ३-४-१०) ह्या सर्वप्रसिद्ध सवितृदेवताक मंत्रानें (गायत्री) दुसरी आहुति द्यावी. 'द्वितीयं' हें पद पुढें अनुवृत्ति नेण्याकरितां आहे ॥ १२ ॥

यद्यत्किंचात ऊर्ध्वमनूक्तं स्यात् ॥ १३ ॥

ह्यापुढें, महानाम्न्यादिव्रतत्रयांमध्यें ज्या ज्या भागांचें येथल्या गायत्रीप्रमाणें अनुप्रवचनीय होईल त्यानें त्यानें, तेथें दुसरी आहुती द्यावी.

सारांश, त्या व्रतत्रयांतही अनुप्रवचनीय होम अवश्य असून त्यापैकीं महानाम्नीव्रतांत 'महानाम्नीभ्यः स्वाहा' हीच दुसरी आहुति, गायत्रीच्या जागीं द्यावी. महाव्रतांत ' महाव्रताय स्वाहा ' ही दुसरी आहुति द्यावी, व तिसऱ्या व्रतांत ' उपनिषदे स्वाहा ' अशी दुसरी आहुति आहे. वरच्या सूत्रांत ' द्वितीयं ' पद घातल्यामुळे ही दुसरी आहुति नाममंत्रांनींच दिली जाते नाहींतर उपनिषद् वगैरे भागांत पुष्कळ मंत्रभाग असल्यामुळे अनेक आहुतींचा प्रसंग आला असता. ॥ १३ ॥

ऋषिभ्यस्तृतीयम् ॥ १४ ॥

' ऋषिभ्यः स्वाहा ' ह्या मंत्रानें तिसरी आहुति द्यावी. येथेही ' तृतीयं ' ह्या अधिकपदानें नाममंत्र सिद्ध झाला ॥ १४ ॥

सौविष्टकृतं चतुर्थम् ॥ १५ ॥

स्विष्टकृत् होमाची आहुति चवथी द्यावी. येथें ' चतुर्थम् ' ह्या पदाने संख्यानियमन केल्यामुळे ह्या होमांत आज्यभाग होत नाहींत हें ठरलें ॥ १५ ॥

ब्राह्मणान्भोजयित्वा वेदसमाप्तिं वाचयीत ॥ १६ ॥

ह्यापुढे संस्थाजपापर्यंत कृत्य संपवून, पूर्वोक्त स्थालीपाकानें ब्राह्मणांना भोजन घालून, त्यांच्याकडून वेदसमाप्ति बोलवावी. म्हणजे आचार्यानें ब्राह्मणांना, ' अस्य ब्रह्मचारिणो वेदसमाप्तिरस्त्विति भवन्तो ब्रुवन्तु ' असें म्हणावें; व ब्राह्मणानींही उलट ' वेदसमाप्तिरस्तु ' ( वेदाध्ययन पूर्ण होवो ) असें म्हणावें ॥ १६ ॥

अत ऊर्ध्वमक्षारलवणाशी ब्रह्मचार्यधःशायी त्रिरात्रं द्वादशरात्रं संवत्सरं वा ॥ १७ ॥

ह्यापुढें ब्रह्मचाऱ्यानें, तीन दिवस, बारा दिवस किंवा शक्य असल्यास

एकवर्षपर्यंत अळणी व क्षाररहित अन्नाचें सेवन करून भूमीवर शयन करावें. मागें विवाहप्रकरणांत क्षारानें सांगितलीं आहेत. ॥ १७ ॥

चरितव्रताय मेधाजननं करोति ॥ १८ ॥

ह्याप्रमाणें व्रताचरण केल्यानंतर त्या बटूचा मेधाजनन ( पळसुला ) संस्कार करावा. ह्या सूत्रावरून ज्या उपनयनांत मेधाजनन कर्तव्य असेल त्यामध्येंच हें व्रत आचरावें. व हें व्रत कर्तव्य असेल तर त्यापूर्वीच अनुप्रवचनीय होम करावा, असें वरच्या सूत्रातल्या ' अत ऊर्ध्वम् ' ( ह्यानंतर ) ह्या पदानें सिद्ध केलें आहे. मेधाजनन न करण्याच्या पक्षीं ( पुनरुपनयनस्थळीं ) अनुप्रवचनीय व व्रताचरणही करूं नये, असें सिद्ध झालें ॥ १८ ॥

पुढच्या सूत्रानें मेधाजनन सांगतात.

अनिन्दितायां दिश्येकमूलं पलाशं कुशस्तम्बं वा पलाशापचारे, प्रदक्षिणमुदकुम्भेन त्रिः परिषिञ्चन्तं वाचयति ।

सुश्रवः सुश्रवा असि, यथा त्वं सुश्रवः सुश्रवा अस्येवं मां सुश्रवः सौश्रवसं कुरु । यथा त्वं देवानां यज्ञस्य निधिपोऽस्येवमहं मनुष्याणां वेदस्य निधिपो भूयासमिति ॥ १९ ॥

आग्नेय, दक्षिण व नैर्ऋत्य ह्या तीन निंदित दिशा सोडून दुसऱ्या कोणत्याही शुद्ध दिशेस जाऊन तेथें असलेला शाखारहित असा पळस, तसा न मिळाल्यास शाखायुक्तच पळस किंवा दर्भाचें थोंब पाहून, त्या भोंवतीं प्रदक्षिणाकारानें तीनदा जलसिंचन करीत असतां, ' सुश्रव सुश्रवा पासून भूयासम् ' पर्यंत असलेला सूत्रोक्त मंत्र म्हणावा. हेंच मेधाजनन होय. त्याचा अर्थ, धारणशक्ति उत्पन्न करणारें कर्म होय. सूत्रांत पलाशपद दोनदां घालून शाखारहित न मिळाल्यास सशाख पळ-

सच घ्यावा व तोही नसला तर कुशस्तम्ब पहावा असें ठरलें. हल्लीं शुद्ध दिशेकडून पळसाची डहाळी तोडून आणून घरींच स्थंडिलावर पुरून हा विधि उरकतात ॥ १९ ॥

एतेन वापनादिपरिदानान्तं व्रतादेशनं व्याख्यातम् ॥ २० ॥

महानाम्न्यादिक सत्स्वरक्ते सांगितलीं आहेत, त्यामध्येही ह्या उपनयन संस्कारातले केशवापनापासून 'काय त्वा परिददामि' ह्या परिदाना पर्यंत असलेले विधि करावे. अर्थात् वापनापूर्वीचे अलंकारधारण व परिदानानंतरचे विधीही करू नयेत हे ठरते ॥ २० ॥

इत्यनुपेतपूर्वस्य ॥ २१ ॥

एकदा वेळ सांगितलेला उपनयनसंस्काराचा विधि, ज्याचें पूर्वी उपनयन झालें नसेल त्याविषयीं आहे उपनयन म्हणजे विद्येकरिता, गुरू जवळ नेणें होय ॥ २१ ॥

अथोपेतपूर्वस्य ॥ २२ ॥

आता वेदान्तरग्रहण, म्लेच्छदेशगमन, विण्मूत्रप्राशन वगैरे स्मृतिप्रोक्त हेतूनीं प्रायश्चित्तार्थ म्हणून ज्याचा पुनःसंस्कार करण्याचा प्रसंग आला असेल त्याच्या (उपेतपूर्व) उपनयनातला विशेष सांगतो ॥ २२ ॥

कृताकृतं केशवपनं मेधाजननं च ॥ २३ ॥

त्याच्या उपनयनात, केशवपन व मेधाजनन हीं करावीं किंवा न करावीं ॥ २३ ॥

अनिरुक्तं परिदानम् ॥ २४ ॥

ह्या उपनयनात प्रजापतीला परिदानही सांगितलेलें नाहीं अर्थात् तो विधि करू नये ॥ २४ ॥

कालश्च ॥ २५ ॥

त्याचप्रमाणें उदगयनादि कालविशेष हीं पुनरुपनयनात उक्त नाहीं. निमित्तानंतर लागलीच हें प्रायश्चित्तरूप पुनरुपनयन करावें ॥ २५ ॥

तत्सवितुर्वृणीमह इति सावित्रीम् ॥ २६ ॥

पूर्वोक्त गायत्रीच्या जागीं 'तत्सवितुर्वृणीमहे' ही गायत्री ( ऋ० ४-४-२५-१ ) म्हणावी. येथे २२ वी कंडिका संपली. हीमध्ये एकदर २६ सूत्रें असून येथेंच उपनयन संपलें ॥ २६ ॥ ॥ २२ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका २३ वी.

ऋत्विजो वृणीतेऽन्यूनानतिरिक्ताङ्गान्ये मातृतः पितृतश्चेति यथोक्तं पुरस्तात् ॥ १ ॥

येथें मधुपर्कविधि सांगावयाचा आहे. त्याकरिता प्रसंगानें ऋत्विग्वरण म्हणजे, यज्ञाकरता होमादिकर्ते ब्राह्मण निवडणें. हा प्रकार सांगतात. ज्याच्या अवयवात कमजास्त प्रकार नाहीं व जे पूर्वी श्रौत-सूत्रात ( आश्व०श्रौ ९-३ २० ) सांगितल्याप्रमाणें, मातृपक्षीं व पितृपक्षीं, निदान पितृपक्षीं तरी दहा पिढ्यापर्यंत ब्राह्मण्याची अनुवृत्ति आलेले आहेत असे ऋत्विज् ( याजक ) निवडावे. अन्यूनानतिरिक्त ह्या पदानें, ब्राह्मणांना सहा बोटें किंवा चार वगैरे बोटें नसावीं व ते फारच ठेंगू किंवा फारच उंच नसावे असें सूचित केलें ॥ १ ॥

यून ऋत्विजो वृणीत इत्येके ॥ २ ॥

दुसरे कांहीं आचार्य, कर्मसमर्थ असे तरुण ऋत्विज असावे असें म्हणतात येथें पुन्हा ऋत्विक्पद घालून चमसाध्वर्यु वगैरे ऋत्विजाहून भिन्न ब्राह्मण, तरुण नसले तरी चालतील हें सुचविलें आहे ॥ २ ॥

**ब्रह्माणमेव प्रथमं वृणीतेऽथ होतारमथाध्वर्युमथोद्गातारम् ॥ ३ ॥**

प्रथम यजमानानें ब्रह्मानामक ऋत्विजाचेंच वरण ( निवड ) करावें नंतर क्रमानें होता, अध्वर्यु व उद्गाता ह्याचें वरण करावें. ब्रह्यापुढें 'एव' हे पद घालून त्याचें मात्र सर्वांआधीं वरण करून बाकीच्या तिघांचें कोण त्याही क्रमानें वरण करावें हे ज्ञापित केलें आहे. चारच मुख्य ऋत्विज हवे असल्यास असे निवडावे ॥ ३ ॥

**सर्वान्वा येऽहीनैकाहैर्याजयन्ति ॥ ४ ॥**

अथवा जरूर असल्यास एकदिनसाध्य व अनेकदिनसाध्य यज्ञात लागणारे सवच ऋत्विक निवडावे वर सांगितलेल्या मुख्य चौघाशिवाय पाच होत्राशसी व सात चमसाध्वर्यु असे १२ ऋत्विज अधिक लागतात. सर्व मिळून १६ झाले सूत्रात 'अहीनैकाहैं' हे पद घालून शमि त्याची निवृत्ति केली आहे. नाहींतर पुढें येणाऱ्या होत्रकपदानें त्याचेही ग्रहण झालें असते ॥ ४ ॥

**सदस्यं सप्तदशं कौपीतकिनः समामनन्ति स कर्मणामुपद्रष्टा भवतीति तदुक्तमृग्भ्यां यमृत्विजो बहुधा कल्पयन्त इति ॥ ५ ॥**

वरच्या १६ शिवाय १७ वा एकच सदस्य नावाचा ऋत्विज निवडावा, असें कौपीतकीशाखेचे आचार्य सांगतात तो सदस्य सर्व कर्मांचा साक्षीभूत असतो 'यमृत्विजो बहुधा कल्पयन्ते' वगैरे दोन ऋचाचाही ( ऋक्स ६-४-२९ ) सदस्यवरणाला आधार आहे ॥ ६ ॥

**होतारमेव प्रथमं वृणीते ॥**

ह्याप्रमाणे १७ ऋत्विज निवडावयाचे असल्यास प्रथम होताच निवडावा अर्थात् पहिला ब्रह्मवरणाचा पक्ष चारच ऋत्विज असता जाणावा ॥ ६ ॥

**अग्निर्मे होता स मे होता होतारं त्वाऽमुं वृण इति होतारम् ॥७॥**

अग्निर्मेपासून वृणेपर्यंतच्या वर दिलेल्या मंत्रानें होत्याची निवड (वरण) करावी. ह्यापैकीं 'अमु' पदाच्या जागीं होत्याचें द्वितीयान्त नाम उच्चारावें. म्हणजे अग्निर्मे होता स मे होता होतार त्वा 'रुद्रशर्माणं काश्यपसगोत्र' वृणे वगैरे मंत्राचा ऊह होईल. वृणेचा अर्थ मी निवडतो असा आहे. पुढच्या मंत्रातही त्या त्या ऋत्विजाचे द्वितीयान्त नाव ह्याचप्रमाणे उच्चारावें ॥ ७ ॥

**चन्द्रमा मे ब्रह्मा समे ब्रह्मा ब्रह्माणं त्वाऽमुं वृण इति ब्रह्माणम् ॥ ८ ॥**

चंद्रमा वगैरे वृणेपर्यंतच्या मंत्राने ब्रह्म्याची निवड करावी. ह्या सूत्रात स मे ब्रह्मा वगैरे भागाची पुनरावृत्ति करण्याचें कारण, ह्याप्रमाणें पुढच्या मंत्रामधूनही स मे वगैरे भागाचा ऊह करावा हें सुचविणें हें आहे ॥ ८ ॥

**आदित्यो मेऽध्वर्युरित्यध्वर्युम् । पर्जन्यो मे उद्गातेत्युद्गातारम् आपो मे होत्राशंसिन इति होत्रकान् । रश्मयो मे चमसाध्वर्यव इति चमसाध्वर्यून् । आकाशो मे सदस्य इति सदस्यम् । स वृतो जपेत् । महन्मेऽवोचो भर्गो मेऽवोचो, भर्गो मेऽवोचो यशो मेऽवोचः स्तोमं मेऽवोचः क्लृप्तिं मेऽवोचस्तृप्तिं मेऽवोचो भुक्तिं मेऽवोचः सर्वं मेऽवोच इति ॥ ९ ॥**

असो, पुढें यजमानानें 'आदित्यो मेऽध्वर्यु समेऽध्वर्युरध्वर्यु त्वामुकशर्माणममुकगोत्र वृणे' असा मंत्रोह करून अध्वर्युवरण करावें. 'पर्जन्यो मे उद्गाता स मउद्गातोद्गातार त्वामु वृणे' अशा मंत्रानें उद्गात्याची निवड करावी. 'आपो मे होत्राशंसिनस्ता मे होत्राशंसिनो होत्राशंसिनो वोऽमुकशर्मणोऽमुकगोत्रान् वृणे' अशा प्रकारचे मंत्रोह करून मुख्यभिन्न प्रतिप्रस्थाता वगैरे ऋत्विजाचा स्वीकार करावा. 'रश्मयो मे चमसाध्वर्यवस्ते मे चमसा-

घर्यत्र चमसाध्वर्यून्वोऽमून् वृणे' अशा मंत्रोहानें चमसाध्वर्यूंची निवड करावी. प्रत्येक ऋत्विजाचें वरण झाल्याक्षणींच त्या ऋत्विजानें, 'महन्मे पासून सर्व मेऽवोच' पर्यंत मंत्राचा जप करून 'अग्निष्टे होता' वगैरे पुढें येणारीं आपापलीं प्रत्युत्तरेंही द्यावीं. स वृत पैकीं स हा पदानें प्रत्येकाचें वरण झाल्याबरोबर त्यानें हा जप करावा असें बोधित केलें, व वृत हा अधिक पदानें प्रत्येक वृत ( निवड ) झाल्यानें जपावें हें सुचविलें आहे ॥ ९ ॥

**जपित्वाग्निष्टे होता स ते होता होताहं ते मानुष इति होता प्रतिजानीते ॥ १० ॥**

पूर्वोक्त महन्मे वगैरे जप झाल्यावर होत्यानें 'अग्निष्टे होता स ते होता होताहं ते मानुष' असें यजमानास उत्तर देऊन आपल्या अधिकाराची कबुली द्यावी हा सूत्रात, 'जपित्वा' हें अधिक पद घालून यथोक्त प्रसगीं ह्यापुढें होता वगैरेनीं 'तन्मामवतु तन्माविशतु तेन भुक्षिषीय' हा शेषही म्हणावा हें ज्ञापित केलें ॥ १० ॥

**चन्द्रमास्ते ब्रह्मा स ते ब्रह्मा ॥ ११ ॥**

महन्मे वगैरे जपानंतर ब्रह्म्यानेंही 'चन्द्रमास्ते ब्रह्मा स ते ब्रह्मा ब्रह्माहं ते मानुष' असें उत्तर द्यावें अशाच प्रतिवचनाची अनुवृत्ति पुढेंही आहे हे सुचविण्याकरता स ते ब्रह्मा हा अंश घातला आहे ॥११॥

**एवमितरे यथादेशं तन्मामवतु तन्मा विशतु तेन भुक्षिषीयेति याजयिष्यन् ॥ १२ ॥**

ह्याचप्रमाणें, अध्वर्यु वगैरे इतरानींही जपानंतर आपल्या उल्लेखाप्रमाणें उत्तरें द्यावीं, व सोमयागात यजमानाकडून यजन करवीत असतात तेव्हा तन्मामवतु वगैरे अशाही उत्तरानंतर म्हणावा. हें समजण्या-

करिता, अध्वर्यूचें समग्र उत्तर लिहून दाखवितों. 'आदित्यस्तेऽध्वर्यु स तेऽध्वर्युरध्वर्युरह ते मानुषस्तन्मामवतु तन्मा विशतु तेन भुक्षिषीय' असें उत्तर अध्वर्यूनें द्यावें. ह्याचप्रमाणें उद्गाता वगैरे इतराच्या उत्तराची कल्पना करावी. अग्न्याधेयकृत्यात चारच ऋत्विजांचे वरण असते तेव्हा ते याजयिते नसतात म्हणून त्यावेळीं तन्मामवतु वगैरे असें म्हणू नये ॥ १२ ॥

ऋत्विजाचें लक्षण सागून ते निवडण्याचा प्रकार सागितला. आता ऋत्विक्त्व कोठें करू नये व कोठें करावें ते सागतात.

न्यस्तमार्त्विज्यमकार्यम् ॥ १३ ॥

दुसऱ्या ऋत्विजानीं वादविवादानें टाकून दिलेलें ऋत्विक्त्व आपण पत्करू नये ॥ १३ ॥

अहीनस्य नीचदक्षिणस्य ॥ १४ ॥

अनेकदिनसाध्यक ( अहीन ) यज्ञ असून ज्यात दक्षिणा थोडी मिळत असेल त्यातलें ऋत्विक्त्व स्वीकारू नये. ह्यावरून एकदिनसाध्य यज्ञामध्यें थोडी दक्षिणा असली तरी भटजी व्हावें असें ठरलें, व यज्ञांत थोडीतरी दक्षिणा असलीच पाहिजे हेंही सिद्ध झालें. ह्या सूत्रात धरून ' अकार्यम् ' ( करू नये ) अशी अनुवृत्ति असून ती, पुढच्या चार सूत्रातही नेली आहे ॥ १४ ॥

व्याधितस्यातुरस्य ॥ १५ ॥

ज्वरादि रोगग्रस्त असलेला व अपस्मारास खिळलेला असेल त्याचें आर्त्विज्य ( भटजीपणा ) स्वीकारू नये ॥ १५ ॥

यक्ष्मगृहीतस्य ॥ १६ ॥

क्षयरोग्याचें आर्त्विज्य पत्करू नये ॥ १६ ॥

अनुदेश्यभिशस्तस्य ॥ १७ ॥

शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं वाळींत टाकला असेल त्याचें किंवा मतांतरानें श्राद्धभोजनास निषिद्ध ठरला असेल त्याचें आर्त्विज्य करूं नये ॥ १७ ॥

क्षिप्रयोनेरिति चैतेषाम् ॥ १८ ॥

ज्याची माता व्यभिचारिणी असेल त्याचें किंवा अशा प्रकारच्या लज्जास्पदाचें आर्त्विज्य करूं नये ॥ १८ ॥

सोमप्रवाकं परिपृच्छेत्को यज्ञः क ऋत्विजः का दक्षिणेति ॥ १९ ॥

यज्ञकर्मानिमित्त जो आपणास आमंत्रण सांगण्यास येईल त्यास आधींच विचारावें कीं, यज्ञ कोणता आहे, इतर ऋत्विज कोण आहेत व दक्षिणा काय आहे ॥ १९ ॥

कल्याणैःसह संप्रयोगः ॥ २० ॥

वरच्या प्रश्नाचीं जीं उत्तरें येतील त्यामध्यें हितावह असतील तर आमंत्रण स्वीकारावें म्हणजे यज्ञ कल्याणकारक असला, ऋत्विज चांगले असले व दक्षिणाही चांगली असली तरच आमंत्रण स्वीकारावें ॥ २० ॥

न मांसमश्नीयुर्न स्त्रियमुपेयुराक्रतोरपवर्गात् ॥ २१ ॥

ऋत्विजांनीं यज्ञारंभापासून यज्ञसमाप्ति होईपर्यंत मांसभक्षण करूं नये व स्त्रीसंभोगही करूं नये ॥ २१ ॥

एतेनाग्ने ब्रह्मणा वावृधस्वेति दक्षिणाग्नावाज्याहुतिं हुत्वा यथार्थं प्रव्रजेत् ॥ २२ ॥

*यज्ञ संपल्यावर ऋत्विजानें, आपल्या घरच्या दक्षिणाग्नीवर ' एतेनाग्ने ब्रह्मणा० ' या ऋचेनें ( ऋग्म. १-२ ३५ ) आज्याहुति देऊन*

नंतर आपल्या इच्छेप्रमाणें मांसभक्षणादिक पूर्ववत् करावें. येथें आज्याहुतिवचन, इतर तंत्राच्या निवृत्तिकरितां आहे, परिस्तरणविकल्पाकरितां नाहीं ॥ २२ ॥

एवमनाहिताग्निर्गृह्य इमामग्ने शरणि मीमृषो न इत्येतयर्चा ॥ २३ ॥

ऋत्विज अग्निहोत्री नसला तरी त्यानेंही वरचे नियम पाळून यज्ञानंतर स्वतःच्या गृह्याग्नीवर 'इमामग्ने शरणि०' ( ऋग्म० १२-३५ १ ) ह्या मंत्रानें आज्याहुति देऊन नंतर नियम सोडावे. येथे तेविसावी कंडिका पूर्ण झाली. हीमध्यें सूत्रें २३ आहेत ॥ २३ ॥ ॥ २३ ॥

## अध्याय १ ला—कण्डिका २४ वी.

ऋत्विजो वृत्वा मधुपर्कमाहरेत् ॥ १ ॥

मागच्या कंडिकेंत सांगितल्याप्रमाणें ऋत्विग्वरण करून त्यांना मधुपर्क अर्पण करावा. मधुपर्क म्हणजे मधुमिश्रित पेय होय ॥ १ ॥

स्नातकायोपस्थिताय ॥ २ ॥

समावर्तन करून आपल्या घरीं विवाहाकरितां आलेल्या स्नातक वरालाही मधुपर्क अर्पण करावा ॥ २ ॥

राज्ञेच ॥ ३ ॥

राजा आपल्या घरीं आला असतां, त्यालाही मधुपर्क द्यावा ॥ ३ ॥

आचार्यश्वशुरपितृव्यमातुलानां च ॥ ४ ॥

आपले आचार्य, सासरा, चुलता व मामा ह्यानाही मधुपर्क समर्पण करावा. आचार्यादिकांचें निराळें सूत्र करून प्रत्येकाच्या मधुपर्कांत भेद आहे हें सुचविलें आहे. त्यामुळें स्नातकाला फक्त विवाहदिवशीच एकदां

मधुपर्क द्यावा. राजाला दररोज घरीं आला असताही द्यावा. व आचार्य वगैरेंना दरवर्षी एकदाच घरीं आले असता मधुपर्क द्यावा, अशा शास्त्रांतरोक्त विधींना मान दिला आहे, तसें वागावें ॥ ४ ॥

दधनि मध्वानीय ॥ ५ ॥

अप्रसिद्धीमुळें मधुपर्काचें स्वरूप सांगतात. दह्यामध्यें मध टाकावा म्हणजे मधुपर्क झाला ॥ ५ ॥

सर्पिर्वा मध्वलाभे ॥ ६ ॥

मध न मिळेल तर दह्यात तूपच टाकावें, दुसरें चालणार नाहीं. ॥ ६ ॥ आता मधुपर्क देणाऱ्याचें कृत्य सांगतात.

विष्टरः पाद्यमर्घ्यमाचमनीयं मधुपर्को गौरित्येतेषां त्रिस्त्रिरेकैकं वेदयन्ते ॥ ७ ॥

नंतर मधुपर्कदात्यानें विष्टर, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, मधुपर्क, आणि गो ह्यापैकीं प्रत्येक पदार्थ, 'विष्टरो विष्टरो विष्टर' अशा प्रकारें तीनदा उच्चारून प्रतिग्रहीत्याला अर्पण करावा. ऋत्विग्विषयात प्रतिग्रहीते अनेक असल्यामुळे एकेक पदार्थ सर्वांना अनुक्रमानें द्यावा किंवा एकेकाला एकदमच सर्व पदार्थ अर्पण करावेत. पहिल्या प्रकाराला मीमांसेत पदार्थानुक्रम म्हणतात व दुसऱ्याला काण्डानुक्रम असें म्हणतात. विष्टर म्हणजे आसन, पाद्य म्हणजे पाय धुण्याचें उदक, अर्घ्य म्हणजे पूजार्थक उदक, आचमनीय म्हणजे आचमनास उदक व गो म्हणजे गाय असे पदाचे अर्थ जाणावे. येथें 'एतेषां' ह्या अधिकपदानें, पुढें विधान केलें जाणाऱ्या भोजनाचें त्रिरुच्चारण करूं नये हें ज्ञापित केलें ॥ ७ ॥

आतां मधुपर्क स्वीकारणाराचीं कृत्यें सांगतात.

**अहं वर्ष्म सजातानां विद्युतामिव सूर्यः । इदं तमधितिष्ठामि यो मा कश्चाभिदासतीत्युदगग्रे विष्टर उपविशेत् । आक्रम्य वा ॥ ८ ॥**

विष्टर दिल्यावर घेणाऱ्यानें 'अहं वर्ष्म पासून दासति' पर्यंत मंत्र म्हणून उत्तरेकडे अग्रें असलेल्या विष्टरावर मांडी घालून बसावें किंवा दोन्ही पायांनीं आक्रमण करून बसावें ॥ ८ ॥

**पादौ प्रक्षालापयीत दक्षिणमग्रे ब्राह्मणाय प्रयच्छेत् ॥ ९ ॥**

पाद्य दिल्यावर, दात्याकडून आपले पाय धुववावे. ब्राह्मण दाता असल्यास त्याला प्रथम उजवा पाय धुण्यास द्यावा नंतर डावा पाय द्यावा ॥ ९ ॥

**सव्यं शूद्राय ॥ १० ॥**

पूजक शूद्र असल्यास त्याला प्रथम डावाच पाय द्यावा. क्षत्रिय व वैश्य यांना कोणताही पाय, प्रथम धुण्यास द्यावा असें वृत्तींत म्हटलें आहे ॥ १० ॥

**प्रक्षालितपादोऽर्घ्यमञ्जलिना प्रतिगृह्य ॥ ११ ॥**

पाय धुतल्यावर गंध, पुष्प, अक्षता वगैरेंनीं युक्त असलेल्या अर्घ्यो-दकाचें ओंजळीमध्यें ग्रहण करावें ॥ ११ ॥

**अथाचमनीयेनाचामति अमृतोपस्तरणमसीति ॥ १२ ॥**

नंतर आचमनीय दिल्यावर 'अमृतोपस्तरणमसि' म्हणून आच-मन घ्यावें. सोमपानामध्यें अनुच्छिष्टतेचें विधान केलें आहे. म्हणून जेथें आचमनाचा निषेध केला नसेल तेथें अन्नपानग्रहणानंतर शुद्धयर्थ आचमन अवश्य आहे असें ज्ञापित केलें असल्यामुळें, येथेंही अर्घ्या-चमनानंतर, शौचार्थक आचमन पुन्हा करावें. अपरान्हांत अर्घ्य-

नतर लागलीच आचमनाचें विधान केलें असल्यामुळे गध, माल्य, वस्त्र वगैरे मधुपर्कविधि संपल्यावर चावीं असें सिद्ध झालें ॥ १२ ॥

**मधुपर्कमाह्रियमाणमीक्षेत मित्रस्य त्वा चक्षुषा प्रतीक्ष इति ॥ १३ ॥**

मधुपर्क आणला जात असता प्रतिग्रहीत्यानें त्याकडे ' मित्रस्य त्वा चक्षुषा प्रतीक्षे ' हा मत्र म्हणून पहावें ॥ १३ ॥

**देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्यां प्रतिगृह्णामीति तदञ्जलिना प्रतिगृह्य सव्ये पाणौ कृत्वा मधुवाता ऋतायत इति तृचेनावेक्ष्यानामिकयाचाङ्गुष्ठेन च त्रिः प्रदक्षिणमालोड्य वसवस्त्वा गायत्रेणच्छन्दसा भक्षयन्त्विति पुरस्तान्निमार्ष्टि ॥ १४ ॥**

मधुपर्क अर्पण केल्यावर देवस्यपासून प्रतिगृह्णामिपर्यंत मत्र म्हणून ते पात्र हातीं धरावें, व डाव्या हातीं घेऊन ' मधुवाता ऋतायते ' ह्या तीन ऋचांनीं ( ऋक्स. १–६–१८–१ ) त्याकडे पाहून करंगळीजवळचें बोट आणि अंगठा ह्या दोहोंनीं, तीनदा पात्रस्थ मधुपर्क, प्रदक्षिणाकृति ढवळावा. पुढें वसवस्त्वापासून भक्षयन्तुपर्यंत मत्र म्हणून मधुपर्कानें भरलेलीं तीं दोन बोटें पूर्वेकडे शिंपडावीं ॥ १४ ॥

**रुद्रास्त्वा त्रैष्टुभेनच्छन्दसा भक्षयन्त्विति दक्षिणतः, आदित्यास्त्वा जागतेनच्छन्दसा भक्षयन्त्विति पश्चात्, विश्वेत्वा देवा आनुष्टुभेनच्छन्दसा भक्षयन्त्वित्युत्तरतः, भूतेभ्यस्त्वेति मध्यात्त्रिरुद्गृह्य ॥ १५ ॥**

रुद्रास्त्वा० यन्तु ह्या सूत्रोक्त मत्रानें, पुन्हा तींच बोटें भरवून दक्षिणेकडे झाडावीं. आदित्यास्त्वा० ह्या मत्रानें पश्चिमेकडे (पाठीकडे) शिंपडावीं, आणि विश्वेत्वा० यन्तु ह्या मत्रानें, भरलेलीं तीं बोटें उत्तरेकडे

शिंपडावीं. नंतर ' भूतेभ्यस्त्वा ' अशा मंत्रानें पात्राच्या मध्यभागातून अंगुष्ठानामिकानींच तीनदा मधुपर्क उचलून वर ( ऊर्ध्व ) झाडावा. प्रत्येक वेळीं भूतेभ्यस्त्वा म्हणावें, ही गोष्ट ' कर्मावृत्तौ मंत्रावृत्ति ' ह्या सामान्यनियमानेंच सिद्ध आहे. कारण हें निमार्जन मुख्यकर्मच आहे, इतरसंस्काररूप नाहीं ॥ १५ ॥

**विराजो दोहोसीति प्रथमं प्राश्नीयात् । विराजो दोहमशीयेति द्वितीयम् । मयि दोहः पद्यायै विराज इति तृतीयम् ॥ १६ ॥**

ह्यानंतर विराजो दोहोसि म्हणून मधुपर्काचा पहिला घोट घ्यावा. विराजो दोहमशीय ह्या मंत्रानें दुसरा घोट घ्यावा व ' मयि दोह पद्यायै विराज ' ह्यानें तिसरा घोट घ्यावा. पुढें २० व्या सूत्रांत सर्व मधुपर्क प्राशन करण्याचा पक्ष आहे, त्यांत तीन घोटांतच सर्व मधुपर्क संपवावा हे सुचविण्याकरितां येथें 'द्वितीय' वगैरे संख्या सांगितल्या आहेत असें, भाष्यकार देवस्वामी म्हणतात ॥ १६ ॥

**न सर्वम् ॥ १७ ॥**

सर्व मधुपर्क पिऊन टाकू नये ॥ १७ ॥

**न तृप्तिं गच्छेत् ॥ १८ ॥**

पूर्ण तृप्ति होईल इतकाही पिऊ नये. पुढें भोजनाचें विधान आहे त्याकरितां ही आगाऊ तजवीज असावी ॥ १८ ॥

**ब्राह्मणायोदङ्डुच्छिष्टं प्रयच्छेदलाभेऽप्सु ॥ १९ ॥**

उष्टा शिल्लक राहिलेला मधुपर्क, उत्तरेकडे तोंड करून एखाद्या ब्राह्मणाला द्यावा, ब्राह्मण न मिळाल्यास पाण्यांत टाकावा ॥ १९ ॥

**सर्वं वा ॥ २० ॥**

अथवा सर्वच मधुपर्क प्यावा असा दुसरा पक्ष आहे. ह्या मतीं

देतानाच तृप्ति न होईल इतका मधुपर्क दिला पाहिजे ॥ २० ॥

**अथाचमनीयेनान्वाचामति अमृतापिधानमसीति ॥ २१ ॥**

नतर मागेंच दिलेल्या आचमनीयानें अमृतापिधानमसि म्हणून आचमन करावें. हें प्राशनाग आचमन होय ॥ २१ ॥

**सत्यं यशः श्रीर्मयि श्रीः श्रयतामिति द्वितीयम् ॥ २२ ॥**

'सत्य यश श्रीर्मयि श्री श्रयताम्' हा मत्र म्हणून पुन्हा त्याच पाण्यानें शौचार्थक दुसरें आचमन करावें ॥ २२ ॥

**आचान्तोदकाय गां वेदयन्ते ॥ २३ ॥**

ह्यानतर दुसऱ्या शुद्धोदकानें कर्मांगभूत आचमन केलेल्या प्रति ग्रहीशाला गाय अर्पण करावी. येथे *'आचान्त' ( आचमन केलेला )* ह्या पुनरुक्तपदानें ह्या दुसऱ्या कर्मांगभूत आचमनाचें बोधन केलें आहे ॥ २३ ॥

**हतो मे पाप्मा पाप्मा मे हत इति जपित्वोङ्कुरुतेति कारयिष्यन् ॥ २४ ॥**

गवालभ करवून मासभोजन करण्याची इच्छा असल्यास प्रतिग्रहीत्यानें 'हतो मे पाप्मा पाप्मा मे हत' असा मत्र जपून 'ॐ कुरुत' *( अहो वध करा ) असें म्हणावें. त्यानतर दात्यानें आलभन करून* पशुकल्पोक्त विधीनें आहुति द्याव्या. मधुपर्कीय पशूच्या देवता, पूर्वीच ११ व्या कडिकेच्या प्रारभींच्या विवरणात सागितल्या आहेत ॥ २४ ॥

**माता रुद्राणां दुहिता वसूनामिति जपित्वोमुत्सृजतेत्युत्स्रक्ष्यन् ॥ २५ ॥**

जर ती गाय सोडून द्यावी अशी इच्छा असेल तर, माता रुद्राणा०

(स० ६–७–८) ही ऋचा जपून ॐ उत्सृजत (अहो सोडून द्या) असें म्हणावें. पूर्वींचा गवालम्भपक्ष असून ह्याला उत्सर्जनपक्ष असें म्हणतात ॥२५॥

**नामांसो मधुपर्को भवति भवति ॥ २६ ॥ ॥ २४ ॥**

इत्याश्वलायनगृह्यसूत्रे प्रथमोऽध्याय. ॥

कोणत्याही पक्षीं मधुपर्कांग भोजन मांसरहित असत नाहीं. मांसाचा उपयोग लोकामध्यें तोंडीं लावण्यासच करीत असल्यानें, ह्या रीतीनें मधुपर्कानंतर भोजनही द्यावें असें अर्थात् ज्ञापित केलें आहे. पशुमारणपक्षीं त्याचें हुतशेषमांस, भोजनांत द्यावें व उत्सर्जनपक्षीं दुसरें विकत घेतलेलें वगैरे मांस भोजनामध्यें द्यावें. अथवा मापान्न वगैरे तत्स्थानीय कांहीं द्यावें. भवति ह्या पदाची आवृत्ति, अध्यायाची समाप्ति सुचविण्याकरतां असून मंगलार्थरही आहे, कारण शास्त्राच्या आदि, मध्य व अंत ह्यामध्यें मंगल करावें असें शास्त्रीय विधान आहे येथें ह्या अध्यायामधली २४ वी म्हणजे शेवटली कंडिका समाप्त झाली. हीमध्यें एकदर २६ सूत्रें असून मधुपर्कविधि सांगितला आहे. ह्याच ठिकाणीं ह्या गृह्यसूत्राचा पहिला अध्याय पूर्ण झाला आहे. ॥ २४ ॥

गृह्यसूत्र अध्याय पहिला समाप्त ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

## अध्याय २ रा—कण्डिका १ ली.

**श्रावण्यां पौर्णमास्यां श्रवणाकर्म ॥ १ ॥**

ह्या सूत्रांत ' सर्पबलिश्च कर्तव्य ' ह्या तीन पदांचा अध्याहार केला पाहिजे. कारण पुढें तसें विधान आहे. असो, आतां सूत्रार्थ लिहितों. श्रवणनक्षत्रयुक्त असणाऱ्या पूर्णिमेच्या दिवशीं म्हणजे श्रावण महिन्या-

हा पुरोडाश म्हणजे अश्वखुराएवढा व कासवाच्या पाठीसारखा भाकर किंवा पानगा असतो. नतर ' अग्ने नय सुपथा० ' ( स० २।५।१०।१ ) वगैरे चार ऋचानीं स्थालीपाकाच्या चार आहुति द्याव्या, व पुरोडाश उजव्या हातात घेऊन ' अच्युताय भौमाय स्वाहा ' ह्या मत्राने त्याचा होम करावा. ह्याप्रमाणीं उपस्तरण व अभिधारण अर्थात् डाव्या हातानें करावीं व सपूर्णाचा होम असल्यामुळे ' मध्यात्पूर्वार्धात् ' वगैरे अव-दानधर्मही घडत नाहीं, उजव्या अवयवाने कृत्य करावें अशी परिभाषा आहे ( श्रौतसू. १।१।१५ ) ती, दोन्ही हात रिकामे असता पाळावी. म्हणजे ती पारिभाषा नियामक आहे, निभायक नाहीं म्हणून येथें उजवा हात गुतल्यामुळें डाव्यानें उपस्तरण करावें लागतें. तसेंच येथे ' *श्रपयित्वा* ' हें *अधिक पद घालून नियम बोधित केल्यामुळे धाना*, सक्तु, लाह्या वगैरे पदार्थ लौकिकाग्निसिद्धच घेतले जातात त्याचें भर्जन औपासनावर होत नाहीं. मात्र आज्याच्या पर्यग्निकरणाबरोबरच त्या पदार्थांचें पर्यग्निकरण करावें. आज्याचें केवळ उत्पवनच केल्यास त्याचें *त्रिवार प्रोक्षण मात्र करावें किंवा अवज्वलन करावें असा विकल्प* वृत्ति-कारानीं लिहिला आहे ॥ ४ ॥

अप्लुतः स्यादाविःपृष्ठो वा ॥ ५ ॥

*पूर्वोक्त पुरोडाश, होम करण्यापूर्वी तुपामध्यें पूर्ण बुडविलेला असावा किंवा त्याचा पृष्ठभाग मात्र तुपावर उघडा असावा. म्हणजे भाजल्या नतर, वरीवर येणाऱ्या तुपात बुडवून ठेवलेला असावा असें सिद्ध झालें* ॥ ५ ॥

**मानो अग्नेऽवसृजो अघायेत्येनमाशयेनाभिजुहोति ॥ ६ ॥**

ह्यापुढें ' मानो अग्ने० ' ( स० २-५-१० ५ ) ह्या मत्रानें पुरोडाश बुडविलेल्या तुपाचा पुरोडाशासह होम करावा. द्रवद्रव्य असल्यामुळें हा

तल्या पूर्णिमेच्या दिवशीं, पुढें विधान केल्याप्रमाणें श्रवणाकर्म व सर्प बलि हीं कृत्यें करावीं श्रवणनक्षत्र हें कालाचें उपलक्षक मात्र अस ल्यामुळें जरी पौर्णिमेला तें नक्षत्र नसतें तरीही श्रावणी पूर्णिमाच ह्या दोन कृत्याना घ्यावी ॥ १ ॥

आता दुसऱ्या सूत्रानें सर्पबलीची पूर्वतयारी सागतात

**अक्षतसक्तूना नव कलशं पूरयित्वा दर्वीं च बलिहरणीं नवे शिक्ये निदधाति ॥ २ ॥**

भाजलेल्या सातूच्या ( अक्षत ) पिठानें ( सक्तु ) एक कोरा कुंभ भरून तो, व बलिदान करण्याची वेहळीच्या ( बेहड्याच्या ) लाक डाची ( वैककती ) पळी हीं दोन्ही खुटीवर टागलेल्या नव्या शिक्यावर ठेवावीं हीं दोन्ही सर्पबलीकरता लागतात ॥ २ ॥

आता पुढच्या सूत्रापासून ८ व्या सूत्रापर्यंत श्रवणाकर्म सागतात

**अक्षतधाना. कृत्वा सर्पिषार्धा अनक्ति ॥ ३ ॥**

सातू भाजून त्यापैकीं निम्म एका पात्रात काढून त्यावर तूप ओतून कालवावे अर्थात् बाकीचे अर्धे भाजलेले सातू ( लाह्या ) तसेच ठेवाव एवढें कृ य श्रावणी पूर्णिमेस दिवसा करून ठेवावें ॥ ३ ॥

**अस्तमिते स्थालीपाक श्रपयित्वैककपाल च पुरोडाशमग्ने नय सुपथा राये अस्मानिति चतसृभिः प्रत्यृच हुत्वा पाणिनैककपालम् अच्युताय भौमाय स्वाहेति ॥ ४ ॥**

सूर्यास्त झाल्यावर स्थालीपाक व पुरोडाशाकरता तदुलाचीं निर्वाप आणि प्रोक्षणें अमत्रक करून व त्याचे दोन भाग करून एक भागाचा स्थालीपाक, औपासनाग्नीवर शिजवावा आणि दुसऱ्या भागाचा पुरोडाश (भाकरी, चपाती ) त्याच अग्नीवर एक सपाट खापर ( कपाल ) ठेऊन भाजावा

हा पुरोडाश म्हणजे अश्वखुराएवढा व कासवाच्या पाठीसारखा भाकर किंवा पानगा असतो. नंतर ' अग्ने नय सुपथा० ' ( स० २।५।१०।१ ) वगैरे चार ऋचांनीं स्थालीपाकाच्या चार आहुति द्याव्या, व पुरोडाश उजव्या हातात घेऊन ' अच्युताय भौमाय स्वाहा ' ह्या मंत्राने त्याचा होम करावा. ह्याप्रमाणें उपस्तरण व अभिघारण अर्थात् डाव्या हातानें करावीं व संपूर्णाचा होम असल्यामुळें ' मध्यात्पूर्वार्धात् ' वगैरे अवदानधर्मही घडत नाहीं, उजव्या अन्वयाने कृत्य करावें अशी परिभाषा आहे ( श्रौतसू. १।१।१५ ) ती, दोन्ही हात रिकामे असता पाळावी. म्हणजे ती परिभाषा नियामक आहे, विधायक नाहीं म्हणून येथें उजवा हात गुंतल्यामुळें डाव्यानें उपस्तरण करावें लागतें. तसेंच येथे ' श्रपयित्वा ' हें अधिक पद घालून नियम बोधित केल्यामुळें धाना, सक्तु, लाह्या वगैरे पदार्थ लौकिकाग्निसिद्धच घेतले जातात त्याचें भर्जन आपासनावर होत नाहीं. मात्र आज्याच्या पर्यग्निकरणाबरोबरच त्या पदार्थांचें पर्यग्निकरण करावें. आ याचें केवळ उत्पवनच केल्यास त्याचें निवार प्रोक्षण मात्र करावें किंवा अवज्वलन करावें असा विकल्प वृत्तिकारांनीं लिहिला आहे ॥ ४ ॥

अभिघृतः स्यादाभिःपृष्ठो वा ॥ ५ ॥

पूर्वोक्त पुरोडाश, होम करण्यापूर्वी तुपामध्यें पूर्ण बुडविलेला असावा किंवा त्याचा पृष्ठभाग मात्र तुपावर उघडा असावा. म्हणजे भाजल्या नंतर, बहीवर वेगळ्या तुपात बुडवून ठेवलेला असावा असें सिद्ध झालें ॥ ५ ॥

मानो अग्नेऽवसृजो अघायेत्येनमाज्येनाभिजुहोति ॥ ६ ॥

त्यापुढें ' मानो अग्ने० ' ( स० २-५-१० ५ ) ह्या मंत्रानें पुरोडाश बुडविलेल्या तुपाचा पुरोडाशासह होम करावा. द्रवद्रव्य असल्यामुळें हा

होम अर्थात् सुच्याने होतो. ह्या सूत्रातल्या ' एन ' ( हाला ) ह्या अधिक पदानें अखडित पुरोडाशाचाच होम करावा हे ज्ञापित केले आहे ॥ ६ ॥

**शन्नो भवन्तु वाजिनो हवेष्वित्यक्ता धाना अञ्जलिना ॥ ७ ॥**

नतर, दुपारीं घृताक्त करून ठेवलेल्या यवधाना ( भाजलेले सातू ) ओंजळींत घेऊन ' शन्नो भवन्तु वाजिनो ' ( स० ५–४–५ ७ ) ह्या ऋचेनें त्याचा होम करावा. ह्या वेळीं, उपस्तरण, अवदान व प्रत्यभिधारण अर्थात् दुसऱ्याकडून करवावीं ॥ ७ ॥

**अमात्येभ्य इतरा दद्यात् ॥ ८ ॥**

तुपात न भिजविलेल्या दुसऱ्या अर्ध्या धाना ( भाजलेले सातू ), स्त्री-पुत्रादि परिवारास प्रसाद म्हणून द्याव्या व घृताक्तधाना शेषानें स्विष्टकृदाहुति देऊन होमशेष सपवावें. येथे श्रवणाकर्म सपलें ॥ ८ ॥

आता ह्यापुढें ही कडिका सपेपर्यंत सर्पबलि ह्या नावाचे कर्म सागतात.

**कलशात्सक्तूनां दर्वी पूरयित्वा प्रागुपनिष्क्रम्य शुचौ देशेऽपोऽवनिनीय सर्पदेवजनेभ्यः स्वाहेति हुत्वा नमस्करोति । ये सर्पाः पार्थिवा ये आन्तरिक्ष्या ये दिव्या ये दिश्यास्तेभ्य इमं बलिमाहार्षं तेभ्य इमं बलिमुपाकरोमीति ॥ ९ ॥**

दिवसा यवसक्तूचें मडकें व लाकडी पळी नव्या शिंक्यावर ठेवली असतात, त्यापैकीं पळीमध्यें, पळीभरून पीठ घेऊन ती पळी तशीच हातात घ्यावी, व पूर्वदिशेला बाहेर जाऊन शुद्ध प्रदेश पाहून तेथें पाणी शिंपडून त्यावर ' सर्पदेवजनेभ्य स्वाहा ' ह्या मत्रानें तें पीठ ओतून आहुति द्यावी. नतर हात जोडून ये सर्पा पासून बलिमुपाकरोमिपर्यंत असलेला सूत्रोक्त मत्र म्हणून देवताना नमस्कार करावा ॥ ९ ॥

**प्रदक्षिणं परीत्य पश्चादग्नेरुपविश्य सर्पोऽसि सर्पतां सर्पाणा-**

मधिपतिरस्यन्नेन मनुष्यांस्त्रायसेऽपूपेन सर्पान्यज्ञेन देवांस्त्वयि मा सन्तं त्वयि सन्तः सर्पा मा हिंसिषुर्ध्रुवान्ते परिददामीति ॥१०॥

नतर त्या बळीला प्रदक्षिणा करून त्याच्या पश्चिमेस येऊन बसावें व सर्पोऽसि पासून ध्रुवपर्यंत मत्र म्हणून पुढें प्रत्येक कुटुम्बीय व्यक्तीचें द्वितीयान्त नाम उच्चारून परिददामि म्हणावें. ह्या मत्राला मत्र अशी सज्ञा असून ह्याचा उच्चार उपाशु म्हणजे दुसऱ्यास ऐकू येणार नाहीं असा करावा. ह्याच्या विवरणाकरता, कुमारिलभट्टाच्या कारिका ह्यापुढें सार्थ देतो. 'इद कार्यमनेनेति न कचिदृश्यते विधि । लिङ्गादेवेदमर्थत्व येषा ते मन्त्रसज्ञका' ॥ १ ॥ अर्थ —ह्या मत्रानें अमुक करावें असें स्पष्ट विधान नसून केवळ मत्राच्या अर्थावरून ह्याचा अमुक कृत्यात विनियोग असावा असें कळतें. त्याला मन्त्र ( मननात्मक ) अशी सज्ञा आहे. 'जपानुमन्त्रणे मन्त्र उपस्थानाभिमन्त्रणे । मन्त्रो य कर्मकरणे गृह्यकर्मण्युपाशु पट् ॥ २ ॥ अर्थ.—गृह्यकर्मामध्यें, जप, अनुमत्रण, मत्र, उपस्थान, अभिमत्रण आणि कर्मकरणमत्र ( ज्याचा उच्चार चालू असता क्रिया करतात ) ह्या सहाचा उपाशु म्हणजे अगदीं हळू उच्चार करावा ॥ १० ॥

ध्रुवामुं ते ध्रुवामुं त इत्यमात्यानन्नुपूर्वम् ॥ ११ ॥

ध्रुवशब्दानतर, पुत्र, विवाह न झालेल्या मुली व शेवटीं, भार्या ह्या परिवारस्थ मडळींचीं द्वितीयांत नावें उच्चारून सरक्षणार्थ सर्पदेवाना प्रत्येकाचें परिदान करावें. परिदानांची आवृत्ति सुचविण्याकरिता 'ध्रुवामुं' ह्याची पुनरावृत्ति केली आहे. परिदानाचीं उदाहरणें. ध्रुव गोविन्द (पुत्र) ते परिददामि, ध्रुव शारदा ( कन्या ) ते परिददामि, ध्रुव सरस्वतीं ( भार्या ) ते परिददामि वगैरे वगैरे ॥ ११ ॥

## ध्रुव मां ते परिददामीत्यात्मानमन्ततः ॥ १२ ॥

शेवटीं ध्रुव मां ते परिददामिपर्यंत सर्पोसि वगैरे मंत्र म्हणून स्वतःचेंही परिदान करावें. उपदेशक्रमानेंच बोध शक्य असतां 'अन्ततः' (शेवटीं) हें अधिक पद परिददामि शब्द, परिवाराच्या परिदानांतही लागतो हें सुचविण्याकरितां घातलें आहे ॥ १२ ॥

## नैनमन्तरा व्यवेयुरापरिदानात् ॥ १३ ॥

परिदान संपेपर्यंत यजमानाच्या व बळीच्या मधून कोणीही जाऊं नये. ह्या सूत्रानें पूर्वोक्त विधीचें नांव परिदान हें सुचविलें आहे ॥ १३ ॥

## सर्पदेवजनेभ्यः स्वाहेति सायं प्रातर्बलिं हरेदाप्रत्यवरोहणात् ॥ १४ ॥

मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशीला किंवा पूर्णिमेला प्रत्यवरोहण नांवाचें कर्म होत असतें. तेथपर्यंत दररोज, संध्याकाळीं व सकाळीं सर्पदेवजनेभ्यः स्वाहा ह्या मंत्रानें फक्त बलिदान करीत जावें, परिदान करूं नये. मंत्राच्या पुनरावृत्तीनें असा नियम ज्ञापित केला आहे. तथापि सक्तू व दर्वी तीच असावी, व हें बलिहरण असल्यामुळें शुद्धदेशाचीही आवश्यकता आहे. बाकीच्या सर्वांची जरूरी नाहीं ॥ १४ ॥

## प्रसंख्याय हैके तावतो बलींस्तदहरेवोपहरन्ति ॥ १५ ॥ ॥१॥

कोणी आचार्य, श्रावणी पूर्णिमेच्या दुसऱ्या दिवसापासून प्रत्यवरोहण दिवसापूर्वीच्या दिवसापर्यंत असलेले सर्व बळी मोजून, त्याच दिवशीं ते सर्व एकदम अर्पण करतात. 'ह' हें पद घालून सूत्रकारांनीं ह्या पक्षास आपली संमति दर्शविली आहे. येथें सर्पबलिकर्म व ह्या दुसऱ्या अध्यायांतली १ ली कंडिकाही संपूर्ण झाली. हिच्यांत एकंदर १५ सूत्रें आहेत ॥ १५ ॥ ॥ १ ॥

## अध्याय २ रा—कण्डिका २ री.

**आश्वयुज्यामाश्वयुजीकर्म ॥ १ ॥**

आश्विन मासातल्या पूर्णिमेचे दिवशीं आश्वयुजीकर्म करावें. अश्विनी, चंद्रनक्षत्र असलेली जी पूर्णिमा ती आश्वयुजी होय. त्या दिवशीं हें नक्षत्र नसल्यास श्रावणीप्रमाणेच कालाचें उपलक्षक समजावें ॥ १ ॥

**निवेशनमलंकृत्य, स्नाताः, शुचिवाससः, पशुपतये स्थालीपाकं निरूप्य, जुहुयुः, पशुपतये शिवाय शंकराय पृषातकाय स्वाहेति ॥ २ ॥**

भिंती सारविणें, रंग देणें, नव्या जमिनी वगैरे कृत्यांनीं घर सुशोभित करून, घरच्या सर्व मंडळींनीं विशेष प्रकारचें स्नान करून शुभ्र वस्त्रें धारण करावीं; व 'पशुपतये त्वा जुष्टं निर्वपामि' अशा प्रकारच्या मंत्रोहानें निर्वापप्रोक्षणें करून स्थालीपाक तयार करावा. नंतर 'पशुपतये शिवाय०' वगैरे मंत्रानें त्यांतील चरूचा सर्व मंडळी जवळ बसून, यजमानानें होम करावा. 'पशुपतये निरूप्य' ह्या विशेष वचनानें, ह्या कृत्याशिवाय ज्या गृह्यकर्मांत मंत्र उक्त असतील तेथें निर्वाप–प्रोक्षणें अमंत्रक करावी असें ज्ञापित केलें आहे. त्यामुळें श्रवणाकर्म वगैरेंत तसा नियम पाळला जातो. पुढें (गृ. ३।५।५) 'दधिसक्तुञ्जुहोति' असें द्वितीयान्तानें विधान असूनही 'दधिसक्तूप्राश्य' ह्या सूत्रानें हविःशेष दाखविला आहे, त्यावरून येथें जरी 'स्थालीपाक' अशी द्वितीया आहे तरी, सर्वचरूचा होम करू नये हें समजावें. 'जुहुयु' ह्या बहुवचनानें परिवारस्थ मंडळींनीं समन्वारम्भण (हातास हात लावणें) करावें हें ज्ञापित केलें आहे ॥ २ ॥

**पृषातकमञ्जलिना जुहुयात् ऊनं मे पूर्यतां पूर्णं मे मोपमदत् पृषातकाय स्वाहेति ॥ ३ ॥**

ह्यानतर ' ऊन मे ' वगैरे स्वाहान्तमत्रानें पृषातकद्रव्याचा ओंजळीनें होम करावा. दुधात तूप टाकिलें असता, त्या द्रव्याचें नाव पृषातक होय. ह्यावेळीं उपस्तरण व अभिघारण अर्थात् दुसऱ्यानें केलीं पाहिजेत, पृषातकाचें अवदान स्रुव्यानें करावें. कारण पातळ द्रव्य स्रुव्यानें, चरू हातानें, व पशू शस्त्रानें अवत्त करावा असा नियम आहे. असो. पुढें चरु व पृषातकातून स्विष्टकृदर्थक अवदान घेऊन होमशेष संपवावा. येथें आश्वयुजीकर्म संपलें ॥ ३ ॥

आता आग्रयणकर्म पुढच्या सूत्रानें सागतात.

**सजूर्ऋतुभिः सजूर्विधाभिः सजूरिन्द्राग्निभ्यां स्वाहा । सजूर्ऋतुभिः सजूर्विधाभिः सजूर्विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा । सजूर्ऋतुभिः सजूर्विधाभिः सजूर्द्यावापृथिवीभ्यां स्वाहेत्याहिताग्नेराग्रयणस्थालीपाकः ॥ ४ ॥**

अग्निहोत्र्यानें, आग्रयणकल्याचा स्थालीपाक करून ' सजूर्ऋतुभि० ' वगैरे तीन मत्रानीं त्याचा होम करावा. अग्निहोत्र्याचें वेगळें आग्रयण, श्रौतात आहे, तथापि आग्रयणेष्टि करणें शक्य नसल्यास आपत्कालीं त्यानें हें करावें, असें विधान केलें आहे. हे विधान येथें केल्यामुळें अर्थात् ह्यात पाकयज्ञाचे धर्म येतात ' गृह्याणि वक्ष्याम ' अशी प्रतिज्ञा असूनही पुढच्या सूत्रातल्या ' शालाग्नौ ' ह्या अधिक घातलेल्या पदानें अग्निहोत्र्यानें हेंही आग्रयण त्रेताग्नीवरच करावें असें समजतें ॥ ४ ॥

**अनाहिताग्नेरपि शालाग्नौ ॥ ५ ॥** ॥ २ ॥

अग्निहोत्री नसणारानें देखील गृह्याग्नीवर हें कर्म करावें. श्रौतोक्त व ह्या अशा दोन्ही आग्रयणात स्विष्टकृत् झाल्यावर चरूचा अश घेऊन डाव्या हातावर ठेवावा व उजव्या हातानें, ' प्रजापतये त्वा ' हा मत्र म्हणून

नाभीला स्पर्श करावा. नंतर 'भद्रान्न. श्रेय' ' ह्या मंत्राने चरुभक्षण करावें व आचमन करून 'अमोसि०' ह्या मंत्राने पुन्हा नाभीला (वेंबी) स्पर्श करावा. पुढें पत्नीनेंही अमंत्रक हविःशेषाचें भक्षण करावें. (गृह्यवृत्ति पहा). आग्रयण कर्म 'शरदि व्रीहिभिर्यजेत,' ह्या वचनावरून शरदृतूंत व पर्वांतर करावें असे समजतें. (आश्व० श्रौ० ९–१ पहा). सोमदेवताक चरूचा याग ह्या कर्माशीं एकत्र केल्यास चालेल. आग्रयणस्थालीपाक हा कर्मधारय समास असून त्यापैकीं स्थालीपाक हे पद, अनग्निहोत्र्याने फक्त स्थालीपाकच करावा, श्रौतोक्त पक्ष करू नये हा अर्थ बोधित करतें. येथें २ री कण्डिका म्हणली. हीमध्यें ५ सूत्रें आहेत ॥ ५ ॥ ॥ २ ॥

## अध्याय २ रा—कण्डिका ३ री.

### मार्गशीर्ष्यां प्रत्यवरोहणं चतुर्दश्याम् ॥ १ ॥

मार्गशीर्षी पूर्णिमेच्या पूर्वदिवशींच्या चतुर्दशीस म्हणजे मार्गशीर्ष शुद्ध चतुर्दशीस प्रत्यवरोहण नावाचें कृत्य करावें. 'मार्गशीर्ष्यां' ही सप्तमी सामीप्यबोधक आहे. मार्गशीर्षी म्हणजे मृगशीर्षनक्षत्रयुक्त पूर्णिमा किंवा तदुपलक्षित पूर्णिमा होय ॥ १ ॥

### पौर्णमास्यां वा ॥ २ ॥

अथवा मार्गशीर्षी पूर्णिमेस प्रत्यवरोहण करावें ॥ २ ॥

निवेशनं पुनर्नवीकृत्य लेपनस्तरणोपस्तरणैरस्तमिते पायसस्य जुहुयुरपश्वेतपदा अहि पूर्वेण चापरेण च। मम च वारुणीरिमाः सगाध राजबान्धवीः स्वाहा । नवै श्वेतस्याभ्यागारेऽहिर्जघान किञ्चन। श्वेताय वैदार्वाय नमः स्वाहेति ॥ ३ ॥

दिवसा भिंती सारवून रंग देऊन व जमीन स्वच्छ करून गृह नव्या-सारखें करावें. व रात्रीं 'अपश्वेतपदा०' आणि 'नश्वेत०' ह्या वर दिलेल्या दोन मंत्रांनीं पायसाच्या (खीर) दोन आहुति सर्वांनीं मिळून द्याव्या 'तत्कालाश्चैव तद्गुणाः' म्हणजे अंगभूत कृत्यें प्रधानाच्या कालींच करावीं ह्या नियमावरून स्थंडिलोपलेपनादिक कृत्येंही रात्रींच करावीं असे ठरतें ॥ ३ ॥

**नात्र सौविष्टकृत् ॥ ३ ॥**

ह्या कृत्यांत स्विष्टकृत् मुळींच करूं नये येथल्या 'अत्र' ह्या अधिक पदानें अन्य ठिकाणीं स्विष्टकृत् होम प्रधानकर्मानंतर किंवा सर्व कर्माच्या शेवटीं करावा असा नियम सिद्ध होतो, नाहींतर त्याची कांहीं जरूरी नव्हती ॥ ४ ॥

**अभयं नः प्राजापत्येभ्यो भूयादित्यग्निमीक्षमाणो जपति शिवो नः सुमना भवेति हेमन्तं मनसा ध्यायात् ॥ ५ ॥**

'अभयं नः प्राजापत्येभ्यो भूयात्' असे म्हणून अग्नीकडे पाहावें व 'शिवो नः सुमना भव' म्हणून हेमंतशब्दाचें मनानें ध्यान करावें 'मनसा' ह्या अधिकपदानें, अर्थाचें ध्यान मुख्य असूनही येथें शब्द-ध्यान करावें असे ज्ञापित केलें आहे ॥ ५ ॥

**पश्चादग्नेः स्वस्तरः स्वास्तीर्णस्तस्मिन्नुपविश्य स्योना पृथिवि भवेति जपित्वा संविशेत्सामात्यः प्राक्शिरा उदङ्मुखः ॥ ६ ॥**

पुढें यजमानानें स्वतःचा बिछाना स्वतःच अग्नीच्या पश्चिमेस पसरून त्यावर सर्व परिवारासह बसून 'स्योना पृथिवीभव०' (स० १-२-६) ह्या मंत्राचा जप करावा व नंतर सर्व स्त्रीपुत्रासह स्वतः पूर्वेकडे डोकें करून व उत्तरेकडे तोंड करून निजावें ॥ ६ ॥

यथावकाशमितरे ॥ ७ ॥

पुत्र वगैरे इतर मंडळींनी जशी जागा होईल त्याप्रमाणें उत्तरेकडे तोंड करून उजव्या कुशीवर निजावें ॥ ७ ॥

ज्यायान् ज्यायान्वाऽनन्तरः ॥ ८ ॥

किंवा यजमानापुढें स्त्री, वडील मुलगा वगैरे क्रमानें वडील वडील असतील त्या क्रमानें निजावें व सर्वांच्या उत्तरेस सर्वांत धाकट्यानें निजावें असा दुसरा पक्ष आहे ॥ ८ ॥

मन्त्रविदो मन्त्राञ्जपेयुः ॥ ९ ॥

घरच्या मंडळीपैकीं जे मंत्रवेत्ते असतील त्या सर्वांनीं 'स्योना पृथिवी०' वगैरे स्वस्त्ययनापर्यंतचे मंत्र म्हणावे ॥ ९ ॥

संहाय अतो देवा अवन्तु न इति त्रिः ॥ १० ॥

नंतर सर्वांनीं उठून पूर्वेकडे तोंड करून 'अतो देवा अवन्तु०' ही ऋचा तीनदां म्हणावी ॥ १० ॥

एतां दक्षिणामुखाः प्रत्यङ्मुखा उदङ्मुखाश्चतुर्थम् ॥ ११ ॥

पुढें ह्याच ऋचेचा, एकेक चरण क्रमानें, दक्षिण, पश्चिम व उत्तर ह्या दिशाकडे तोंडें करून म्हणावा; अशा रीतीनें ती ऋचा चवथ्यादा म्हणावी. 'एतां' ह्या अधिक पदानें वरच्यापेक्षा विधानभेद दाखविला आहे. नंतर सर्वांनीं प्रायश्चित्तादि होमशेष संपवून आपापल्या बिछान्यावर जाऊन निजावें ॥ ११ ॥

संहाय मार्याणि स्वस्त्ययनानि च जपित्वान्नं संस्कृत्य ब्राह्मणान्भोजयित्वा स्वस्त्ययनं वाचयीत ॥ १२ ॥ ॥ ३ ॥

दुसऱ्या दिवशीं उठून सूर्योदय झाल्यावर सौरसूक्तें व स्वस्त्ययनसूक्तें जपून अन्न शिजवून ब्राह्मणांना भोजन घालें व त्यांच्याकडून 'ॐस्वस्ति'

( कल्याण असो ) असे म्हणावें 'सूर्यो नो दिव०', 'उदुत्यजातवेदस' वगैरे नऊ ऋचा, चित्र देवाना० आणि नमो मित्रस्य० ह्याना सौरसूक्तें म्हणतात व ' आनो भद्रा.०' 'स्वस्ति नो मिमीता०' ' परावतो ये दिधिषन्त आप्यम् ' ह्या स्वस्तिशब्दयुक्त सूक्ताना स्वस्त्ययनसूक्तें म्हणतात. येथें ' अन्न सस्कृत्य ' हे विशेषवचन, चरु—( पायस ) शेषानें ब्राह्मणभोजन न व्हावें म्हणून घातलें आहे. त्यामुळे अनुप्रवचनीयविषयीं चरुशेषानेंच ब्राह्मणभोजन होतें येथें प्रत्यवरोहणकर्म सपले व येथेंच ह्या दुसऱ्या अध्यायाची तिसरी कंडिका सपली, हीमध्ये एकदर सूत्रें १२ आहेत ॥ २ ॥ ॥ ३ ॥

---

## अध्याय २ रा—कण्डिका ४ थी.

### हेमन्तशिशिरयोश्चतुर्णामपरपक्षाणामष्टमीष्वष्टकाः ॥ १ ॥

हेमंत आणि शिशिर ह्या दोन ऋतूंतल्या म्हणजे मार्गशीर्ष, पौष, माघ व फाल्गुन ह्या चार महिन्यांतल्या चार कृष्णपक्षांतल्या अष्टमीस अष्टका ( अष्टकाश्राद्ध ) कराव्या. शाखान्तराप्रमाणें तीनच अष्टका होऊं नयेत म्हणून सूत्रांत ' चतुर्णां ' हें पद घातलें आहे ॥ १ ॥

### एकस्यां वा ॥ २ ॥

अथवा चौघींपैकीं एकाच अष्टमीस अष्टकाकर्म करावें असा विकल्प आहे. हें कर्म त्रिदिनात्मक आहे, म्हणजे त्या अष्टमीच्या पूर्वदिवशीं ( सप्तमीस ) ' पूर्वेद्यु श्राद्ध,' अष्टमीस ' अष्टकाश्राद्ध ' व तिच्या पुढच्या दिवशी म्हणजे नवमीस ' अन्वष्टकाश्राद्ध ' होत असतें. ह्याचें वर्णन ह्यापुढें क्रमानें आहे ॥ २ ॥

## पूर्वेद्युः पितृभ्यो दद्यात् ॥ ३ ॥

अष्टकाच्या पूर्व दिवशीं म्हणजे सप्तमीला पितृपितामहप्रपितामह ( बाप, आजा व पणजा ) ह्या पितराच्या उद्देशानें पिंडदान व ब्राह्मणभोजन करावें. अन्वष्टक्यामध्यें ' पितृभ्यो दद्यात् ' ( गृ. २।५।४ ) ह्या सूत्रानें पिंडदान विहित आहे; त्याच्या सारखेंच हेंही विधान असल्यामुळें येथेंही साम्यास्तव पिंडदान प्राप्त आहे, व ' ब्राह्मणान्भोजयेदित्युक्तम् ' ( गृ. २।४।१६ ) ह्या सूत्रातल्या ' इत्युक्तम् ' ह्या अधिक पदानी ह्या पूर्वेद्यु श्राद्धातही ब्राह्मणभोजन करावें असें ज्ञापित केलें आहे. त्यापैकीं, ' पिंडदान, पिंडपितृयज्ञविधीप्रमाणें करावें. हा विधी श्रौतसूत्रात असून पुढें अन्वष्टक्यात त्याचा संक्षेप देणार आहों. ब्राह्मणभोजन हे पार्वणश्राद्धाप्रमाणें करावें. हा विधि पुढें चवथ्या अध्यायाच्या ७ व्या खडात सूत्रकार स्वत च सागणार आहेत. ह्या दोन्ही कृत्याना येथे तन्त्राची अपेक्षा असल्यामुळें इतरत्र सागितलेल्या त्या कर्मांचाच येथे अतिदेश केला पाहिजे ॥ ३ ॥

## ओदनं कृसरं पायसम् ॥ ४ ॥

पिंडपितृयज्ञविधीचा, ह्या पूर्वेद्यु कृत्यात अतिदेश केला आहे त्यामध्यें गृह्याग्नीवर चरु शिजविण्यास सागितला आहे. त्याच्या जागीं ह्या कृत्यात, नित्याग्नीवर ( गृह्य ) भात, तिळमिश्रित भात ( कृसर ) व पायस म्हणजे दुधात शिजविलेला भात हे तीन पदार्थ शिजवावे ॥ ४ ॥

## चतुःशरावस्य वाऽपूपान् ॥ ५ ॥

किंवा वरचे तीन पदार्थ न शिजविता, त्याच्याबद्दल चार परळ भरून धान्य दळून त्याचे घारगे ( अपूप ) होमाकरता तयार करावे असा दुसरा पक्ष आहे. हे तयार करण्यास पुष्कळ साधनें व स्त्रीची जरूरी असल्यामुळें लौकिकाग्निसिद्धच घ्यावे. गृह्याग्नीवर शिजवू नये. ह्याप्रमाणें दोन

पक्षांतला पदार्थांचा नियम फक्त होमापुरताच आहे; ब्राह्मणभोजनाला लागू नाहीं. अष्टका चार असल्यामुळें, पूर्वेद्युः व अन्वष्टकाही अर्थात् चार चार होतात ॥ ५ ॥

उदीरतामवर उत्परास इत्यष्टाभिर्हुत्वा यावतीभिर्वा कामयीत ॥ ६ ॥

अग्नौकरणाच्या जागीं 'उदीरतामवर०' वगैरे (ऋक्सं० ७-६-१७) आठ मंत्रांनीं किंवा त्यापुढें पितृलिंगक अशा आणखीही आपल्या इच्छेस येतील तितक्या मंत्रांनीं आहुति द्याव्या. ह्या एकंदर ऋचा चवदा आहेत, म्हणून आठ किंवा चवदा आहुति द्याव्या असें वृत्तींत म्हटलें आहे. ह्यापुढें वृत्तीला अनुसरून थोडक्यांत पूर्वेद्युःश्राद्धाचें स्वरूप संक्षेपतः देतों. प्रथम, पिंडपितृयज्ञाप्रमाणें ( श्रौतसू० २।६।१ पहा ) इध्माधानान्त कर्म करून चरुश्रपणाच्याबद्दल ओदनादिक तीन पदार्थ किंवा अपूप शिजवावे. नंतर ब्राह्मणपादक्षालनापासून आच्छादनप्रदानापर्यंत कृत्य पार्वणश्राद्धाप्रमाणें करून, ओदनादि पदार्थांपैकीं अन्न काढून घेऊन तें घृतयुक्त करावें, व ब्राह्मणांची अनुज्ञा घेऊन पिंडपितृयज्ञांत दोनच अग्नौकरणमंत्र आहेत त्या जागीं ' उदीरतां० ' वगैरे आहुति देऊन व मेक्षण ( काष्ठाचें होमसाधन ) अग्नींत टाकून, ब्राह्मणांना अन्नदान वगैरे शेषनिवेदनान्त कृत्य पार्वणश्राद्धाप्रमाणें करावें. ब्राह्मणांचें जेवण झाल्यावर आंचवण्यापूर्वी पिंडपितृयज्ञाप्रमाणे पिंडदानादि पात्रोत्सर्गापर्यंत विधि करून श्राद्धशेष संपवावा. सारांश, पिंडपितृयज्ञ व पार्वणश्राद्ध ह्या दोहोंच्या मिश्रणानें हीं श्राद्धें होत असून मध्यें मध्यें कांहीं थोडे फरक आहेत ॥ ६ ॥

अथ श्वोभूतेऽष्टकाः पशुना स्थालीपाकेन च ॥ ७ ॥

नंतर दुसऱ्या दिवशीं म्हणजे अष्टमीला पशुद्रव्यानें किंवा स्थालीपाकानें अष्टका कराव्या. पशूचा अंगभूत स्थालीपाक येथें विधेय नसल्या-

मुळें येथें हा स्थालीपाक वेगळाच समजावा, तसेंच, "पशोरभावे स्थालीपाकः प्रवर्तते:" म्हणजे पशु नसल्यास स्थालीपाक होतो हा दुसऱ्या शास्त्रातल्या वचनास अनुसरून ह्या सूत्रात चचा अर्थ किंवा असा केला आहे ॥ ७ ॥

अप्यनडुहो यवसमाहरेत् ॥ ८ ॥

पशु किंवा स्थालीपाक ह्यानीं अष्टका करण्यास सामर्थ्य नसेल तर गाडा ओढण्यास समर्थ अशा बैलाला गवत खाण्यास घालावें ॥ ८ ॥

अग्निना वा कक्षमुपोषेत् ॥ ९ ॥

तेंही न साधल्यास पितराकरिता, अग्नीनें वाळलेलें गवत जाळावें ॥९॥

एष मेऽष्टकेति ॥ १० ॥

तृणदान करताना किंवा गवत जाळताना हा विधिच, माझी अष्टका अशी भावना ठेवावी ॥ १० ॥

नत्वेवानष्टकः स्यात् ॥ ११ ॥

कोणताही प्रतिनिधि आपल्या शक्तीप्रमाणें करावा, परतु अष्टकारहित राहू नये. वरचे चारी प्रकार न साधल्यास साग वेदाध्ययन केलेल्या ब्राह्मणास उदकपूर्ण कुंभ द्यावा किंवा निदान श्राद्धमंत्राचे पठन करावें हे शास्त्रांतरांतले पक्ष करावे, हें सुचविण्याकरिताच हें सूत्र आहे ॥ ११ ॥

तां हैके वैश्वदेवीं ब्रुवत आग्नेयीमेके सौर्यामेके प्राजापत्यामेके रात्रिदेवतामेके नक्षत्रदेवतामेके ऋतुदेवतामेके पितृदेवतामेके पशुदेवतामेके ॥ १२ ॥

ह्या अष्टकेची देवता विश्वेदेव ( बहुत देव ) आहेत असा मुख्य पक्ष असून, कोणी अग्नी, कोणी सूर्य, कोणी प्रजापति, कोणी रात्रि, कोणी नक्षत्रें, कोणी ऋतु, कोणी पितर, व दुसरे कोणी, पशु हिची देवता

आहेत असें म्हणतात. ह्यापैकीं पहिल्या पक्षाला ‘ह’ हें पद घालून सूत्रकारांनीं आपली संमति दाखविली आहे. कारण पुढें दिलेल्या ‘अग्ने नय’ वगैरे सात होममंत्रांत निरनिराळ्या पुष्कळ देवता आहेत व ‘**यत्किंचिद्बहुदेवत्यं तद्वैश्वदेवानां स्थाने युज्यते**’ म्हणजे, जें कांहीं बहुदेवताक असेल ते विश्वेदेवदेवताकाच्या जागीं योजिलें जातें, असें निरुक्तांत म्हटलें आहे त्यावरून पहिला पक्षच योग्य आहे. पुढचे आग्नेयादि आठ पक्ष मानल्यास ‘अग्नये स्वाहा’ ‘सूर्याय स्वाहा’ वगैरे नाममंत्रांनीं, पशु वगैरेंचा होम करावा लागेल व गृह्यस्मृतीवरून परंपरेनें आलेले ‘अग्ने नय’ वगैरे मंत्र निरर्थक मानावे लागतील किंवा प्रयाजादिमंत्राप्रमाणें लक्षणा, योगार्थ वगैरे ओढाताण करून अग्नि, सूर्य, प्रजापति वगैरे देवतांकडे लावावे लागतील. परंतु बहुदैवत्य मंत्र विश्वेदेवदेवताक समजावा असें स्पष्ट शास्त्रवचन असतां लक्षणादिकांच्या आधारावर दुसरे पक्ष मानणें योग्य नाहीं. हेंच सुचविण्याकरतां पहिल्या वैश्वदेवपक्षांत ‘ह’ हा शब्द घातला आहे ॥ १२ ॥

**पशुकल्पेन पशुं संज्ञप्य प्रोक्षणोपाकरणवर्जं वपामुत्खिद्य जुहुयात्। वह वपां जातवेदः पितृभ्यो यत्रैनान्वेत्थ निहिताः पराके मेदसः कुल्या उपैनांस्स्रवन्तु सत्या एता आशिषः सन्तु सर्वाः स्वाहेति ॥ १३ ॥**

प्रोक्षण व उपाकरण सोडून इतर, पूर्वोक्त पशुकल्पास अनुसरून पशुसंज्ञपन करावें, व वपा काढून घेऊन ‘वह वपां०’ ह्या सूत्रोक्त मंत्रानें तिचा होम करावा. प्रोक्षणाचा निषेध फक्त पशूपुरताच असून तदंगभूत स्थालीपाकाला नाहीं हें सुचविण्याकरितां ‘पशुकल्पेन’ हें अधिकपद आहे. तसेंच उत्खेदन ( काढून घेणें ) अर्थात् सिद्ध असतां, ‘उत्खिद्य’ हें

अधिक पद घालून आग्नेयादि कोणत्याही पक्षी ह्याच मंत्राने होम करावा हें सुचवून अमंत्रक नामानेच ( अग्नये स्वाहा वगैरे ) होम करणाऱ्या पक्षांचा निषेध केला आहे ॥ १३ ॥

**अथावदानानां स्थालीपाकस्य च अग्ने नय सुपथा राये अस्मानिति द्वे ॥ ग्रीष्मो हेमन्त ऋतवः शिवा नो वर्षाः शिवा अभया शरत्नः । संवत्सरोऽधिपतिः प्राणदो नोऽहोरात्रे कृणुतां दीर्घमायुः स्वाहा ॥ शान्ता पृथिवी शिवमन्तरिक्षं द्यौर्नो देव्यभयं नो अस्तु । शिवा दिशः प्रदिश उद्दिशो न आपो विद्युतः परिपान्तु सर्वतः स्वाहा ॥ आपो मरीचीः प्रवहन्तु नो धियो धाता समुद्रो वहन्तु पापम् । भूतं भविष्यदभयं विश्वमस्तु मे ब्रह्माधिगुप्तः स्वाराक्षराणि स्वाहा । विश्व आदित्या वसवश्च देवा रुद्रा गोप्तारो मरुतः सदन्तु । ऊर्जं प्रजाममृतं पिन्वमानः प्रजापतिर्मयि परमेष्ठी दधातु स्वाहा ॥ प्रजापते न त्वदेतान्यन्यः ॥ १४ ॥**

ह्या सूत्रांत ' स्थालीपाकस्य ' येथें एकवचन जातिबोधक असल्यामुळें पश्वङ्गभूतस्थालीपाक व दुसरा केवळ स्थालीपाक ह्या दोहींचेंही ग्राहक आहे. असो, पशूचीं अवदानें व तदंगभूत स्थालीपाक, ह्याच्या होमाचे, शिवा दुसऱ्यापक्षीं केवळ स्थालीपाकाच्या होमाचे, ' अग्नेनय० ' वगैरे संहितोक्त दोन व ' ग्रीष्मो हेमन्त० ' वगैरे वर दिलेले सूत्रोक्त पांच, असे एकंदर सात होममंत्र आहेत. स्वररहित सूत्रोक्तमंत्र एक स्वरानच म्हणावे. मुख्य मतांप्रमाणें. ज्या ज्या मंत्रात ज्या ज्या देवताचा उद्देश असेल त्या त्याच मंत्रदेवता समजाव्या ॥ १४ ॥

**नाऽस्विष्टकृत्यष्टमी ॥ १५ ॥**

आणि कोणत्याहीपक्षीं स्विष्टकृदाहुति आठवी धरावी. ह्यांतील ' अष्टमी ' हा व्यर्थ झालेल्या पदानें, पश्वङ्गभूत स्थालीपाक सोडून वेगळा केल्यास

स्विष्टकृत् देखील वेगळा करावा असें ज्ञापित केलें; ह्या ज्ञापकाप्रमाणें पृथक्स्थालीपाकपक्षीं पशूच्या सात व स्थालीपाकाच्या सात अशा चवदा आहुती होऊन स्विष्टकृदाहुति पंधरावी होऊं लागेल, म्हणून ह्या अष्टकांतल्या पशुहोमांत पश्वंगस्थालीपाकाचा पृथक् होम करूं नये असा अधिकांशही अष्टमी ह्या पदानें ज्ञापित केला आहे. केवळ स्थालीपाकाच्या पक्षांत संशयच राहात नाहीं; मंत्रांनींच होम करावा, कोठेही नामधेयांनीं करूं नये असेंही अष्टमी ( आठवी ) ह्या पदानें समजते, हेंही आणखी गृह्यवृत्तींत म्हटलें आहे ॥ १५ ॥

**ब्राह्मणान्भोजयेदित्युक्तम् ॥ १६ ॥ ॥ ४ ॥**

नंतर ब्राह्मणांना भोजन द्यावें. येथें ' तत्र च ' ( तेथेंही ) ह्या पदाचा अध्याहार करून ' इत्युक्तम्, ( हें पूर्वी सांगितलें ) ह्या अधिक पदांनीं, हें ब्राह्मणभोजन, मागें सांगितलेल्या पूर्वेद्युः श्राद्धांतही करावें असा अर्थ ज्ञापित केला आहे. ब्राह्मणभोजनपदानें पार्वणोक्त विधीचें उपलक्षण केलें आहे. आतां अष्टकाश्राद्धाचा संक्षेप येथें देतों. पूर्वोक्त मंत्रांनीं स्विष्टकृदाहुतीसह आठ आहुति देऊन होम संपवावा. नंतर ब्राह्मणपादक्षालनादि आच्छादनान्त कर्म पार्वणश्राद्धाप्रमाणें ( गृह्यसू० ४।७।१ ) करून, भोजनार्थक अन्नांतून दोन दोनआहुति एकदम किंवा थोड्यांच्या मतानें, वेगवेगळ्या काढून घेऊन ' सोमाय पितृमते ' वगैरे दोन मंत्रांनीं विप्रहस्तावर होम करावा. हें हुत ब्राह्मणांनीं खावें किंवा उदीच्यांच्या मताप्रमाणें पात्रांतच टेवून आचमन करावें. नंतर ब्राह्मणांचें भोजन झाल्यावर त्यांनीं आचमन करण्यांपूर्वी किंवा नंतर, ब्राह्मणांदेखतच पिंडदान करून, पत्नीकडून मध्यम पिंडाचें प्राशन करवावें. नंतर त्या ब्राह्मणांकडून स्वस्ति बोलवून श्राद्ध संपवावें. येथें ह्या द्वितीयाध्यायाची चवथी कंडिका संपली. हिजमध्यें एकंदर सोळा सूत्रें असून अष्टका श्राद्ध सांगितलें ॥ १६ ॥ ॥ ४ ॥

## अध्याय २ रा--कण्डिका ५ वी.

**अपरेद्युरन्वष्टक्यम् ॥ १ ॥**

अष्टकाच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे नवमीला अन्वष्टक्यश्राद्ध करावें ॥१॥

**तस्यैव मांसस्य प्रकल्प्य, दक्षिणाप्रवणेऽग्निमुपसमाधाय परिश्रित्योत्तरतःपरिश्रितस्य द्वारं कृत्वा, समूलं बर्हिस्त्रिरपसलैर्विधून्वन्परिस्तीर्य हवींष्यासादयेदोदनं कृसरं पायसं दधिमन्थान्मधुमन्थांश्च ॥ २ ॥**

अष्टमीच्या दिवशीं ज्या पशूचें संज्ञपन केलें असेल, त्याचेंच मांस, अन्वष्टक्यश्राद्धाच्या ब्राह्मणभोजनाकरिता ( शास्त्रांतरावरून, ) शिजवावें. नंतर दक्षिणेकडे उतार असलेल्या जागीं स्वतः यजमानानें अग्नीची ( गृह्य ) स्थापना करून सभोंवार पडद्यानीं खोली बनवावी. ह्या खोलीचें दार उत्तरेच्या बाजूस करावें. येथें 'परिश्रित' ह्या पदाची पुनरावृत्ति केल्यामुळें हें पडद्याचें आच्छादन नित्य नाहीं असें सूचित होतें. असो. ह्या कृत्यानंही काहीं विषयांत पिंडपितृयज्ञाचा विधि आहे, त्याचा अपवाद सांगतात. गृह्याग्नि व अतिप्रणीताग्नि ( पुढें ३ ऱ्या सूत्रांत समजेल ) ह्या दोहोंच्या परिस्तरणाच्या वेळेस मुळासकट उपटलेले दर्भ घेऊन ते न हलविता त्यानीं प्रदक्षिणेच्या उलट म्हणजे उजवीकडून डावीकडे अशा क्रमानें तीनदा परिस्तरण घालावें. अग्रे अर्थात् पिंडपितृयज्ञाप्रमाणें ( श्रौतसू० २-६-१ ) आग्नेयीस करावीं. पुढें स्थालीपाकाचा अभिघार सांगितला आहे त्याऐवजीं, भात, खिचडी, पायस, दधिमंथ व मधुमंथ ह्या पांच द्रव्यांची स्थापना करून अभिघार करावा. ह्यावेळीं चरूचें श्रपण, सर्व गृह्यकर्माप्रमाणें नियमानेंच करावें. दधिमंथ म्हणजे दधिमिश्र सक्तु

(सातूचे पीठ) व मधुमथ म्हणजे मधुमिश्रित सक्तु होय. पिंडदानाच्या आधीं पाण्याने दोन रेघा काढून त्या एकदाच तोडलेल्या दर्भांनीं झाकाव्या ॥ २ ॥

**पिण्डपितृयज्ञकल्पेन ॥ ३ ॥**

हे *अन्वष्टक्यकर्म पिंडपितृयज्ञविधीप्रमाणें करावें* ह्या सूत्राने, अग्निप्रणयन, पात्रासादन, सोमाय पितृमते वगैरे दोन मंत्र, उपस्थान, पिंडप्रग्रहण व निनयन वगैरे पिंडपितृयज्ञस्थ कर्मांचा येथें अतिदेश केला आहे. *पिंडपितृयज्ञविधि, आश्वलायनकृत श्रौतसूत्राच्या दुसऱ्या अध्यायाच्या सहाव्या व सातव्या खंडामध्ये सांगितला आहे,* आणि याशिवाय मंडळींत श्राद्धसरूपाच्या द्वारानें प्रसिद्धही आहे, तथापि '**अनाहिताग्निर्नित्ये श्रपयित्वातिप्रणीय जुहुयात्**' म्हणजे अग्निहोत्री नसणाराने देखील गृह्याग्नीवर चरु शिजवून व अग्नीचे अतिप्रणयन करून पिंडपितृयज्ञ करावा असे श्रौतसूत्रांत म्हटले असून इतर पुष्कळ श्राद्धांत ह्या विधीचा अतिदेश केला असल्यामुळे, सर्वांना थोडी तरी कल्पना येण्याकरिता, त्या प्रयोगाचें संक्षिप्त स्वरूप गृह्यकारिकानुसार ह्यापुढें देतो एकाग्निक जो असेल त्यानें देखील दर्शदिवशीं अपराह्णकाली पितृयज्ञ करावा. प्रथमत औपासनाग्नि प्रदीप्त करून त्या सभोवतीं आग्नेयीकडे शेंडे केलेल्या दर्भांनीं परिस्तरणें घालावीं. ह्या कृत्यात सर्वच क्रिया व साधनें आग्नेय्यभिमुख असावीं. असो. नंतर अग्नीच्या वायव्येस किंवा ईशान्येस आग्नेय्यग्र दर्भ पसरून त्यावर चरुस्थाल्यादि कमंडलुपर्यंत १२ यज्ञसाधनें, एकेक ठेवून घ्यावीं पुढें चरुस्थाली व सूप हातात घेऊन अग्नीच्या दक्षिणेस असलेल्या भाताच्या गाड्यावर दक्षिणेच्या बाजूनें चढावें, व सुपामध्यें स्थाली ठेवून भातानें पूर्ण भरून शीग सुपात साठवावी. सुपांतून भात परत गाड्यात ओतावें. पुढें अग्नीच्या वायव्येस कृष्णाजिनावर ठेवलेल्या उखळींत, स्थालींतले भात ओतून पत्नीनें तें सडून एकमटीच

तांदूळ चांगले तयार करावे, व एकदाच चांगले धुवावे; आणि गृह्याग्नी-वर चरु शिजवावा. नंतर एक चांगले पेटलेलें लाकूड घेऊन गृह्याग्नीच्या आग्नेयीकडे केलेल्या स्थंडिलावर नेऊन 'ये रूपाणि प्रतिमुञ्चमाना०' (श्रौतसू० २-६-२) ह्या मंत्रानें त्याची स्थापना करावी. हाच अतिप्रणीताग्नि होय. ह्यालाही पूर्ववत् परिस्तरणें घालावीं. ह्या दोन अग्नींच्या मध्ये स्फ्यानें (खड्गवत्यज्ञियकाष्ठविशेष) 'अपहता असुरा०' ह्या मंत्रानें एक लेखा काढून प्रोक्षित करून ती एकदाच तोडलेल्या दर्भांनीं झांकावी. नंतर उत्पवन न केलेलें आज्य किंवा वितळविलेलें उत्पूत लोणी ध्रुवेंत (एक मोठी स्रुचा) ओतून ती अग्नीच्या दक्षिणेस दर्भावर ठेवावी. त्यातलें द्रव्य स्रुव्यानें घेऊन चरूवर अभिघार करून तो उत्तरेस उतरावा. नंतर तो उचलून अतिप्रणीताग्नीच्या पश्चिमेस दर्भावर ठेऊन त्याच्याच दक्षिणेस अञ्जन, अभ्यञ्जन (घृत किंवा तेल), कशिपु व उपबर्हण (दर्भादिकाची गादी व उशी) हीं ठेवावीं. नंतर अतिप्रणीताग्नीच्या पश्चिमेस बसून प्राचीनावीती होऊन इध्माधान करावें. नंतर मेक्षणानें (एक होमसाधन) अवदानधर्माप्रमाणें दोन चर्वाहुति घेऊन 'सोमाय पितृमते स्वधा नमः' आणि 'अग्नये कव्यवाहनाय स्वधा नमः' ह्या मंत्रांनीं त्याचा होम करावा. स्वाहाकारानें हे होम केल्यास मेक्षणत्यागापर्यंत उपवीती असावें व दुसऱ्या आहुतींची उलटापालट करावी, म्हणजे 'अग्नये कव्य०' ही आहुति प्रथम द्यावी. मेक्षण अग्नींत टाकावें. पुढें कमंडलूस्थ उदक घेऊन पूर्वोक्त लेखेवर पितृतीर्थानें (अंगुष्ठतर्जनीमध्य) जलसिंचन तीनदां करावें; त्याचे मंत्र 'शुन्धन्तां पितरः' वगैरे आहेत. त्यावर होमशेषाचे तीन पिंड (गोळे) करून; पितृपितामहप्रपितामह ह्यांच्या उद्देशानें 'एतत्ते विष्णो (वगैरे) येचत्वामत्रानु तेभ्यश्च' वगैरे मंत्राचे ऊह करून द्यावे. नांवें माहीत नसल्यास त्यांच्या जागीं तात पितामह प्रपितामह

असेंच नुसतें म्हणावें. त्रयीपैकीं जिवंत असतील त्यांच्या उद्देशानें, स्वाहाकारानें, डाव्या हातानें अग्नींत पिण्डांचा होम करावा. किंवा पिंडरहित विधि करावा, किंवा पिंडपितृयज्ञच करूं नये हे पक्ष, प्रयोगरत्नग्रन्थांत (नारायणभट्टी) लिहिले आहेत. असो, 'अत्रपितरो०' ह्या मंत्रानें, पिंडांचें एकदांच अनुमंत्रण करून डाव्या हातानें वळून उत्तरेकडे तोंड करावें व यथाशक्ति श्वासनिरोध करावा; नंतर पूर्ववत् वळून 'अमीमदन्त पितरो०' ह्या मंत्रानें पुन्हां पिण्डानुमंत्रण करावें व उपवीतीनें चरुशेष हुंगून पुन्हां प्राचीनावीतीनें (अपसव्य) 'शुन्धन्तां०' वगैरे तीन मंत्रांनीं पूर्ववत् पिंडांवर जलनिनयन करावें. मग 'अमुक शर्मन्नभ्यङ्क्ष्व' (उटणें लाव) वगैरे मंत्रांनीं तिन्ही पिंडांना क्रमानें तेल किंवा तूप लावावें व अङ्क्ष्व म्हणून काजळ (अंजन) लावावें. 'एतद्वः पितरोवासो०' ह्या मंत्रानें प्रत्येक पिंडावर कोऱ्या वस्त्राची दशी टाकावी. श्राद्धकर्ता पन्नास वर्षांपेक्षां जास्त वयाचा असल्यास त्यानें दशी ऐवजीं आपल्या हृदयावरचा किंवा दंडावरचा केस वहावा असें प्रयोगरत्नांत (नारायणभट्टी) म्हटलें आहे. नंतर 'नमो वः पितरो०' ह्या मंत्रानें व 'मनोन्वाहुवामहे०' (ऋक्सं. ८।१।१९) वगैरे तीन ऋचांनीं, पिंडांचें उपस्थान करून 'परेतन पितरः०' ह्या मंत्रानें पिंड हलवावे. (प्रवाहण करावें.) पुढें 'अग्ने तमद्या०' (ऋक्सं० ३।५।१०) हा मंत्र म्हणून औपासनाग्निसमोर जाऊन 'यदन्तरिक्षं पृथिवीं०' हा मंत्र, गार्हपत्यपद गाळून म्हणावा. म्हणजे 'अग्निर्मातस्मादेनसः प्रमुञ्चतु' असा ऊह, अनाहिताग्नीने करावा. नंतर 'वीरं मे दत्त पितरः' ह्या मंत्रानें मध्यम पिंड, सुपुत्रप्राप्तीस्तव पत्नीकडून खाववावा. त्यावेळीं तिनें 'आधत्त पितरो गर्भं०' हा मंत्र म्हणावा. दुसरे दोन पिंड पाण्यांत किंवा अतिप्रणीताग्नींत टाकावे; इध्मबर्हिर्मेक्षणांशिवाय नऊ यज्ञसाधनें शिल्लक राहिलीं

असतात तीं दोन दोन जोडीनें उचटून टाकावीं व नवें तृणासह उचलावें. अग्निहोत्र्याचा हा चरु, दक्षिणाग्नीवर होत असतो. केवळ गृह्याग्निमानानें पार्वणश्राद्ध व पिंडपितृयज्ञ, व्यतिषगानें ( मिश्रण ) करायचे असतात. तो प्रकार असा. प्रथम व्यतिषंग करण्याचा संकल्प करून, अञ्जनादिकाचे अग्नीच्या दक्षिणेस स्थापन होईपर्यंत पितृयज्ञकृत्य करावें. नंतर आच्छादनप्रदानापर्यंत पार्वणश्राद्धाचा विधि करावा; पुन्हां इध्माधानापासून मेक्षणत्यागान्त पितृयज्ञविधि करून, पुढे अन्नाभ्यनुज्ञान्त पार्वणकृत्य करावें. ह्यानंतर दोन्ही कृत्यांचा शेष संपवावा. दोन्ही सविस्तर प्रयोग, प्रयोगरत्नादिग्रंथांत पाहावें ॥ ३ ॥

## हुत्वा मधुमन्थवर्जं पितृभ्यो दद्यात् ॥ ४ ॥

इध्माधानान्त पितृयज्ञ व ब्राह्मणपादशौचादि आच्छादनान्त पार्वणकृत्य केल्यावर मधुमन्थाशिवाय ओदनादि चार पदार्थांतून अन्न उकरून घेऊन व घृताक्त करून त्याच्या दोन आहुति देऊन मेक्षणानुप्रहरणपर्यंत पितृयज्ञकृत्य करावें; पुढें रेखानिर्लेखनापर्यंत पार्वणश्राद्धकृत्य करून मधुमन्थासह पांचही पदार्थांनीं पिंड तयार करून पिंडदान करावें ॥ ४ ॥

## स्त्रीभ्यश्च सुराचाममित्यधिकम् ॥ ५ ॥

ह्या सूत्रांत 'पिण्डपितृयज्ञकल्पेन' ह्या पदाची अनुवृत्ति आणावी, कारण मूळ पितृयज्ञांत फक्त पित्रादि तिघांनाच पिंड दिले जातात. असो. आता सूत्रार्थ लिहितो. पितृत्रयीनंतर माता, पितामही व प्रपितामही ह्या तिघांनाही पिंडपितृयज्ञविधीनेंच पिंडदान करावें; मात्र त्यांच्या पिंडांत दारू व भाताची पेज हे पदार्थ अधिक घालावे. गूळ, मधु ( मोहाचीं फुलें ) व पीठ ह्या मूलद्रव्यांनीं बनणारी सुराही तीन प्रकारची असते असें वृत्तांत म्हटलें आहे. ह्या सूत्रावरून पाहतां, सूत्रकारांच्या कालाप्रमाणें मद्यही श्राद्ध-

वगैरे विधींत ग्राह्य मानीत असत असें दिसतें. हल्लीं मद्यमांसाचे प्रतिनिधि म्हणून तीळ व उडीद वगैरेंचा प्रचार सरसहा चालू आहे ॥ ५ ॥

कर्षूष्वेके द्वयोः षट्सु वा ॥ ६ ॥

पुरुष व स्त्रिया ह्यांना निरनिराळ्या दोन रेघांवर पिंडदान करीत असतात; परंतु कांहीं आचार्य लेखांच्या जागीं दोन किंवा सहा खळग्यांवर पिंडदान करावें असें म्हणतात. दोनच खळगे काढल्यास लांबट व सहा काढल्यास वाटोळे करावे. दोनच खळगे किंवा लेखा ह्यापक्षीं एकेका रेघेवर तीन तीन पिंड देतात ॥ ६ ॥

पूर्वासु पितृभ्यो दद्यात् ॥ ७ ॥

पूर्वेकडच्या लेखेवर किंवा कर्षूवर ( खळगे ) पित्रादित्रयाला पिंड द्यावे ॥ ७ ॥

अपरासु स्त्रीभ्यः ॥ ८ ॥

त्यानंतर पश्चिमेकडच्या लेखेवर किंवा खळग्यांवर मात्रादिक स्त्रियांच्या त्रयीला पिंड द्यावे. येथेंही त्रयींतील कोणी जिवंत असल्यास त्यांच्या पिंडांचा स्वाहाकारानें डाव्या हातानें, अग्नींत होम करावा. इतरपक्षही पूर्ववत् जाणावे. विशेष विधि देतों. 'शुन्धन्तां०' वगैरे मंत्रांतील पित्रादि पदें काढून तेथें 'मातरः पितामह्यः प्रपितामह्यः' असा ऊह करावा. माता वगैरे दोन किंवा बहुत असल्यास संबोधनांत व शब्दांच्या विभक्तींत द्विवचन–बहुवचनांचा ऊह करावा. अंजनादिकांतही 'अभ्यङ्क्ष्वाथाम् अभ्यङ्ग्ध्वम्' असे ऊह करावे. दोघांच्या पिंडाचें उपस्थान व प्रवाहण एकदमच करावे. वस्त्रदान, स्त्रीपुरुष-पिंडांना वेगवेगळें करावें. पिंडप्राशनाचे वेळीं स्त्रियांपैकींही मध्यम पिण्ड घेऊन दोन पिण्डांचें प्राशन करावें. ये चत्वामत्रानु ह्या जागीं स्त्रीपिण्डविषयांत याश्चत्वामत्रानु असा ऊह जयंत-

स्वामी करतात. वृत्तिकार ह्याच्या विरुद्ध आहेत; कारण अनुयायी मंडळी स्त्रीलिंगी तशीच पुल्लिंगीही संभवत असून त्या दोहोंच्या समासांत 'पुमान् स्त्रिया' त्या पाणिनीयसूत्राने एकशेष केल्यास 'ये' असें पुल्लिंगीरूपच शिल्लक राहते. जयंतास आपस्तम्बसूत्राचा आधार आहे. दोन किंवा बहुत स्त्रीपक्षीं 'त्वामत्रानु' मध्ये, युवां व युष्मान असे ऊह करावे. ऋग्मंत्रांत मातृ वगैरे पदांचा ऊह करूं नये. कारण, '**तस्मादृचं नोहेत्**' असा निषेध आहे. एकंदरींत 'शुंधतां०' ह्या मन्त्रा-शिवाय कोठेही मंत्रांत पितृपदाचे जागीं ऊह होत नाहीं, कारण मात्रादिकानाही सपिंडीकर्माने पितृपदवाच्यत्व आलें असतें. ॥ ८ ॥

**एतेन माध्यावर्षं प्रोष्ठपद्या अपरपक्षे ॥ ९ ॥**

पूर्वेद्यु: अष्टका व अन्वष्टका ह्या कर्मत्रयानेच भाद्रपदनक्षत्रयुक्त पूर्णिमेच्या पुढच्या कृष्णपक्षांत म्हणजे भाद्रपद कृष्णातल्या सप्तमी वगैरे तीन दिवशीं होणारें माध्यावर्ष नांवाचें कर्मही व्याख्यात होऊन गेलें. म्हणजे तेंही ह्याचप्रमाणें तीन दिवस करावें ॥ ९ ॥

**मासि मासि चैवं पितृभ्योऽयुक्षु प्रतिष्ठापयेत् ॥ १० ॥**

ह्या सूत्रांत 'अपरपक्षे' अशी अनुवृत्ति आहे. 'एवं' ह्या अधिक पदानें अपूर्णानुवृत्ति सूचित केल्यामुळें फक्त जवळच्या अन्वष्टक्याचाच परामर्श होतो. प्रत्येक महिन्याच्या कृष्णपक्षात ह्या अन्वष्टक्याप्रमाणें, फक्त पितृत्रयीच्याच उद्देशानें मासि मासि श्राद्ध करावें. श्राद्धकर्मांत सर्वच नियमसंख्याक असावें. त्यामुळें गंध, माल्य वगैरे उपचार एकदा, तीनदां, पाचदां वगैरे विषमसंख्येनें पितृस्थानीय ब्राह्मणांस द्यावे असें ठरतें. देवस्थानीय उपचार समसंख्यायुक्त असतात. समानकार्यच असल्यामुळें 'मासि मासि श्राद्ध' किंवा 'पार्वण श्राद्ध' करावें असा निष्कर्ष आहे ॥ १० ॥

**नवावरान्भोजयेत् ॥ ११ ॥**

प्रासंगिक वर्णन, प्रस्तुत विषयाचे निवारक होत नसतें, म्हणून अन्वष्टक्यश्राद्धात कमात कमी नऊ ब्राह्मणाना भोजन द्यावे, असा सूत्रार्थ होतो पूजनादिक कर्म अर्थात् पार्वणाप्रमाणें होतें ॥ ११ ॥

**अयुजो वा ॥ १२ ॥**

अथवा शक्ति नसल्यास नवापेक्षा कमीही विषमसंख्याक ब्राह्मण असावे म्हणजे सात, पाच, तीन किंवा एक असावा सात असल्यास पावणत्रयीपैकी एकाचे जागीं एक व दुसऱ्या दोहोंच्या जागीं तीन तीन ब्राह्मण असावे पाच ब्राह्मण असल्यास एकास तीन व इतर दोघास एकेक ब्राह्मण योजावे हाही नियम अन्वष्टक्यासच आहे ॥ १२ ॥

**युग्मान्वृद्धिपूर्तेषु ॥ १३ ॥**

वृद्धिश्राद्धें व पूर्तश्राद्धे ह्यामध्यें समसंख्याक ब्राह्मण असावे ह्याना याज्ञिकात नांदीश्राद्ध असे म्हणतात षोडश संस्कार व श्रवणाकर्मादि श्रौतकर्म, वृद्धिश्राद्धास विषय आहेत कारण **'अनिष्ट्वा तु पितृञ्श्राद्धे वैदिकं कर्म नारभेत्'** = श्राद्धाने पितराची तृप्ति केल्याशिवाय वैदिक कर्मास आरंभ करू नये, अशी स्मृति आहे विहिरी, तलाव, देवालयें वगैरेचे उत्सर्ग आणि व्रतोद्यापने वगैरे पूर्तश्राद्धाचा विषय आहेत ॥ १३ ॥

**अयुग्मानितरेषु ॥ १४ ॥**

पूर्वेद्यु, अष्टमी, काम्यश्राद्ध व एकोद्दिष्ट ह्या इतर श्राद्धात विषम ब्राह्मण असावे 'मासि मासि श्राद्धात' अन्वष्टक्याप्रमाणेच असावे पार्वणश्राद्धाचा प्रकार पुढें सांगतील ह्याप्रमाणे आठ श्राद्धाचा निर्णय झाला ॥ १४ ॥

**प्रदक्षिणमुपचारो यवैस्तिलार्थः ॥ १५ ॥** ॥ १५ ॥

येथे मंडूकप्लुतीनें (बेडकाच्या गतीनें, कांहीं सूत्रें सोडून त्या पुढच्या सूत्रांत पद नेणें) अथवा प्रकरणास्तव 'वृद्धिपूर्तेषु' हें पद येते. वृद्धिपूर्तश्राद्धांमध्यें उपचारदान प्रदक्षिण होतात, व तिलांचे काम यवांनीं होते. उपवीतत्व व युग्मोपचार वगैरेचें हें उपलक्षण आहे. 'प्रदक्षिणं' ह्या पदानें अर्थात् अष्टकादि इतर श्राद्धांत उपचार अपसव्यांनीं द्यावे असे बोधित होतें. येथें दुसऱ्या अध्यायाची पांचवी कंडिका संपली. हींत सूत्रें १५ आहेत ॥ १५ ॥ ॥ ५ ॥

## अध्याय २ रा—कण्डिका ६ वी.

**रथमारोक्ष्यन्नाना पाणिभ्यां चक्रे अभिमृशेत्। अहं ते पूर्वे पादावालभे बृहद्रथन्तरे ते चक्रे ॥ १ ॥**

ह्या सूत्राच्या शेवटीं इति शब्द अध्याहृत आहे. रथावर बसून जाण्यापूर्वी त्याचीं पुढच्या बाजूचीं दोन्ही चाकें एकदम दोन्ही हातात धरून 'अहं ते पूर्वे०' हा सूत्रोक्त मंत्र म्हणाना. उजव्या हाताने उजवें व डाव्या हातानें डावें चाक धरावें. फार दूर देशास जाणें असल्यास फक्त पहिल्या आरोहणाचे वेळींच मंत्र म्हणावे ॥ १ ॥

**वामदेव्यमक्ष इत्यक्षाधिष्ठाने ॥ २ ॥**

'वामदेव्यमक्षः' असे म्हणून दोन्ही हातांनीं एकदम दोन्ही चाकाच्या तुंब्यास ( मध्य, नाभि ) स्पर्श करावा ॥ २ ॥

**दक्षिणपूर्वाभ्यामारोहेत्। वायोष्ट्वा वीर्येणारोहामीन्द्रस्यौजसा-धिपत्येनेति ॥ ३ ॥**

वायोष्ट्वा पाम्नू० पद्येन पर्यंत मंत्र म्हणून प्रथम उजवा पाय वर टेऊन रथावर चढावें ॥ ३ ॥

**रश्मीन्संमृशेदरश्मिकान्वा दण्डेन। ब्रह्मणो वस्तेजसा संगृह्णामि सत्येन वस्तेजसा संगृह्णामीति ॥ ४ ॥**

ब्रह्मणोपासून व संगृह्णामिपर्यंत वर दिलेला मंत्र म्हणून घोड्याच्या दोराना ( लगाम ) स्पर्श करावा. किंवा दोर बांधलेच नसल्यास काठीनें ( चाबूक ) घोड्यांना स्पर्श करावा ॥ ४ ॥

**अभिप्रवर्तमानेषु जपेत्। सहस्रसनि वाजमभिवर्तस्व रथ देव प्रवह, वनस्पते वीड्वङ्गो हि भूया इति ॥ ५ ॥**

हाकलेले घोडे इष्ट दिशेला चालू लागले असता, ' सहस्रसनि० ' ह्या मंत्राचा व 'वनस्पते०' ( ऋक्स० ४।७।३५ ) ह्या ऋचेचा जप करावा. ' अभिप्रवर्तमानेषु ' ह्या व वरच्या सूत्रातल्या ' व ' ( तुम्हाला ) ह्या बहुवचनावरून रथाला घोड्याच्या एकापेक्षा अधिक जोड्या असतात हें सूचित केलें आहे ह्या सूत्रात दोन मंत्रांचा समुच्चय असल्यानें' च'चा ( आणि ) अध्याहार आहे ॥ ५ ॥

**एतयान्यान्यपि वानस्पत्यानि ॥ ६ ॥**

येथें 'अभिमृशेत्' ( स्पर्श करावा ) ह्या पदाचा अध्याहार आहे ' वनस्पते वीड्वङ्गो० ' ह्याच ऋचेनें गाडा वगैरे दुसऱ्याही लाकडी वाहनांना स्पर्श करावा ॥ ६ ॥

**स्थिरौ गावौ भवतां वीळुरक्ष इतिरथाङ्गमभिमृशेत् ॥ ७ ॥**

' स्थिरौ गावौ० ' ही ऋचा ( ऋक्स० ३।३।२२ ) म्हणून, हींत सांगितलेल्या गाडीच्या अवयवांना म्हणजे दोन बैल, आस, धुऱ्या व जोकड ह्यांना स्पर्श करावा ' गावौ ' ( दोन बैल ) ह्या पदावरून ह्या ऋचेचा गाडा वगैरे रथभिन्नाच्या स्पर्शांत उपयोग करावा असें ठरतें, कारण रथाला बैल किंवा २ बैल कोठेही जोडीत नसतात त्याला घोड्याच्या अनेक जोड्या लावतात सायनभाष्यात मात्र गावौचा अर्थ दोन घोडे असा केला आहे ॥ ७ ॥

**सुत्रामाणं पृथिवीं धामनेहममिति नावम् ॥ ८ ॥**

'आरुहेम' ह्या मंत्रस्थपदावरून येथे 'आरोहेत्' असा शेष सूचित होतो. असो. 'सुत्रामाण०' (ऋक्स० ८-२-४) ही ऋचा म्हणून नावेंत बसून जावें ॥ ८ ॥

**नवरथेन यशस्विनं वृक्षं ह्रदं चाऽविदासिनं प्रदक्षिणं कृत्वा फलवतीः शाखा आहरेत् ॥ ९ ॥**

नवा रथ प्रथमच उपयोगात आणावयाचा असता त्यांत बसून निघावें; व यशोदायक वृक्षाला किंवा न सुकणाऱ्या डोहाला प्रदक्षिणा घालून येताना आंबा, जांभूळ वगैरेंच्या फलयुक्त फांद्या तोडून आणाव्या ॥ ९ ॥

**अन्यद्वा कौटुम्बम् ॥ १० ॥**

किंवा दुसरी एखादी कुटुंबोपयोगी वस्तु आणावी सारांश लाभसूचक योहणी व्हावी, असा ह्यातला अभिप्राय दिसतो. ॥ १० ॥

**संसदमुपयायात् ॥ ११ ॥**

त्यानंतर लागलीच आपल्या घरीं यावें ॥ ११ ॥

**अस्माकमुत्तमं कृधीत्यादित्यमीक्षमाणो जपित्वावरोहेत् ॥१२॥**

आणि सूर्याकडे पाहात 'अस्माकमुत्तमं कृधि' (ऋक्स० ३।६।२६) हा मंत्र जपून नव्या रथावरून खालीं उतरावें ॥ १२ ॥

**ऋषभं मा समानानामित्यभिक्रमन् ॥ १३ ॥**

पुढें घरांत जात असता, 'ऋषभं मा समा०' (स० ८-८-२४) हें सूक्त (आ० गृ० १-१२-२ पहा) जपावें ॥ १३ ॥

**वयमग्नेन्द्रस्य प्रेष्ठा इत्यस्तं यात्यादित्ये ॥ १४ ॥**

त्याच दिवशीं सूर्यास्त होत असता 'वयमग्नेन्द्रस्य,' (स० २-४ ५) हा मंत्र जपावा ॥ १४ ॥

**तद्वो दिवो दुहितरो विभातीरिति व्युष्टायाम् ॥ १५ ॥ ॥६॥**

आणि दुसरे दिवशीं उजाडल्यावर 'तद्वो दिवो०' (सं. ३-८-२) वगैरे मंत्र जपावा. वरचीं तिन्ही प्रतीकें मंत्रसंज्ञक असल्यामुळें उपांशु पठन करावें. ९ व्या सूत्रापासून येथपर्यंत विधि फक्त नव्या रथालाच लागू आहे. रथारोहणादि येथपर्यंतचें कृत्य त्रैवर्णिकांना सारखेंच आहे. येथें ह्या अध्यायांतली ६ वी कंडिका पूर्ण झाली. हींत एकंदर सूत्रें १५ आहेत ॥ १५ ॥ ॥ ६ ॥

## अध्याय २ रा—कण्डिका ७ वी.

**अथातो वास्तुपरीक्षा ॥ १ ॥**

येथें अथशब्द आरंभवाचक असून 'अतः' हें पद हेतुबोधक आहे. ऐश्वर्य व अनैश्वर्य गृहमूलक आहेत म्हणून आतां, ह्यापुढें वसतिस्थानाची म्हणजे घराची परीक्षा सांगितली जात आहे. काम्यकर्मेंही धर्मोपयोगी होणे शक्य असल्यामुळें, व वेदबोधित असल्यामुळें मीमांसक त्यांचेंही वर्णन करतात ॥ १ ॥

**अनूपरमविवदिष्णु भूम ॥ २ ॥**

घर बांधावयास जमीन निवडणें ती, खारी व नापीक नसलेली पाहिजे; म्हणजे सुपीक असून शिवाय तिच्याबद्दल तंटाबखेडा नसावा. ॥ २ ॥

**ओषधिवनस्पतिवत् ॥ ३ ॥**

त्याचप्रमाणें ती जागा ओषधि व वनस्पति ह्यांनीं युक्त असावी. ओषधि म्हणजे फळपाकानें नाश होणारीं भात, बाजरी वगैरे धान्यें व वनस्पति म्हणजे फुलावांचून फळें येणारे उंबर वगैरे वृक्ष होत. सूत्रांत मत्‌च्या जागीं वत् आहे तो आर्षप्रयोग आहे ॥ ३ ॥

**यस्मिन्कुशवीरिणं प्रभूतम् ॥ ४ ॥**

आणखी जेथे दर्भ व काळा वाळा वगैरे सुगंधी तृणे असतील तेथे घर बांधावें ॥ ४ ॥

**कण्टकिक्षीरिणस्तु समूलान्परिखायोद्वासयेदपामार्गः शाकस्तिल्वकः परिव्याध इति चैतानि ॥ ५ ॥**

घर बांधायच्या जागेतून करवंद वगैरे काट्यांची व निवडुंग, वड वगैरे चिकाचीं झाडें मुळासकट खणून काढून टाकावी. त्याचप्रमाणे अघाडा, शाक (वृक्षभेद, सागवान्), टेंमुर्णी, पांगारा हे व दुसरेही वास्तुशास्त्रांत निषिद्ध असलेले वृक्ष काढून टाकावे. एतानि, ह्या पदाने वगैरे हा अधिकार्थ सूचित केला आहे ॥ ५ ॥

**यत्र सर्वत आपो मध्यं समेत्य प्रदक्षिणं शयनीयं परीत्य प्राच्यःस्यन्देरन्नप्रवदत्यस्तत्सर्वं समृद्धम् ॥ ६ ॥**

सूत्रें छंदोवत् (वेदतुल्य) असल्यामुळे 'अप्रवदत्यः' येथें वदन्तीच्या नचा लोप छांदसप्रयोगाप्रमाणें झाला आहे असे वृत्तांत म्हटलें आहे. असो, त्या जागीं चहूंकडून पाणी मध्यप्रदेशात येऊन पूर्वेकडे असलेल्या शयनस्थानास उजवीकडे टाकून किंचित् उतार असलेल्या पूर्वदिशेस हळूहळू शब्दरहित ओघळून जात असावें. कारण अशी जागा विद्या, धन, सत्कर्म वगैरे सर्व बाजूनीं समृद्धि देते. सारांश चहूंकडून उंच, मध्ये गोल व पूर्वेकडे किंचित् उतार असलेली जागा तयार करून, तीवर घर बांधावें व त्यात पूर्वेकडेच यजमानाचें शयन-गृह करून त्याच्या उत्तरेस पाणी पूर्वेकडे निघून जाण्यास मोरी करावी असे ह्या सूत्राने सूचित होते ॥ ६ ॥

**ममवमवे भक्तशरणं कारयेत् ॥ ७ ॥**

वरच्या सूत्राप्रमाणें पाणी वाहून जाणाऱ्या दिशेस म्हणजे पूर्वेसच, शयनगृहाच्या उत्तरेस स्वयंपाकगृह करावें ॥ ७ ॥

शास्त्रांतरांत आग्नेयीस पाकगृह करावें असें सांगितलें आहे. तथापि वरचा पक्ष प्रशस्त आहे हें पुढच्या सूत्रानें सांगतात.

**बह्वन्नं ह भवति ॥ ८ ॥**

वरच्यासारखें शयनगृहाच्या उत्तरेस केलेलें पाकगृह, बहुत अन्न देणारें होतें. असें फळ सांगून हकारानें सूत्रकारांनीं ह्याच पक्षास आपली संमति दर्शविली आहे. कांहीं पोथ्यांत हा हकार नाहीं ॥ ८ ॥

**दक्षिणाप्रवणे सभां मापयेत्साऽद्यूता ह भवति ॥ ९ ॥**

दक्षिणेकडे उतार असलेल्या बाजूस म्हणजे घराच्या उत्तरेस रोजच्या बैठकीची जागा ( सभागृह, दिवाणखाना ) करावी; कारण अशी जागा द्यूतरहित होते म्हणजे तेथें जुगारीचा अड्डा पडत नाहीं. अद्यूतापदानें द्यूताचा निंदितपणा सुचविला आहे. हा शास्त्रांतरस्थ पक्ष अनुवादाकरितां घेतला आहे ॥ ९ ॥

**युवानस्तस्यां कितवाः कलहिनः प्रमायुका भवन्ति ॥ १० ॥**

वरच्याप्रमाणें उत्तरेकडच्या सभागृहांत अद्यूतात्व गुण असला तथापि दोष फार आहे. कारण त्या सभेंत बसणारे तरुण लबाड, भांडखोर व अल्पायुषी होतात. ह्याकरितां शास्त्रांतरास अनुसरून तेथें सभागृह करूं नये असा निषेध, सूत्रकारांनीं सुचविला आहे ॥ १० ॥

आतां खरें स्थमन देतात.

**यत्र सर्वत आपः प्रस्यन्देरन्सा स्वस्त्ययन्यद्यूता च ॥११॥ ॥७॥**

जेथें सर्व दिशांतून पाणी वाहून येतें तेथें, म्हणजे घराच्या मध्यभागीं ( बंगल्याप्रमाणें ) बैठकीची जागा केली असतां ती, सर्वप्रकारें कल्याण-

कारक व द्यूतरहित अशी होते म्हणून मध्यभागींच सभागृह करावें. येथें सातवी कंडिका संपली. हिच्यांत एकंदर सूत्रें अकरा आहेत ॥ ११ ॥ ॥ ७ ॥

## अध्याय २ रा—कण्डिका ८ वी.

### अथैतैर्वास्तु परीक्षेत ॥ १ ॥

किंवा मागें दिलेलीं लक्षणें न पाहातां, पुढें सांगितलेल्या प्रकारांनीं वास्तूची ( गृह ) परीक्षा करावी. 'अथ' ह्या पदानें पूर्वोक्त लक्षणापेक्षां पुढील लक्षणांचें महत्त्व सुचविलें असून 'वास्तु' पदाने वरचा सभेचा विषय, निवृत्त झाला आहे. ॥ १ ॥

### जानुमात्रं गर्तं खात्वा तैरेव पांसुभिः प्रतिपूरयेत् ॥ २ ॥

गृहभूमीमध्यें गुडघ्याइतका खोल खड्डा खणून, त्यातून काढलेल्याच मातीनें तो खड्डा पुन्हां भरावा. ॥ २ ॥

### अधिके प्रशस्तम्, समे वार्तं, न्यूने गर्हितम् ॥ ३ ॥

ती माती खड्ड्याच्या वर आल्यास तें घर प्रशंसनीय म्हणजे ऐश्वर्ययुक्त होईल असे समजावें; खड्ड्याच्या बरोबरच आल्यास उपजीविका ( वृत्ति ) चालण्याइतकें धन देणारें होईल असें समजावें; खड्डयापेक्षां माती कमी झाल्यास तेथें केलेलें घर निंदित होईल असें समजावें; अर्थात् ह्या तिसऱ्या प्रकारच्या जागीं घर बांधूं नये. ॥ ३ ॥

पुढच्या सूत्रानें दुसरी परीक्षा सांगतात.

### अस्तमितेऽपां पूर्णं परिवासयेत् ॥ ४ ॥

अथवा मातीने न भरतां, तो खड्डा सूर्यास्त झाल्यावर पाण्यानें पूर्ण

### सोदके प्रशस्तमार्द्रे वार्तं शुष्के गर्हितम् ॥ ५ ॥

दुसरे दिवशीं सकाळीं त्या खड्ड्यात पाणी राहिलें असल्यास ती जागा घरास प्रशस्त, केवळ ओलेपणाच राहिल्यास फक्त उपजीविका देणारी म्हणजे मध्यम, व खड्डा कोरडा आढळल्यास ती जागा निंद्य असें जाणावें. ॥ ५ ॥

### श्वेतं मधुरास्वादं सिकतोत्तरं ब्राह्मणस्य ॥ ६ ॥

पांढरा रंग, मधुर रुचि किंवा वास व पुष्कळ वाळू ह्यांनीं युक्त असलेली माती जीमध्यें आहे अशी जागा, ब्राह्मणानें घर बांधण्यास पसंत करावी. ॥ ६ ॥

### लोहितं क्षत्रियस्य ॥ ७ ॥

ह्या व पुढच्याही सूत्रांत 'मधुरास्वाद' व 'सिकतोत्तरं' ह्या दोन पदांची अनुवृत्ति आहे. क्षत्रियाच्या गृहभूमीची माती मधुररुचिगंधाची, वाळुकायुक्त व तांबड्या रंगाची असावी. ॥ ७ ॥

### पीतं वैश्यस्य ॥ ८ ॥

वैश्याचें गृहस्थान, मधुररसगंधाच्या मृत्तिकेनेंच युक्त, वाळुकाप्रचुर व पिवळ्या रंगाचें असावें. ह्या व अशाच प्रकारच्या उपनयन वगैरे प्रकरणांतल्या उल्लेखावरून, सूत्ररचनेसाठीं चातुर्वर्ण्यरचना उत्तम स्थितींत चालू असावी असें दिसून येतें. ॥ ८ ॥

### तन्महस्मीतं कृत्वा यथादिक्समचतुरस्रं मापयेत् ॥ ९ ॥

अशा प्रकारानें परीक्षा केलेली गृहभूमी, नांगरानें पुष्कळ ताणे पडतील अशी उत्तम नांगरून तिच्यावर सर्व दिशेस सारखा असा चौरसाने अंग्य म्हणजे जो नगर करावें. ह्या सूत्रांत ग्रस्तशब्द बहुवाचक आहे.

त्यामुळें हजारच तासे मोजण्याचें कारण नाहीं. जमीन साफ करण्यास लागतील तशीं कमजास्त तासे घालावीं. ॥ ९ ॥

**आयतचतुरस्रं वा ॥ १० ॥**

किंवा दीर्घ ( लांबट ) असून चौकोनी असे जोते तयार करावें. ॥ १० ॥

प्रथम ' अनूषरं०' वगैरे पूर्वोक्त बाह्यपरीक्षा करून नंतर त्या भूमीची 'अथैतैर्वास्तु०' ( गृह्य० २।८।१ ) वगैरे सूत्रोक्त आंतरपरीक्षा करून व 'यत्र सर्वत आपो मध्य समेत्य०' ( २-७-११ ) वगैरे स्थाननिर्णय करून जोते तयार करावे. ॥ १० ॥

ह्यानंतर काय करावें तें सांगण्याकरिता पुढचे सूत्र लिहितात.

**तच्छमीशाखयोदुम्बरशाखया वा शन्तातीयेन त्रिः परिव्रजन्प्रोक्षति ॥ ११ ॥**

'शन्न इन्द्राग्नी' हे सूक्त ( ऋक्स० ५।३।२८ ) म्हणून त्या जोत्याभोंवतीं तीन प्रदक्षिणा कराव्या व प्रदक्षिणा चालू असता, शमीच्या डहाळीनें किंवा उंबराच्या डहाळीनें त्या गृहभूमीचे प्रोक्षण करीत जावें. प्रत्येक प्रदक्षिणेपूर्वी मंत्रावृत्ति अवश्य आहे. तसेच मंत्र हे कर्मसाधन असल्यानें व साधनें हीं कुठार वगैरे प्रमाणें सिद्धच असतात त्याकरिता, मंत्रपठन झाल्यानंतर चालण्यास सुरुवात करावी; व प्रदक्षिणेस प्रारंभ पूर्वेकडून करावा असें गृह्यवृत्तींत म्हटले आहे. ॥ ११ ॥

**अविच्छिन्नया चोदकधारया। आपोहिष्ठा मयोभुव इति तृचेन ॥ १२ ॥**

पुढें 'आपोहिष्ठा०' वगैरे तीन ऋचा ( ऋक्म. ७-६-५ ) म्हणून, सभोंवतीं अखंडित जलधारा पाडीत पाडीत त्या जोत्याच्या सभो-

त्तीं आणखीही तीन प्रदक्षिणा कराव्या. प्रत्येक प्रदक्षिणेला मंत्रावृत्ति करावी. ॥ १२ ॥

वंशान्तरेषु शरणानि कारयेत् ॥ १३ ॥

जेवढ्या तुळ्या असतील त्यांपैकीं दोन दोन तुळ्यांमध्यें भिंती वगैरे घालून खोल्या, खिडक्या, फडताळें, वगैरे अधांतर जागा तयार कराव्या. ॥ १३ ॥

गर्तेष्ववकां शीपालमित्यवधापयेत् नास्याग्निर्दाहुको भवतीति विज्ञायते ॥ १४ ॥

खांब पुरण्याच्या पूर्वी त्यांच्या खड्ड्यांत, अवका म्हणजे पाण्यांतील नीळ व शीपाल म्हणजे शेवाळ घालावी. असें केलें असतां, अग्नि तें घर जाळीत नाही, असें ऐकण्यांत आहे. म्हणजे असें वेदवचन आहे. ॥ १४ ॥

मध्यमस्थूणाया गर्तेऽवधाय प्रागग्रोदगग्रान्कुशानास्तीर्य व्रीहियवमतीरप आसेचयेत् । अच्युताय भौमाय स्वाहेति ॥ १५ ॥

त्यांपैकीं मधल्या खांबाच्या खड्ड्यांत नीळ व शेवाळ घातल्यावर त्यांवर, पूर्वेकडे व उत्तरेकडे शेंडे केलेले दर्भ पसरून तेथें 'अच्युताय भौमाय स्वाहा' हा मंत्र म्हणून, आंत भात व सातू टाकलेलें पाणी शिंपडावें. 'मध्यम' ह्या पदानें घराचे खण विषम असावे असें ज्ञापित होतें, नाहीं-तर मध्यमत्वाचा निर्णय करतां येणार नाहीं. ॥ १५ ॥

अथैनामुच्छ्रियमाणामनुमन्त्रयेतेहैव तिष्ठ निमिता तिल्वला-स्तामिरावतीम् । मध्ये पोषस्य तिष्ठन्तीम् आत्वा प्रापन्नघायवः ॥ आत्वा कुमारस्तरुण आ वत्सो जायतां सह । आत्वा परिस्रितः कुम्भ आ दध्नः कलशैरयन्निति ॥ १६ ॥ ॥ ८ ॥

तो मध्यम स्तंभ ( आढ्याचा खांब ) बसविला असता, 'इहैव तिष्ठ' वगैरे कलशैरयन् पर्यंत असलेल्या दोन मंत्रांनीं त्याचें अनुमंत्रण करावें येथें १६ सूत्रांनीं युक्त असलेली ही आठवी कंडिका संपूर्ण झाली ॥ १६ ॥ ॥ ८ ॥

## अध्याय २ रा—कण्डिका ९ वी.

वंशमाधीयमानम् ॥ १ ॥

येथून 'अनुमन्त्रयेत' ह्या पदाची अनुवृत्ति आणली आहे. वंश म्हणजे वेळू किंवा तुळई वर चढविली जात असता तिचेही, पुढें दिलेल्या मंत्रानें अनुमंत्रण करावें. ॥ १ ॥

ऋतेन स्थूणामधिरोह वंश द्राघीय आयुः प्रतरं दधान इति ॥ २ ॥

हा ऋतेन वगैरे दधान पर्यंत असलेलाच मंत्र वंशानुमंत्रणास घ्यावा. ॥ २ ॥

सदूर्वासु चतसृषु शिलासु मणिकं प्रतिष्ठापयेत्पृथिव्या अधिमभवेति ॥ ३ ॥

चार सपाट शिलांवर दूर्वा ठेवून त्यांवर 'पृथिव्या अधि०' हा मंत्र म्हणून पाणी भरण्याच्या रांजणाची स्थापना करावी. ॥ ३ ॥

अरङ्गरो वावदीति त्रेधा बद्धो वरत्रया । इरामुह प्रशंसत्यनिराम्पबाधतामिति वा ॥ ४ ॥

अथवा हा अपबाधताम् पर्यंत असलेला मंत्र म्हणून रांजणाची स्थापना करावी. ॥ ४ ॥

अथास्मिन्नप आसेचयेत् । एतु राजा वरुणो रेवतीभिरस्मिन्स्थाने तिष्ठतु मोदमानः । इरां वहन्तो घृतमुक्षमाणा मित्रेण साकं सह संविशन्त्विति ॥ ५ ॥

नतर त्या राजणात, ऐतु वगैरे सविशन्तु पर्यंत, वरचा सूत्रोक्त मत्र म्हणून, भरण्याकरता पाणी ओतण्यास सुरवात करावी. ॥ ५ ॥

अथैनच्छमयति ॥ ६ ॥

अशा प्रकाराने सर्व घर तयार झाल्यावर त्या वास्तूची पुढच्या सूत्रानी सांगितल्याप्रमाणे शाति करावी शाति म्हणजे पीडानिवारक व शातनाकारक कृत्य होय ॥ ६ ॥

व्रीहियवमतीभिरद्भिर्हिरण्यमवधाय शन्तातीयेन त्रिः प्रदक्षिणं परिव्रजन्प्रोक्षति ॥ ७ ॥

त्या तयार झालेल्या घराभोवती 'शन इन्द्राग्नी' हें कल्याणकारक सूक्त म्हणून तीन प्रदक्षिणा घालीत असता, भात, सातू व सुवर्ण आत टाकलेल्या पाण्याने, त्या घराचें प्रोक्षण करावं. ॥ ७ ॥

अविच्छिन्नयाचोदकधारया आपोहिष्ठा मयोभुव इति तृचेन ॥ ८ ॥

तसेच 'आपोहिष्ठा' वगैरे तीन ऋचा म्हणून, अखंडित जलधारेसह त्या घराभोवती आणखीही तीन प्रदक्षिणा कराव्या हीं दोन्हीही सूक्तें पूर्वी जोत्याच्या प्रोक्षणाच्या वेळी आलेली आहेत ॥ ८ ॥

मध्येऽगारस्य स्थालीपाकं श्रपयित्वा वास्तोष्पते प्रतिजानीह्यस्मानिति चतसृभिः प्रत्यृचं हुत्वान्नं संस्कृत्य ब्राह्मणान्भोजयित्वा शिवं वास्तु शिवं वास्त्विति वाचयीत ॥ ९ ॥ ॥ ९ ॥

नतर घराच्या मध्यभागी प्रथमतःच स्थालीपाक शिजवून वास्तोष्पते० वगैरे चार ऋचानी ( ऋग्वे० ५।४।२१ ) त्याच्या चार आहुति द्याव्या, व अन्न शिजवून ब्राह्मणाना भोजन घालें आणि त्याच्याकडून शिवं वास्तु शिवं वास्तु ( घर कल्याणकारक होवो ) असें म्हणवावें म्हणजे यजमानानें 'शिवं वास्तु शिवं वास्त्विति भवन्तो ब्रुवन्तु' असें म्हणावें, व नंतर

ब्राह्मणांनीं 'शिव वास्तु शिव वास्तु' असे बोलावें. 'अपयिचा' ह्या अधिकपदाने ह्या स्थालीपाकापूर्वी घरात दुसरा पाक करू नये हे ज्ञापित केलें आहे. येथे दुसऱ्या अध्यायाची ९ कंडिका सपली. हिच्यात ९ च सूत्रें आहेत ॥ ९ ॥ ॥ ९ ॥

## अध्याय २ रा—कण्डिका १० वी.

### उक्तं गृहप्रपदनम् ॥ १ ॥

मणिकाच्या (राजण) स्थापनापासून मागच्या सूत्रापर्यंत जें कृत्य सांगितले त्याचे नाव गृहप्रपदन (गृहप्रवेश) होय. अथवा 'गृहानह सुमनस ॰' (श्रौतसू० २।५।१७) वगैरे मत्रांनी सांगितलेले गृहप्रवेश-कर्म येथेही करावे अशी दुसरी व्याख्या आहे. पहिल्या व्याख्येप्रमाणें, संज्ञा करण्याचे प्रयोजन पुढील सूत्राच्या अर्थामध्यें कळेल. ॥ १ ॥

### बीजवतो गृहान्प्रपद्येत ॥ २ ॥

बीजवान् म्हणजे धान्ययुक्त घरात प्रवेश करावा. तात्पर्य, प्रथम घरात बीजें नेऊन ठेवून नतर मणिकस्थापनादि गृहप्रपदन कर्म करून अमत्रकच प्रवेश करावा 'गृहान्' हे अधिकपद, शास्त्रांतराप्रमाणें वास्तुशांति केलेल्या किंवा जीर्णोद्धार केलेल्या घरांना देखील, बीजयुक्त करून पूर्वोक्त मणिकस्थापनादिक कृत्याने प्रवेश करावा हें ज्ञापित करते. ॥ २ ॥

### क्षेत्रं प्रकर्षयेदुत्तरैः प्रोष्ठपदैः फल्गुनीभी रोहिण्या वा ॥ ३ ॥

उत्तरा भाद्रपदा व उत्तरा फल्गुनी किंवा रोहिणी ह्या तीन नक्षत्रावर शेत नांगरविण्यास प्रारंभ करावा. नित्यकर्मांना धनधान्याची जरूरी असल्या-

मुळें, त्याच्या उत्पत्तिकरिता शेतकीची अनुज्ञा आहे. त्यातही विपत्काल नसता, '**कृपिवाणिज्ये वा स्वयंकृते दुष्टे**' (शेतकी किंवा वाणीपणा, अगें करणें निंद्य होय) असा गौतमस्मृतींत निषेध असल्यामुळें, 'प्रकर्प-येत्' (नागरवावी) असा प्रयोजक प्रत्यय घातला आहे. 'अक्षैर्मादीव्य कृषिमित्कृपस्व' म्हणजे जुगाराने पैसे मिळवू नको, शेतकीच कर, अशी अक्षसूक्तातही, प्रकृतसूत्राप्रमाणें कृषि हीच उपजीविका सांगितली आहे. प्रतिग्रह वगैरेंचा स्वीकार, आपत्कालींच करावा. ॥ ३ ॥

**क्षेत्रस्यानुवातं क्षेत्रस्य पतिना वयमिति प्रत्यृचं जुहुयाज्जपेद्वा ॥ ४ ॥**

वर सांगितलेलीं नक्षत्रें असतील त्या दिवशीं, शेताकडे वारा वहात असेल अशा त्याच्या जवळच्या प्रदेशात साधनासह जाऊन स्थंडिलादि-कृत्य करून 'क्षेत्रस्य पतिना०' (ऋक्म० ८।३।९) ह्या सूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें होम करावा. येथें पादग्रहणानें एकाच ऋचेचें ग्रहण व्हावें तथापि 'प्रत्यृच' ह्या पदाच्या सामर्थ्यावरून सूक्तग्रहण होतें. दुसरा पक्ष लिहिलात किंवा होम न करता त्याच सूक्ताचा नुसता जपच करून कृषिकर्मास सुरवात करावी, म्हणजे निपुल धान्य पिकेल. ॥ ४ ॥

**गाः प्रतिष्ठमाना अनुमन्त्रयेत मयोभूर्वातो अभिवातूस्रा इति द्वाभ्याम् ॥ ५ ॥**

गाई, बैल वगैरे जनावरें चरण्याकरिता, अरण्यात जायला निघाली असता 'मयोभूर्वातो०' वगैरे दोन ऋचानीं (ऋक्म० ८।८।२७) त्यांचें अनुमत्रण करावें. ॥ ५ ॥

**आयतीः । यामामृधश्चतुर्विलं मधोः पूर्णं घृतस्य च । ता नः सन्तु पयस्वतीर्बहीर्गोष्ठे घृताच्यः ॥ उपैन्तु मयोभुव ऊर्जं वाँसप्य**

**विभ्रतीः । दुहाना अक्षितं पयो मयिगोष्ठे निविशध्वं यथा भवाम्युत्तमः ॥ या देवेषु तन्वमैरयन्तेति च सूक्तशेषम् ॥ ६ ॥**

त्या गाई परत येत असताही, 'यासामूध' वगैरे सूत्रोक्त दोन ऋचा व 'या देवेषु तन्व०' वगैरे सूक्ताचा शेष म्हणजे त्या दोन ऋचा (ऋक्स० ८।८।२७) म्हणून त्याचें अनुमत्रण करावें. ॥ ६ ॥

**आगावीयमेके ॥ ७ ॥**

कोणी आचार्य 'यासामूध०' वगैरे मत्र न म्हणता 'आगावो अग्मन्०' हें सूक्त (ऋक्स० ४।६।२५) म्हणून येणाऱ्या गाईंचें अनुमत्रण करावें, असे म्हणतात ॥ ७ ॥

**गणानासामुपतिष्ठेताऽगुरुगवीनां भूताःस्थ प्रशस्ताः शोभनाः प्रियाः प्रियो वो भूयासं शं मयि जानीध्वं शं मयि जानीध्वम् ॥ ८ ॥**

ज्याच्यात आपल्या गुरूच्या गाई मिसळलेल्या नाहींत अशा आपल्या स्वतच्या गाईंच्या कळपात, दररोज उभे राहून 'भूता' वगैरे भूयास श मयि जानीध्व पर्यंत वरचा सूत्रोक्त मत्र म्हणून, त्याचे उपस्थान करावें. कारण दुसरीं 'श मयि जानीध्व' हीं पदें फक्त अध्यायाची समाप्ति सुचविण्याकरिताच घातलीं आहेत. गुरूच्या गाई आत असता, हें उपस्थान करू नये. '**उपस्थानं तदेव स्यात्प्रणतिस्थानसंपुतम्**' म्हणजे हात जोडून व उभे राहून स्तुति करणें ह्याचें नाव उपस्थान होय. येथें ह्या अध्यायाची दहावी कडिका सपली. हिच्यात एकदर सूत्रें आठ आहेत ॥ ८ ॥

॥ १० ॥

**येथें ह्या आश्वलायनगृह्यसूत्राचा दुसरा अध्याय समाप्त झाला**

**॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**

## अध्याय ३ रा—कण्डिका १ ली.

**अथातः पञ्चयज्ञाः ॥ १ ॥**

ह्या सूत्रांत अथशब्द प्रारंभवाचक असून अतःशब्द हेतुबोधक आहे. ज्याअर्थी ह्यांनीं अत्यंत कल्याणाची प्राप्ति होते त्यास्तव, ह्यापुढें आतां पञ्चयज्ञ नांवाचे यज्ञ सांगण्यास सुरवात करतों. ॥ १ ॥

**देवयज्ञो भूतयज्ञः पितृयज्ञो ब्रह्मयज्ञो मनुष्ययज्ञ इति ॥ २ ॥**

देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, ब्रह्मयज्ञ आणि मनुष्ययज्ञ हे ते पंचमहायज्ञ आहेत. ह्या सूत्रांत फक्त नांवेंच सांगितलीं. ॥ २ ॥

**तद्यदग्नौ जुहोति स देवयज्ञः, यद्बलिं करोति स भूतयज्ञः, यत्पितृभ्यो ददाति स पितृयज्ञः, यत्स्वाध्यायमधीयते स ब्रह्मयज्ञो, यन्मनुष्येभ्यो ददाति स मनुष्ययज्ञ इति ॥ ३ ॥**

यजमान, वैश्वदेवाचे वेळीं 'सूर्याय स्वाहा' वगैरे दहा आहुतींचा, अग्नींत होम करतो तोच देवयज्ञ, 'अथ बलिहरणम्' (गृ० १।२।३) ह्या पूर्वोक्त विधीप्रमाणें भूमीवर बलिदान करतो तोच भूतयज्ञ, 'स्वधा पितृभ्यः' (गृ० १।२।११) ह्या सूत्राप्रमाणें बलि देतो तो पितृयज्ञ, 'अथ स्वाध्यायविधिः' (गृ० ३।२।१) ह्या, पुढें येणाऱ्या विधीप्रमाणें वेदपठन केलें जातें तोच ब्रह्मयज्ञ व 'ततोऽतिथीन्भोजयेत्' (वैश्वदेवानंतर अतिथींना भोजन द्यावें.) ह्या स्मृतिवचनाप्रमाणें, अतिथींना अन्नदान केलें जातें, तोच मनुष्ययज्ञ होय. ह्यांपैकीं पहिले तीन यज्ञ वैश्वदेवांत असून शिवाय अतिथि न मिळाल्यास किंवा मिळाल्यासही बलिहरणानंतर 'सनकादिमनुष्येभ्यो हन्त' म्हणून भूमीवर बलिदान करून, स्मृत्यन्तराप्रमाणें मनुष्ययज्ञाचा प्रतिनिधि करण्याचा संप्रदाय आहे. 'पञ्च वा एते

महायज्ञाः' वगैरे तैत्तिरीयारण्यकाचीं वचनें ह्या पञ्चयज्ञांस मूलभूत आहेत. ह्या सूत्रांत, ह्या गृह्यसूत्रांतील पञ्चयज्ञांचाच अनुवाद केला आहे. मनुस्मृतींतही हेच यज्ञ सांगितले आहेत, परंतु तेथे पितृयज्ञाकरितां एकातरी ब्राह्मणाला भोजन वगैरे देऊन श्राद्ध करावें, असा फरक सांगितला आहे. ॥ ३ ॥

**तानेतान्यज्ञानहरहः कुर्वीत ॥ ४ ॥** ॥ १ ॥

ते हे पञ्चमहायज्ञ, दररोज केलेच पाहिजेत. मागें भोजनार्थक पाकास शुद्धता येण्याकरितां व पञ्चसूनादोष दूर होण्याकरितां वैश्वदेवकृत्य करावें असें सांगितलें आहे. त्यावर, ज्यादिवशीं परान्नभोजन असेल किंवा उपवास असेल त्यादिवशीं वैश्वदेवाची जरूरी नाहीं असे कोणास वाटेल त्या शंकेच्या निवृत्तिकरतां, हे सूत्र आहे. ह्यावरून जरी घरीं जेवावयाचे नसले तरी देखील गृहस्थाने, केवळ वैश्वदेव वगैरे करता देखील पाक करावा असे ठरतें, व हें कृत्य केवळ अन्नसंस्काररूप किंवा प्रायश्चित्तरूपच नसून अश्वमेधादि कृत्याप्रमाणें पुण्योत्पादकही असल्यामुळे, सकाम पुरुषांना स्वर्गादिफलदायक व निष्कामांना संध्यादिकाप्रमाणे चित्तशुद्धिकारकही आहे असे ज्ञापित होते. '**आपत्रमपि दातव्यम्, आकाष्ठमपि जुहुयात्, आऋचमपि ब्रह्मयज्ञं कुर्यात्**' म्हणजे निदान पानफुलाचें तरी दान करावें, निदान समिधेचा तरी होम करावा, निदान एक ऋचेनें तरी ब्रह्मयज्ञ करावा. '**नचेदुत्पद्यतेऽन्नं तु अद्भिरेनान्समापयेत्**' म्हणजे, सर्वप्रकारें अन्नोत्पत्ति शक्य नसल्यास पाण्यानेंच वैश्वदेवादिक संपवावीं, वगैरे स्मृतिवचनांवरून आणि बौधायनस्मृतींत एखादेही महायज्ञ टळल्यास मनस्वत्याहुति ( मनोज्योति० ) व तन्तुमचरु ( तन्तु तन्वन्० ) वगैरे प्रायश्चित्तें सांगितलीं असल्यामुळेंही, हे पञ्चयज्ञ दररोज अवश्य कर्तव्य आहेत; हेंच ठरतें. मात्र '**पञ्चयज्ञविधानं तु न कुर्यान्मृतजन्मनोः**' ह्या

स्मृतिवचनावरून मृताशौच व जननाशौच ह्यांमध्यें पञ्चयज्ञ करूं नये, असें समजतें. येथें ह्या तिसऱ्या अध्यायाची १ ली कंडिका संपली. हिच्यांत फक्त चारच सूत्रें आहेत. ॥ ४ ॥ ॥ १ ॥

## अध्याय ३ रा—कण्डिका २ री.

**अथ स्वाध्यायविधिः ॥ १ ॥**

आतां यापुढें स्वाध्यायाचा ( ब्रह्मयज्ञ ) प्रकार सांगतात. विधिपदानें फक्त विधानच सांगतो, क्रमबोधन नाहीं, असें ज्ञापित केल्यामुळें, ब्रह्मयज्ञ वैश्वदेवाच्या पूर्वी किंवा नंतर सवडीप्रमाणें करावा असें ठरतें. ॥ १ ॥

**प्राग्वोदग्वा ग्रामान्निष्क्रम्याप आप्लुत्य शुचौ देशे यज्ञोपवीत्याचम्याक्लिन्नवासा दर्भाणां महदुपस्तीर्य प्राक्कूलानां तेषु प्राङ्मुख उपविश्योपस्थं कृत्वा दक्षिणोत्तरौ पाणी संधाय पवित्रवन्तौ, विज्ञायते अपां वा एष ओषधीनां रसो यद्दर्भाः सरसमेव तद्ब्रह्म करोति द्यावापृथिव्योःसन्धिमीक्षमाणः संमील्य वा यथा वा युक्तमात्मानं मन्येत तथा युक्तोऽधीयीत स्वाध्यायम् ॥ २ ॥**

आपल्या गांवाच्या पूर्व दिशेस किंवा उत्तर दिशेस असलेल्या जलाशयावर जाऊन त्यांत शिरून स्नान करावें. नंतर त्या जलाशयाचें तीर वगैरे शुद्धभूमी पाहून तेथें कोरडें वस्त्र नेसलेला व उपवीतियुक्त असा होऊन आचमन करून पूर्वेकडे अग्रें असलेल्या दर्भांचें मोठें आसन पसरावें; त्यावर पूर्वेकडेच तोंड करून उजवा पाय वर असलेली मांडी घालून बसल्यावर त्या मांडीवर, उजवीकडे उजवा हात वर असलेली व आंत दोन पवित्रें धारण केलेली हाताची ओंजळ ( ब्रह्माञ्जलि ) ठेवावी.

जोडलेल्या दोन्ही हातात दर्भ ठेवण्याचें कारण असें कीं, दर्भ म्हणजे उदकाचा व औषधींचा रसच ( सार ) आहेत. त्यामुळें स्वाध्यायकाळीं केलेलें दर्भधारण, त्या वेदाध्ययनाला सरसपणाच ( सफलपणा ) आणतें असें वेदात म्हटलें आहे. असो. नतर आकाश व भूमी ह्याच्या सधीकडे ( क्षितिज ) पहात किंवा डोळे मिटून अथवा दुसऱ्या ज्या रीतीनें आपलें चित्त एकाग्र होईल अशा रीतीनें दृष्टि ठेवून, पुढें सागितल्याप्रमाणे वेदाध्ययन करावें. हा सरळ सूत्रार्थ झाला. आता विशेषपदाचीं प्रयोजनें लिहितों. ह्या सूत्राच्या प्रारभीं दोनदा 'वा' शब्द घातला आहे. त्याने, '**ग्रामे मनसा स्वाध्यायमधीयीत**' ह्या वेदवचनानुसार गावाबाहेर शक्य नसल्यास गावात देखील घरीं वगैरे शुद्ध भूमींत, ब्रह्मयज्ञ करावा ह्या पक्षान्तरास समति दर्शविली आहे. 'आप्लुत्य' ह्या पदातल्या 'आ' ( आस मनात् ) ह्या उपसर्गानें, पाण्यात शिरून स्नान करावें; गडव्यानें पाणी घेऊ नये हा अर्थ निघतो. शुचौ देशे ह्या अक्षरानीं तीरावरच ब्रह्मयज्ञ करावा असा नियम नाहीं हें समजलें. 'यज्ञोपवीती' ह्या अधिकपदानें ह्या कृत्यास नित्य यज्ञोपवीती असावें असें सागितल्यामुळें दहनकृत्यात प्राचीनावीती सिद्ध होते. 'आचम्य' हें पद, कर्मांगभूत म्हणून आचमन अवश्य करावें, ह्याचें ज्ञापक आहे. 'प्राङ्मुख' ह्या विशेषपदाने ब्रह्मयज्ञात पूर्वेकडे तोंड करणें अवश्यच आहे असें बोधित केल्यामुळें, दुसऱ्या कृयात क्वचित् प्रसगीं उत्तरेकडे तोंड केल्यासही चालते हे पितृकृत्य नसल्यामुळें माडी ( उपस्थ ) घालताना उजवा पाय वर असावा ओजळीच्या बोटाचीं व तींतल्या दर्भाचीं अग्रें पूर्वेकडे असावीं. पवित्रपदाचा अर्थ, मागेंच ( गृ. १।३।२ ) विशद केला आहे 'विज्ञायते' ह्या पदानें श्रुतिप्रमाण सूचित केल्यावरून हें सर्वच गृह्यसूत्रशास्त्र श्रुतिमूलक आहे हें ज्ञापित केलें आहे; आणि अर्थात् समजून येत असता शेवटीं 'स्वाध्याय'

हें जास्ती घातलेलें पद, ह्या कृत्यांत गायत्रीचेंही पठन स्वाध्यायाप्रमाणेंच होतें हें ज्ञापित करतें. त्यामुळें येथें गायत्रीचें पठन सामिधेनीप्रमाणें एकश्रुतीनें होत नाहीं ( सस्वर होतें ) व शेवटीं ओङ्कारही लावीत नाहींत ॥ २ ॥

ॐ पूर्वो व्याहृतीः ॥ ३ ॥

प्रथम ॐ म्हणून भूर्भुवःस्वः ह्या तीन व्याहृति एकदम उच्चाराव्या. आश्वलायन–श्रौतसूत्रांत सांगितलेल्या चार व्याहृति फक्त होमोपयोगीच आहेत. कारण, 'ॐ मिति प्रतिपद्य भूर्भुवः सुवरित्याह । सावित्रीं गायत्रीं त्रिरन्वाह । पच्छोऽर्धर्चशोऽनवानम् । स्वाध्यायमधीयीत । नमो ब्रह्मणे इति परिधानीयां त्रिरन्वाह' असें, पञ्चयज्ञांना मूलाधार असलेल्या तैत्तिरीय-श्रुतींत ( सहवैउपनिषद् ) म्हटलें आहे. ॥ ३ ॥

सावित्रीमन्वाह पच्छोऽर्धर्चशः सर्वामिति तृतीयम् ॥ ४ ॥

नंतर 'तत्सवितु०' हा प्रसिद्ध गायत्रीमंत्र, प्रथम एकेक चरण नंतर अर्धा अर्धा व तिसऱ्यांदा एकदम सर्व, ह्या क्रमानें म्हणावा. गायत्री त्रिपाद असल्यामुळें पहिला अर्धर्च धीमहिपर्यंत दोन चरणावरच पडतो. 'तृतीयं' हें जास्ती घातलेलें पद, उपाकरणकर्मांतही ह्याचप्रमाणें तीनदां गायत्री उच्चारावी असें ज्ञापित करतें. येथें दुसरी कंडिका संपली. हिच्यांतही सूत्रें चारच आहेत. ॥ ४ ॥ ॥ २ ॥

## अध्याय ३ रा—कण्डिका ३ री.

अथ स्वाध्यायमधीयीत ऋचो यजूंषि सामान्यथर्वाङ्गिरसो ब्राह्मणानि कल्पान्गाथा नाराशंसीरितिहासपुराणानीति ॥ १ ॥

गायत्री तीनदां म्हटल्यावर, ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, ब्राह्मणें,

आश्वलायनादिकृत सूत्रें, गाथा म्हणजे 'यदिन्द्रो दाशराज्ञे' वगैरे ऋग्विशेष, नाराशसी म्हणजे 'इद जना उपश्रुतम्' वगैरे यज्ञस्तावक ऋङ्मन्त्र, महाभारत आणि वायु-ब्रह्मादि पुराणें ह्या दहा विषयांपैकीं यावच्छक्य भागाचें क्रमानें पठन करावें. हल्लीं ह्याशिवाय ब्रह्मयज्ञांत वेदांगें, न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र ह्यांचेंही पठन करीत असतात. कारण 'तस्मात्साङ्गमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते' (वेदाचें षडंगासहच अध्ययन करून ब्रह्मलोकीं पूजा पावतो.) असें वेदांगशिक्षेंत म्हटलें आहे. आणखी '**पुराणन्यायमीमांसा-धर्मशास्त्राङ्गमिश्रिताः ॥ वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश**' ॥ १ ॥ अर्थ –पुराणें, न्याय, मीमांसा, धर्मशास्त्रें, सहा वेदांगें व चार वेद हीं चौदा विद्यांचीं व धर्माचीं स्थानें आहेत. असें याज्ञवल्क्यस्मृतींत म्हटलें आहे. आतां अशी शंका येते कीं, नित्य व अपौरुषेय वेदाबरोबर अनित्य असून पुरुषकृत अशा सूत्रादिग्रन्थांचें अध्ययन सांगणें योग्य कसें ? तर त्याचें उत्तर असें कीं, पशु अनित्य असताही त्याची जाती नित्य असल्यामुळे, '**पशुना यजेत**' ह्या श्रुतींत त्याचें ग्रहण केलें आहे. त्याचप्रमाणें कल्पत्व (विधित्व) वगैरे जाती, नित्य असल्यामुळे त्याच्या अध्ययनाचें येथें विधान केलें आहे तें योग्य आहे. सारांश, ब्राह्मणादि वेदभागांतच असत सांगितलेल्या विषयाचा, वेदांगें वगैरेमध्यें विस्तार केला असल्यामुळें, त्याचें पठण योग्य आहे व '**बिभेत्यल्पश्रुताद्वेदो मामयं ह्रापयेदिति ॥ इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्**' म्हणजे 'हा मला बुडवील' अशी, अल्पाध्ययन केलेल्या पुरुषाची वेदाला भीति वाटते, म्हणून इतिहासपुराणांनीं वेदाला बळकटी आणावी. इत्यादि वचनावरून आवश्यकही आहे. ह्या सूत्रांतल्या स्वाध्याय ह्या पदानें, गायत्रीपर्यंत पूर्वभाग व शेवटची 'नमो ब्रह्मणे' ही ऋचा स्वाध्याय नसून त्याची अंगभूत आहे ह्याच्यामधलाच स्वाध्याय होय असें ज्ञापित केलें

त्यामुळें प्रणव ( ॐ ), व्याहृति, गायत्री व शेवटची ऋचा हीं; एक ऋचेचाही ब्रह्मयज्ञ केला असता अवश्य म्हणजे नित्य आहेत. ॥ १ ॥

ह्या लोकांत द्रव्य वगैरेच्या दानानेंच फलप्राप्ति होते असे प्रसिद्ध आहे म्हणून, केवळ अध्ययनही फलप्रद आहे हें सांगण्याकरिता प्रत्यक्ष श्रुतिप्रमाणें देतात. (तैत्तिरीयारण्यक पहा).

**यदृचोऽधीते पयआहुतिभिरेव तद्देवतास्तर्पयति । यद्यजूंषि घृताहुतिभिः, यत्सामानि मध्वाहुतिभिः, यदथर्वाङ्गिरसः सोमाहुतिभिः, यद्ब्राह्मणानि कल्पान्गाथा नाराशंसीरितिहासपुराणानीत्यमृताहुतिभिः ॥ २ ॥**

पुरुष जें ऋचाचें अध्ययन करतो तें प्रत्यक्ष दुग्धाहुतिप्रमाणेंच देवताची तृप्ति करतें. यजूचें पठन घृताच्या आहुतीप्रमाणें, सामाध्ययन मधाच्या आहुतीप्रमाणें, अथर्ववेदाचें अध्ययन सोमरसाच्या आहुतीप्रमाणें व ब्राह्मण, कल्प, गाथा, नाराशंसी, इतिहास आणि पुराणें ह्यांचें पठन, अमृताच्या आहुतीप्रमाणें देवताचा संतोष करतें. गाथा व नाराशंसी ह्या ऋचाचाच पोटभेद आहेत; तथापि येथें त्याच्या पठनाचें वेगळें फल सांगितलें आहे; म्हणून मागच्या सूत्रांत त्याचा पृथक् उल्लेख केला आहे. गाथा, इन्द्रगाथा वगैरे नामानीं प्रसिद्ध आहेत. नराशंस म्हणजे नरानकडून प्रशंसिला जाणारा यज्ञ होय, त्याच्या स्तावक ऋचांना ( यज्ञस्तावक), नाराशंसी असें म्हणतात. वैदिकप्रसिद्ध शुनःशेपाख्यानाच्या 'यदिन्द्रो॰' वगैरे पांच ऋचा म्हणजे गाथा व 'इद जनाउपश्रुत' वगैरे तीन ऋचा नाराशंसीसंज्ञक, अशी प्रसिद्धि आहे. या अध्ययनानें देवाची तृप्ति होते असें सांगितलें. ॥ २ ॥ आता पितृतृप्ति होते हें सांगणारी श्रुति देतात.

**यदृचोऽधीते पयसःकुल्या अस्य पितॄन्स्वधा उपक्षरन्ति । यद्यजूंषि घृतस्य कुल्याः । यत्सामानि मध्वः कुल्याः । यदथर्वा-**

ङ्गिरसः सोमस्य कुल्याः। यद्ब्राह्मणानि कल्पान्गाथा नाराशंसीरितिहासपुराणानीत्यमृतस्य कुल्याः ॥ ३ ॥

त्याचप्रमाणें ब्रह्मयज्ञस्थ ऋचाचें पठन, यजमानाच्या पितराना, दुधाच्या नद्याच्या रूपानें, पितरांना बनून प्राप्त होतें, म्हणजे दुग्धनद्याप्रमाणें तृप्त करतें यजु पठन, पितराना तुपाच्या नद्याप्रमाणें, होतें सामाध्ययन मधाच्या नद्या, अथर्वपठन सोमरसाच्या नद्या व ब्राह्मण, कल्प, गाथा, नाराशसी, इतिहासपुराणें ह्यांचें पठन पितराना अमृताच्या नद्या होते ॥ ३ ॥

स यावन्मन्येत तावदधीत्यैतया परिदधाति । नमो ब्रह्मणे नमोऽस्त्वग्नये नमः पृथिव्यै नम ओषधीभ्यः । नमो वाचे नमो वाचस्पतये नमो विष्णवे महते करोमीति ॥ ४ ॥ ॥ ३ ॥

ह्या खंडाच्या पहिल्या सूत्रात एकंदर दहा अध्ययनाचे विषय सांगितले आहेत, त्या सर्वांचेंच पठन नित्य नाहीं हें सांगतात ब्रह्मयज्ञ करणारानें आपली इच्छा असेल तेथपर्यंत म्हणजे एकाग्रतेने पठन होईपर्यंत पूर्वोक्त दहा विषयापैकीं पठन करून, 'नमो ब्रह्मणे' ह्या वर दिलेल्या ऋचेचेंही, गायत्रीचे प्रारंभी, तीनदा पठन होत असल्यामुळे व 'परिधानीया त्रिरन्वाह' ह्या तैत्तरीयारण्यकाच्या वचनावरून, तीनदा पठन करावें हें बोधित होतें 'एतया' हें अधिक पद, नेहमीं ह्याच ऋचेने परिधान करावें हें सुचविण्याकरिता आहे ह्या वर्णनावरून व उपनयन, ब्रह्मचर्य वगैरे प्रकरणावरून प्राचीन आर्यांचा सर्वापेक्षा विद्याविषयीं किती आदर होता हें समजून येतें धन्य त्या पूर्वऋषींची, कीं, ज्यानीं सर्व जग अज्ञानांधकारात घोरत असता वेदादि विद्याचे रक्षण व संवर्धन करून, सर्वजगाचा उद्धार करण्याकरिता, आजतागायत त्याची परपरा स्वत व वंशजाकडून कायम राखिली नाहींतर, हल्लींचे त्याचेच निष्काळजी वंशज पहा पाश्चात्य

पढित यथेच्छ कुतर्कांच्या कुन्हाडींनीं प्राचीन विद्यांचें धुडके उठवीत असता, स्वत त्या विद्यांच्या उद्धारार्थ किंवा ज्ञानार्थ बिल्कूल खटपट न करता त्या आक्षेपकांचेंच कौतुक करीत पूर्वजांच्या केवळ निंदेनें, नरकाचें साधन करीत आहेत एकंदरींत हा प्रकार अत्यंत निंद्य व शोचनीय आहे. असो, येथें ह्या अध्यायाची तिसरी कंडिका संपली. हींत एकंदर सूत्रें ४ आहेत ॥ ४ ॥ ॥ ३ ॥

## अध्याय ३ रा—कण्डिका ४ थी.

देवतास्तर्पयति । प्रजापतिर्ब्रह्मा 'वेदा देवा ऋषयः सर्वाणि-च्छन्दांस्योङ्कारो 'वषट्कारो 'व्याहृतयः सावित्री 'यज्ञा द्यावापृथिवी' अन्तरिक्षमहोरात्राणि' सांख्याः सिद्धाः' समुद्रा 'नद्यो 'गिरयः 'क्षेत्रौष-धिवनस्पतिगन्धर्वाप्सरसो' नागा' वयांसि' गाव': साध्या' विप्रा' यक्षा' रक्षांसि' भूतान्ये'वमन्तानि' ॥ १ ॥

ब्रह्मयज्ञानंतर, 'प्रजापति' वगैरे वर दिलेल्या २९ पदांच्या पुढें, यथायोग्य तृप्यतु वगैरे पदें लावून मंत्र तयार करावे व प्रत्येक मंत्राचे शेवटीं उदक सोडून त्या देवतांचें तर्पण करावें त्यांपैकीं 'द्यावा-पृथिवी' हें द्विवचन असल्यामुळें त्याच्यापुढें, 'तृप्यताम्' असें द्विवचनी क्रिया-पद लावावें. वेदा वगैरे बहुवचनी पदांपुढें 'तृप्यन्तु' असें बहुवचनी क्रियापद लावावें. व इतरांपुढें प्रजापतिस्तृप्यतु असें एकवचनी क्रियापद लावावें. सूत्रांत यास्तव उद्देश समजण्याकरितां त्याच्या डोक्यावर उभ्या रेषा दिल्याच आहेत. 'एवमन्तानि' हाही केवळ मंत्र आहे. ॥ १ ॥

अथ ऋषयः शतर्चिनो' माध्यमा गृत्समदो' विश्वामित्रो' वाम-देवो'ऽत्रिर्भरद्वाजो' वसिष्ठः' प्रगाथा' पावमान्यः' क्षुद्रसूक्ता' महा-सूक्ता' इति ॥ २ ॥

ह्यानंतर निवीती होऊन ( माळेसारखें जानवें करून ) शतर्चिन वगैरे १२ मंत्रांनीं ऋषींचें तर्पण करावें. ह्यामध्ये गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज, व वसिष्ठ ह्या सहा पदांपुढें तृप्यतु आणि इतर बहुवचनापुढें ' तृप्यन्तु ' असें क्रियापद लावावें. ' यज्ञोपवीत-शौचेच ' ( श्रौतसूत्र १।२।१० ) ह्याने नित्य प्राप्त झालेल्या उपवीताची निवृत्ति करून निवीत सुचविण्याकरिता ' ऋषय ' हें अधिक पद घातलें आहे. नाहींतर पदार्थावरून किंवा सूत्रभेदावरून ऋषितर्पण आहे असे समजून आलें असतें ॥ २ ॥

प्राचीनावीती ॥ ३ ॥

ह्यापुढें प्राचीनावीती होऊन म्हणजे डाव्या हाताखालीं जानवें घालून, पुढच्या सूत्रांत सांगितलेल्या आचार्यांचे तर्पण करावें. कर्ता जीवत्पितृक असल्यास त्यानें, फक्त डाव्या अंगठ्यातच जानवें घालून प्राचीनावीती व्हावें ॥ ३ ॥

[ सुमन्तु-जैमिनि-वैशंपायन-पैल-सूत्रभाष्यभारतमहाभारतधर्मा-चार्या' जानन्ति-बाहवि-गार्ग्य-गौतम-शाकल्य-बाभ्रव्य-माण्डव्य-माण्डूकेया' गर्गीवाचक्नवी' वडवाप्रातीथेयी' सुलभामैत्रेयी' कहोळं' कौषीतकं' महाकौषीतकं' पैङ्ग्यं' महापैङ्ग्यं' सुयज्ञं' सांख्यायनमैतरेयं' महैतरेयं' शाकलं' बाष्कलं' सुजातवक्त्रमौदवाहिं' महौदवाहिं' सौजामिं' शौनकमाश्वलायनं' येचान्ये आचार्यास्ते सर्वे' तृप्यन्त्विति ॥ ४ ॥ ]

ह्या सूत्रांत एकंदर तेवीस वाक्यें आहेत. मैत्रेयीपर्यंतचीं पांच वाक्ये व ' येचान्ये० ' ह्या शेवटच्या वाक्यापुढें, यथायोग्य ' तृप्यतु ' किंवा 'तृप्यन्तु ' ह्या पदाचा ऊह करावा. ' कहोळ ' वगैरे सतरा द्वितीयान्त पदांपुढें, ' तर्पयामि ' म्हणून तर्पण करावें. देवता म्हणजे सृष्ट पदार्थांच्या आंत

गुप्तपणें वास करून त्यांचें नियमन करणाऱ्या ईश्वरी शक्ति समजाव्या. ऋषि म्हणजे वेदमंत्राचे द्रष्टे किंवा प्रकाशक असे समजावें ह्या खंडाच्या दुसऱ्या सूत्रांतले 'शर्तीचन' वगैरे दहा, ऋक्संहितेच्या दहा मंडळाचे ऋषि आहेत **'आचिनोति च शास्त्रार्थं शिष्यानाचारयत्यपि ॥ वेदवेदाङ्गवेत्ता च तमाचार्यं प्रचक्षते ॥'** म्हणजे जो शास्त्रार्थांत भर टाकतो, शिष्याकडून विहित कर्में करवितो व वेदवेदांगाचा अर्थ जाणतो त्याला आचार्य म्हणतात. अशी आचार्यपदाची व्याख्या आहे. ह्या सूत्रांतले पहिले चार म्हणजे सुमन्तु, जैमिनि, वैशंपायन व पैल हे क्रमानें; अथर्व, साम, यजु आणि ऋग्वेद ह्यांचे प्रकाशक असणारे चार मुख्य व्यासशिष्य होत. गर्गी, वडवा व सुलभा ह्या स्त्रिया असून शिष्यांना स्वतः पढविणाऱ्या व याज्ञवल्क्यासारख्यांशीं वाद करणाऱ्या आचार्या होत्या त्यावरून प्राचीनकाळीं स्त्रीशिक्षणही उत्तम स्थितींत असून त्यांना चांगला मान मिळत असे, हें, त्यांना आचार्यांत गणल्यावरून सुव्यक्त होत आहे. **'एकमन्त्राणि कर्माणि'** ह्या नियमानुसार प्रत्येक मंत्राच्या शेवटीं तर्पण करावें देवतातर्पण बोटांच्या शेंड्यावरून, ऋषितर्पण करंगळीच्या मुळ्यांवरून व आचार्य आणि पितरांचें तर्पण तर्जन्यंगुष्ठाच्या मधून पाणी सोडून करावें, असें स्मृत्यंतरांत म्हटलें आहे. त्याचप्रमाणें तर्पणास दर्भ घेऊन त्यांच्या अग्र, मूळ व मध्यावरून क्रमानें तीन तर्पणांत उदक सोडावें असेंही म्हटलें आहे. ॥ ४ ॥

**प्रतिपुरुषं पितॄंस्तर्पयित्वा गृहानेत्य यद्ददाति सा दक्षिणा ॥ ५ ॥**

आचार्यतर्पणानंतर, प्रत्येक पुरुषास येगवेगळें असें पितरांचें तर्पण करावें, हें सर्व तर्पण, ब्रह्मयज्ञाचें अंगभूत कर्म आहे. असो; त्यानंतर घरीं येऊन अतिथिभोजन, भिक्षादान वगैरे जें कांहीं दानें दीच ह्या ब्रह्मयज्ञाची

दक्षिणा होय. 'यद्दाति' (जें देतो) अशा सिद्धत्पदारून हें दक्षिणा-विधान काहीं अपूर्व नाहीं, जें दान होतें तीच दक्षिणा असे ठरतें. ह्या यज्ञाला दक्षिणायुक्तत्वाच्या योजनानें सोमयागाचें साम्य आणून ह्याची प्रशंसा केली आहे. वृत्तिकारानीं येथें फक्त पिता, पितामह व प्रपितामह ह्यांचेंच तर्पण सांगितलें आहे; परंतु इतर स्मृतींस अनुसरून सर्वच पितृगणाचें तर्पण करण्याचा शिष्टाचार आहे. त्याचा क्रम खालच्या शार्दूलविक्रीडित श्लोकांत दिला आहे. '**तातांम्बात्रितयं' सपत्नजननी मातामहादित्रयं सस्त्रि' स्त्री' तनयादि' तातजननीस्वभ्रातरः सस्त्रियः' ॥ ताताम्बात्मभगिन्यपत्यधवयुग्जायापिता' सद्गुरुः' । शिष्या'-ऽऽप्ताः' पितरो महालयविधौ तीर्थे तथा तर्पणे ॥ १ ॥** अर्थ महालय श्राद्धांत, तीर्थश्राद्धांत आणि तर्पणांत, पित्रादित्रय, मात्रादित्रय, सापत्न-माता, सपत्नीक मातामहादित्रय, स्त्री, पुत्र, कन्या, बाप, आई व स्वत ह्यांचे सपत्नीकभाऊ, बापाच्या, आईच्या व स्वतच्या बहिणी त्यांच्या पति-बाळांसह, श्वशुर, सद्गुरु, शिष्य व आप्त असा पितृगणाचा क्रम आहे ॥ ५ ॥

**अथापि विज्ञायते स यदि तिष्ठन्व्रजन्नासीनःशयानो वा यं यं क्रतुमधीते तेन तेन हास्य क्रतुनेष्टं भवतीति ॥ ६ ॥**

वेदावरून असेंही समजून येते कीं, ब्रह्मयज्ञास पुरेसा वेळ न मिळा-ल्यास पुरुष, उभा राहून, चालत असता, बसून, किंवा शक्ति नसल्यास फार काय निजूनही ज्या ज्या यज्ञभागाचें त्या निमित्तानें सद्भावानें पठन करतो, तो तो यज्ञ, यथासांग केल्याचें फळ त्याला मिळतें. ह्या वेद-प्रमाणावरून, निजून वेद म्हणू नये, अष्टमीला म्हणू नये वगैरे अन-ध्याय, नित्याच्या वेदपठनालाच आहेत, ब्रह्मयज्ञाला नाहींत असें सिद्ध झालें ॥ ६ ॥

**विज्ञायते तस्य द्वावनध्यायौ यदात्माऽशुचिर्यद्देशः ॥७॥ ॥४॥**

ज्यावेळेस कर्त्याचा देह सोयर, सुतक व मल वगैरे कारणानीं अपवित्र असेल किंवा जागा अपवित्र असेल तेव्हा मात्र ब्रह्मयज्ञ करूं नये. असे, ह्या यज्ञास फक्त दोनच अनध्याय आहेत असे वेदावरून समजतें अशा प्रकारच्या नित्यकर्माचा लोप होऊ नये म्हणूनच बहुधा अनार्यदेशात जाण्याविषयीं स्मृतिकारानीं निषेध सांगितला असावा. मध्याह्न हा, ब्रह्मयज्ञाचा मुख्य काल, वेदात सांगितला आहे. येथे ४ थी कंडिका संपली. हींत एकदर सूत्रें ७ आहेत. ॥ ७ ॥ ॥ ४ ॥

## अध्याय ३ रा—कण्डिका ५ वी.

**अथातोऽध्यायोपाकरणम् ॥ १ ॥**

ब्रह्मयज्ञ नित्य विहित आहे म्हणून, अध्ययनाचा प्रारंभ करण्यासबंधीं असणारें अध्यायोपाकरण ( उपाकर्म ) नावाचें कर्म सांगण्यास आता सुरवात करतों. हें बहुधा श्रावणात होत असल्यामुळें ह्या कर्माला श्रावणी असे म्हणत असतात. ॥ १ ॥

**ओषधीनां प्रादुर्भावे श्रवणेन श्रावणस्य ॥ २ ॥**

हेनें गवत उगवल्यावर श्रावण महिन्यातल्या श्रवण नक्षत्रावर, उपाकर्म करावें. 'ओषधीनां प्रादुर्भावे' ह्या पदानें पाऊस पडल्यानें औषधी श्रावणात न उगवल्यास भाद्रपदात श्रवणावर करावें असें सुचविलें आहे. 'वार्षिक' ( वर्षाऋतुसंबंधी ) अशी ह्या कर्माला, पुढें १० व्या सूत्रांत संज्ञा केली असल्यामुळें, पाऊस पडो किंवा न पडो श्रावण व भाद्रपद ह्या दोन वर्षाऋतूच्या महिन्यांशिवाय हें कर्म करूं नये किंवा ह्याचा लोपही करूं नये असें, ह्या नावाच्या व्युत्पत्तीवरून सिद्ध होतें ॥ २ ॥

**पञ्चम्यां हस्तेन वा ॥ ३ ॥**

ह्या सूत्रात ' श्रावणस्य ' हें पद अनुवृत्त आहे. अथवा श्रावणांतल्या शुक्ल पंचमीस हस्तनक्षत्र असल्यास त्या दिवशीं उपाकर्म करावे. असे एकंदर तीन काळ आहेत. ॥ ३ ॥

**आज्यभागौ हुत्वाऽऽज्याहुतीर्जुहुयात्। सावित्र्यै ब्रह्मणे श्रद्धायै मेधायै प्रज्ञायै धारणायै सदसस्पतयेऽनुमतये छन्दोभ्यऋषिभ्यश्चेति ॥ ४ ॥**

आज्यभाग देईपर्यंत होमविधीचे पूर्वतंत्र करून सावित्र्यै वगैरे ' छन्दोभ्य ऋषिभ्य ' पर्यंत असलेल्या नऊ पदापुढें स्वाहा जोडून नऊ आज्याहुति द्याव्या. ' **अनादेशे आज्यं द्रव्यं** ' ह्या परिभाषेनेच सिद्धि असता, ' आज्याहुती ' हे अधिक पद घालून उत्सर्जनकर्मीतही ह्याप्रमाणें ह्याच देवताना आज्याहुति द्याव्या हे ज्ञापित केले आहे. ह्या दोन्ही कर्मांत केवळ आज्यहोम नसल्यामुळे परिस्तरणे नित्यच घालली पाहिजेत, वैकल्पिक नाहींत. ॥ ४ ॥

**अथ दधिसक्तूञ्जुहोति ॥ ५ ॥**

नंतर दह्यात कालविलेल्या सक्तूचा ( सातूचें पीठ ) होम करावा. ॥ ५ ॥

ह्यापुढें दधिसक्तूच्या होमाचे मंत्र सांगतात.

**अग्निमीळे पुरोहितमित्येका ॥ ६ ॥**

' अग्निमीळे० ' ही एक ऋचा, पहिला मंत्र आहे. ' एका ' हें पद पुढच्या सूत्राप्रमाणे दोन दोन ऋचा येऊं नये म्हणून घातले आहे. ॥ ६ ॥

**कुपुम्भकस्तदब्रवीत्, आवदंस्त्वं शकुने भद्रमावद, गृणाना**

**जमदग्निना, धामं ते विश्वं भुवनमधिश्रितं, गन्ता नो यज्ञं यज्ञियाः सुशमि, योनः स्वो अरणः, प्रतिचक्ष्व विचक्ष्व, आग्ने याहि मरुत्सखा, यत्ते राजञ्छृतं हविरिति व्यृचाः ॥ ७ ॥**

कुशुभक वगैरे वर दिलेले, दोन दोन ऋचाचे नऊ समुदाय, म्हणजे एकदर हे अठरा मत्र होतात ॥ ७ ॥

**समानीव आकूतिरित्येका ॥ ८ ॥**

आणि ' समानीव० ' ही शाकलसहितेच्या शेवटची एक ऋचा असे सर्व मिळून वीस, दधिसक्तुहोमाचे मत्र आहेत ऋग्वेदाच्या शाकल सहितेचीं दहा मडळे आहेत. वरचे वीस मत्र, त्या प्रत्येक मडळाची पहिली व शेवटची एकेक ऋचा घेऊन तयार झाले आहेत ॥ ८ ॥

**तच्छंयोरावृणीमह इत्येका ॥ ९ ॥**

ऋग्वेदीय बाष्कल शाखेच्या ब्राह्मणानीं, ' समानीव०' ऋचेच्या जागीं ' तच्छंयो० ' हीच त्यांच्या सहितेंतली शेवटची ऋचा, विसावा मत्र समजावी ह्या दोन्ही सूत्रात ' एका ' पद घातल्याने, ह्या दोहोंपैकीं एकच ऋचा आपापल्या शाखेप्रमाणें घ्यावी. होममत्र २१ होऊ नयेत असें ज्ञापित होतें शाकल व बाष्कल ह्या दोन्ही शाखांना हें एकच गृह्यसूत्र असल्यामुळें हें सूत्र रचलें आहे. ॥ ९ ॥

**अध्येष्यमाणोऽध्यापयिष्यन्वारब्ध एताभ्यो देवताभ्यो हुत्वा सौविष्टकृतं हुत्वा दधिसक्तून्प्राश्य ततो मार्जनम् ॥ १० ॥**

वेदपठनास आरभ करणाऱ्या आचार्यानें, आपल्या शिष्यवर्गासह बसून पूर्वोक्त सावित्र्यादि मत्रानांस २९ देवताना, ह्याप्रमाणे आहुति देऊन नतर स्विष्टकृदाहुति द्यावी, व सर्वांसह पक्व दधिसक्तुप्राशन करून ( आचमन नाहीं ) मार्जन करावें. ह्यांत परिस्तरण घेऊन त्यावर

पाणी ओतून त्यानीं ते जल, शिष्यासह आपल्या अगावर शिंपडणे ह्याचेंच नाव मार्जन, असे येथ समजावें दधिसक्तुप्राशनापासून वेदारभा पर्यंत कृत्य शिष्यानीही करावें 'अध्येष्यमाण' हे अधिकपद, शिष्य नसल्यास एकट्यानेंच उपाकर्म करावें हा अर्थ सुचवीत आहे कारण 'वर्षासुच्छन्दांस्युपाकृत्याधीयीरन्' वर्षाऋतूत वेदारभ करून नतर अध्ययन करावें, असे वेदवचन आहे ॥ १० ॥

**अपरेणाग्निं प्राक्कूलेषु दर्भेषूपविश्योदपात्रे दर्भान्कृत्वा ब्रह्माञ्जलिकृतो जपेत् ॥ ११ ॥**

नतर अग्नीच्या पश्चिमेस, पूर्वेकडे अग्रें असलेल्या दर्भांवर बसून ताम्हन वगैरे उदकयुक्त पात्रावर दर्भ ठेवून, वर ठेवलेल्या उजव्या माडी वर ब्रह्माञ्जलि ठेवून, मोठ्याने वेदपठनास प्रारभ करावा ब्रह्माञ्जलींत उजवा हात वर असतो हल्लीं ओंजळींतच पाणी व दर्भ धरीत असतात गृह्यकर्मांत 'जपति' अशा पदाने बोधित केलेलें उपांशुत्व, अनित्य आहे असें ज्ञापक पुढें येईल शिवाय अध्यापनास हळू म्हणणे विरुद्ध आहे म्हणून येथें मोठ्यानेंच वेदपठन करावें ॥ ११ ॥

**ॐ पूर्वा व्याहृतीः सावित्री च त्रिरभ्यस्य वेदादिमारभेत् ॥ १२ ॥**

ॐकार, तीन व्याहृती व गायत्री ह्याचे तीनदा पठन करून अग्निमीळे वगैरे वेदा या आरभींचे सूक्त किंवा अनुवाक म्हणावा, व शिष्यानींही येत नसल्यास त्याचा अनुवाद करावा ह्यापैकीं गायत्रीचा उच्चार पादश, अर्धर्चश व सर्व असा क्रमाने तीनवारात करावा, हे मार्ग ब्रह्मयज्ञ-प्रकरणात लिहिलेच आहे प्रणवव्याहृतींचीही तीनदा आवृत्ति सुचविण्याकरिता सूत्रात चशब्द घातला आहे नतर सर्वप्रायश्चित्तादि शेषकर्म सपवावें ॥ १२ ॥

## तथोत्सर्गे ॥ १३ ॥

येथें ' एतेनोत्सर्गो व्याख्यात ' असें नेहमींच्या रीतीप्रमाणें म्हटलें नसल्यामुळे सर्वकर्मीचा अतिदेश होत नाहीं म्हणून शेषप्राशन व मार्जन, उत्सर्जनात होत नाहींत आता सूत्रार्थ देतों. उपाकर्माप्रमाणेंच वेदाच्या उत्सर्जनांतही ( समाप्ति ), हें ॐ कारादि वेदारभण करावें ॥ १३ ॥

## षण्मासानधीयीत ॥ १४ ॥

उपाकर्म केल्यावर नियमाने सहा महिने, अखण्डित वेदपठन करीत जावें ॥ १४ ॥

## समावृत्तो ब्रह्मचारिकल्पेन ॥ १५ ॥

समावर्तन केलेल्या पुरुषानही मद्य, मांस, स्त्रीगमन, खट्वा, दिवानिद्रा ह्यांचा त्याग, वगैरे जे ब्रह्मचाऱ्याचे अध्ययन–धर्म आहेत, ते पाळून वेदाचें अध्ययन करीत असावें मात्र समावर्तन झालेल्याला मेखला–दण्डादिक नसतात, कारण ते स्वाध्यायधर्म नाहींत हल्लींचीं पुराणोक्त चातुर्मास्यव्रते ह्या स्वाध्यायषण्मासाना अनुरूपच आहेत ॥ १५ ॥

## यथान्यायमितरे ॥ १६ ॥

समावृत्त नसलेल्यानीं म्हणजे ब्रह्मचाऱ्यानींही यथाशास्त्र हें अध्ययन करावें. ह्या उपाकर्मादि कृत्यात ब्रह्मचाऱ्याचीही प्रवृत्ति सागण्याकरिता हें सूत्र आहे ॥ १६ ॥

## जायोपेयेत्येके ॥ १७ ॥

ह्या सहा महिन्यात देखील समावर्तन झालेल्यानें भार्यागमन करावें असं काहीं आचार्य म्हणतात ॥ १७ ॥

प्राजापत्यं तत् ॥ १८ ॥

प्रजापतिच येण्याकरिता म्हणजे संततिकरताच तें स्त्रीगमन करावें, असा त्या आचार्यांचा, भार्यागमनास परवानगी देण्यात अभिप्राय आहे अर्थात् हें गमन ऋतुकालातच प्रजासिद्धयर्थ करावें शिवाय ' **ऋतुस्नातां तु यो भार्यां सन्निधौ नोपगच्छति ॥ घोरायां भ्रूणहत्याया युज्यते नात्र संशयः ॥** ' म्हणजे जो पुरुष जवळ असता, ऋतुस्नात भार्येकडे गमन करीत नाहीं, त्याला भयंकर असें गर्भहत्येचे पाप लागतें त्यात संशय नाहीं असे पराशराचे वचन, ह्या पक्षास अनुकूल आहे ॥ १८ ॥

वार्षिकमित्येतदाचक्षते ॥ १९ ॥

ह्या उपाकर्मास वेदात, वार्षिक ( वर्षासत्रीं ) असें नाव आहे. मूलभूतश्रुति मागें दिलीच आहे ( गृह्य० ३।५।१० पहा ) ॥ १९ ॥

मध्यमाष्टकायामेताभ्यो देवताभ्योऽन्नेन हुत्वाऽपोऽभ्यवयन्ति ॥ २० ॥

आता उत्सर्जनकर्म सागण्यास सुरवात करतात ' मध्यमाष्टका ' हे पद, अध्ययन षण्मासाच्या समाप्तीचें द्योतक आहे ' स्था लिपाकेन ' असे न म्हणता ' अन्नेन ' असे मुद्दाम म्हणून गृहसिद्धचरु ( भात ) घ्याचा असें सुचविलें आहे, तसेंच शाखांतरात ' एताभ्यो देवताभ्यो हुत्वा सावित्र्यादिभ्य आज्य ' असे वचन आहे असो आता सूत्रार्थ देतो मधल्या अष्टकेच्या सुमारास म्हणजे उपाकर्मापासून षण्मासान्तीं असलेल्या माघी पूर्णिमेस, सावित्र्यादि नऊ देवताना आज्याच्या व ' अग्निमीळ० ' वगैरेंच्या वीस देवताना गृहसिद्धचरूच्या आहुति देऊन स्विष्टकृद्धोम करावा. नतर पूर्वोक्त वेदारंभण करून व होमशेष संपवून पाण्यात शिरून स्नान करावें ॥ २० ॥

एता एव तद्देवतास्तर्पयन्ति ॥ २१ ॥

स्नान करून सावित्र्यादि २९ देवतांचे तर्पण करावें. 'सावित्रीं तर्पयामि' वगैरे मंत्रोह करावे. ॥ २१ ॥

आचार्यानृषीन्पितृंश्च ॥ २२ ॥

शेवटल्या चकारानें देवतातर्पण सूचित केले आहे. असो, त्यानंतर ब्रह्मयज्ञाप्रमाणे देव, ऋषी, आचार्य व पितर ह्यांचें तर्पण, क्रमानें करावें. 'देवतास्तर्पयति' ह्या ब्रह्मयज्ञ प्रकरणातल्या सूत्रांतले 'देवता' हें अधिक पदही, येथे त्या त्यांच्या तर्पणाची प्राप्ति सुचवीत आहे ॥ २२ ॥

एतदुत्सर्जनम् ॥ २३ ॥ ॥ ५ ॥

ह्या कर्माला उत्सर्जन म्हणतात, कारण येथपासून सहा महिने, वेदाध्ययन बंद ठेवून वेदांगपठन किंवा वेदार्थ-विचार करायचा असतो. त्या अध्ययनासही पूर्वोक्त स्वाध्यायनियम लागू आहेत असे बहुमत आहे. हल्लीं उत्सर्जन व उपाकर्म कृत्य एकाच दिवशीं करतात. मग ही गोष्ट हल्लींच्या स्वाध्यायलोपास अनुकूल म्हणून असल्यास न कळे ! ! असो. येथें ह्या तिसऱ्या अध्यायाची पाचवी कंडिका संपली. हिच्यात एकंदर सूत्रें तेवीस आहेत. ॥ २३ ॥ ॥ ५ ॥

अध्याय ३ रा—कण्डिका ६ वी.

अथ काम्यानां स्थाने काम्याः ॥ १ ॥

अग्नित्रयवान् अग्निहोत्र्याला उद्देशून ज्या 'पशुरथायुष्कामेष्ट्या, वायव्य श्वेतमालभेत भूतिकाम' वगैरे काम्येष्टि श्रौतसूत्रांत सांगितल्या आहेत त्याच्या जागीं केवळ गृह्याग्निमान् पुरुषानेंही, त्या त्या कामनाविशेषास उद्देशून असलेल्या इष्टि, पाकयज्ञाच्या विधीनें कराव्या. परंतु त्यापैकीं काम्यसोमयाग मात्र करू नये. कारण सोमाचें तंत्र ह्या गृह्यसूत्रांत सांगितलेलें नाहीं. ॥ १ ॥

चरवः ॥ २ ॥

काम्यपाकयज्ञात, मूळात पुरोडाश असतील त्याठिकाणच येथें चरुहोम करावे. कारण समानजातीयामध्येच बाध्यबाधकभाव असतो, शिवाय 'येऽमुत्र पुरोडाशास्त इह चरवः' (जे श्रौतांत पुरोडाश आहेत त्याचे जागीं येथें चरु होतात) असें बौधायनाचें वचन आहे, त्यामुळे, मूळातील पशूच्या जागीं येथेंही पशुहोमच होतात. मत्रादेश नसल्यामुळें नाममत्रानेंच हे होम करावे, असें मार्गेच सागितलें आहे. ॥ २ ॥

तानेन कामानाप्नोति ॥ ३ ॥

अग्निहोत्र्याला मूळच्या यज्ञानीं जीं फळें मिळतात तींच फळे केवळ गृह्याग्निमानाला ह्या काम्यपाकयज्ञानीं मिळतात 'अधिकस्याधिक फल' ह्या न्यायाने अर्थात् फलामध्ये तारतम्य होणारच. इतर पाकयज्ञ, दोघानाही सारखेच कर्तव्य आहेत. परतु हे काम्यपाकयज्ञ फक्त अनाहिताग्नीनेच करायचे असतात ॥ ३ ॥

वरच्या सूत्रानीं काम्ययाग सागितले. आता नैमित्तिक पाकयज्ञ वगैरे सागण्यास सुरवात करतात.

अथ व्याधितस्यातुरस्य यक्ष्मगृहीतस्य वा षडाहुतिश्चरुः ॥ ४ ॥

ज्वरादिरोगग्रस्त, अथवा कारणातरानीं विछान्यास खिळलेला किंवा क्षयरोगी अशा पुरुषानें षडाहुति नावाचा चरूचा याग करावा. ॥ ४ ॥

मुञ्चामि त्वा हविषा जीवनायकमित्येतेन ॥ ५ ॥

'मुञ्चामित्वा' (ऋक्स० ८।८।१९) ह्या सूक्तातल्या पाच मत्रानीं पाच व स्विष्टकृदाहुति सहावी ह्याप्रमाणें षडाहुतियुक्त तो होम करावा. ऐतरेयाचार्यानीं 'ब्रह्मणाग्नि' ह्या रक्षोहलिंगक सूक्तानें, षडाहुति सागितला

असून 'रक्षोघ्नः पडाहुतिः' असें शौनकानें म्हटलें आहे, त्याचें निवारण करून 'मुञ्चामि०' ह्यानेंच होम होण्याकरितां, 'एतेन' असे पद घातलें आहे. हीनपाद न घेतां पादग्रहण केलें आहे तें सूक्तावृत्तीनें सहा आहुति न व्हाव्या हें सुचविण्याकरतां आहे. ॥ ५ ॥

**स्वप्नममनोज्ञं दृष्ट्वा अद्यानो देव सवितरिति द्वाभ्यां यच्च गोषु दुःस्वप्न्यमिति पञ्चभिरादित्यमुपतिष्ठेत ॥ ६ ॥**

अशुभ स्वप्न पडलें असतां सकाळीं, 'अद्यानो देव सवितर्०' (ऋक्सं० ४।४।२५) वगैरे दोन ऋचा व यच्च गोषु वगैरे पांच ऋचा (ऋक्सं० ६।४।९) अशा सात मंत्रांनीं सूर्याचें उपस्थान करावें. ॥ ६ ॥

**यो मे राजन्युज्यो वा सखा वेति वा ॥ ७ ॥**

किंवा फक्त 'यो मे राजन्युज्यो वा०' (ऋक्सं० २।७।१०) ह्याच ऋचेनें उपस्थान करावें. ॥ ७ ॥

**क्षुत्वा, जृम्भित्वाऽमनोज्ञं दृष्ट्वा पापकं गन्धमाघ्रायाक्षिस्पन्दने कर्णध्वनने च सुचक्षा अहमक्षीभ्यां भूयासं सुवर्चा मुखेन सुश्रुत्कर्णाभ्यां मयि दक्षक्रतू इति जपेत् ॥ ८ ॥**

स्वतःला शिंक आली असतां, जांभई आली असतां, अप्रिय पदार्थाचें दर्शन झालें असतां, घाणेरडा वास आला असतां, डोळा लवत असतां किंवा कानांत आवाज होत असतां, 'सुचक्षा' वगैरे क्रतूपर्यंत वर दिलेला मंत्र जपावा ॥ ८ ॥

आतां प्रायश्चित्तरूप होम सांगतात.

**अगमनीयां गत्वाऽयाज्यं याजयित्वाऽभोज्यं भुक्त्वाऽप्रतिग्राह्यं प्रतिगृह्य चैत्यं यूपं चोपहत्य । पुनर्मामैत्विन्द्रियं पुनरायुः पुनर्भगः । पुनर्द्रविणमैतु मां पुनर्ब्राह्मणमैतु मां स्वाहा । इमे ये**

धिष्ण्यासो अग्नयो यथास्थानमिह कल्पताम् । वैश्वानरो वावृधानोऽन्तर्यच्छतु मे मनो हृद्यन्तरममृतस्य केतुः स्वाहेत्याज्याहुती जुहुयात् ॥ ९ ॥

रजस्वलात्व वगैरे कारणानीं गमनास अयोग्य अशा स्वपत्नीकडे गमन केलें असता, 'न्यस्तमार्त्विज्यमकार्य' (गृ० १।२३।१३) वगैरे सूत्रानीं निषिद्ध केलेल्या पुरुषाचें याज्ञिक केलें असता, लसूण किंवा वेश्यान्न वगैरे अभक्ष्याचें भोजन केलें असता, दान घेण्यास अयोग्य अशा वस्तूचा प्रतिग्रह ( स्वीकार ) केला असता किंवा अयोग्य पुरुषाचें दान घेतलें असता, अथवा अग्निचयन झालेल्या जागच्या यज्ञस्तंभाला स्पर्श केला असता, 'पुनर्माम्०' वगैरे स्वाहान्त दोन मंत्रानीं, आज्याच्या आहुति द्याव्या ह्या सूत्रांत आज्याहुतिपद इतर तंत्राच्या निवृत्तिकरतां आहे. ॥९॥

समिधौ वा ॥ १० ॥

किंवा वरच्या दोन मंत्रानीं आज्याहुतींच्या जागीं, दोन समिधाच द्याव्या ॥ १० ॥

जपेद्वा ॥ ११ ॥ ॥ ६ ॥

अथवा त्या दोन मंत्रांचा फक्त जपच करावा ह्या पक्षीं प्रदान घडत नसल्यामुळे मंत्रस्थ स्वाहा पदें गाळावीं पहिल्या पहिल्या पक्षाचा असंभव असल्यास पुढचे पक्ष स्वीकारावे येथें अकरा सूत्रानीं युक्त असलेली ही सहावी कंडिका संपली ॥ ११ ॥ ॥ ६ ॥

## अध्याय ३ रा—कण्डिका ७ वी.

अभ्याधितं चेत्स्वपन्तमादित्योऽभ्यस्तमियादाग्यतोऽनुपविशन्रात्रिशेषं भूत्वा येन सूर्य ज्योतिषा बाधसे तम इति पञ्चभिरादित्यमुपतिष्ठेत ॥ १ ॥

रोगग्रस्त नसून निजला असतां, जर सूर्य अस्तास जाईल तर त्या पुरुषानें जागा झाल्यावर ती रात्र संपेपर्यंत मौनानें उभा राहून उजाडल्यावर 'येन सूर्य ज्योतिषा' (ऋक्सं० ७-८-१२) वगैरे पांच मन्त्रांनीं सूर्याचें उपस्थान करावें. आळशी, खुशालचेंडू व झोपाळू वगैरेंना हें प्रायश्चित्त २।४ दिवस भोगावें लागल्यास त्यांच्या झोपेस चांगलाच आळा पडेल. ॥१॥

**अभ्युदियाचेदकर्मश्रान्तमनभिरूपेण कर्मणा, वाग्यत इति समानमुत्तराभिश्चतसृभिरुपस्थानम् ॥ २ ॥**

रोगग्रस्त किंवा विहित कर्मानें थकलेला नसून नाटकें, तमाशे पाहाणें वगैरे अयोग्य कर्मांनीं थकून निजलेला असतां जर सूर्योदय झाला; तर उठल्यावर, तो दिवसभर मौनानें उभा राहून दुसऱ्या दिवशीं सूर्योदयानंतर, त्यापुढच्या चार म्हणजे 'यस्य ते विश्वा०' वगैरे चार ऋचांनीं, सूर्याचें उपस्थान करावें. हा धर्मदंड जर सक्तीनें लागू करण्यांत येईल तर, नाटकें, चोरी, व्यभिचार, पत्ते, सोंगट्या वगैरे निरर्थक व घातुक व्यसनांना क्षय लागून तीं हळूहळू सर्व दूर होतील. **'धर्मे सर्वं प्रतिष्ठितम्'** हें अशाच सर्वशास्त्रांचा विचार करून म्हटलें आहे. फक्त सर्व तयार होऊन स्वधर्माचरण मात्र समग्र सुधारा म्हणजे अभ्युदय दूर नाहीं. ॥२॥

आतां सर्वप्रसिद्ध नित्यकर्म सांगतात.

**यज्ञोपवीती नित्योदकः सन्ध्यामुपासीत वाग्यतः ॥ ३ ॥**

नित्य उपवीतयुक्त होऊन, इतर स्मृतींत सांगितलेलें, आचमन, मार्जन, अघमर्षण, अर्घ्य वगैरे उदककृत्य करून, मौन धरून संध्यादेवीचें उपासन करावें. एवढें कृत्य दोन्ही संध्यांना सारखेंच आहे. हें कर्म अतिप्रसिद्ध असल्यामुळें सूत्रकारानें कांहीं अंशांत इतर स्मृतींचा हवाला दिला आहे. ॥ ३ ॥

आतां संध्योपासनाचा प्रकार सांगतात.

**सायमुत्तरापराभिमुखोऽन्वष्टमदेशं सावित्रीं जपेदर्धास्तमिते मण्डल आनक्षत्रदर्शनात् ॥ ४ ॥**

सायंकाळीं वायव्य दिशेस त्यांतही पश्चिमेच्या उत्तर भागाकडे तोंड करून बसून, सूर्यमण्डल अर्धे बुडाल्यापासून नक्षत्रें स्पष्ट दिसूं लागतात तितका वेळपर्यंत गायत्रीमंत्राचा जप करावा ॥ ४ ॥

**एवं प्रातः ॥ ५ ॥**

असाच गायत्रीजप प्रातःकाळींही करावा. ॥ ५ ॥

**प्राङ्मुखस्तिष्ठन्नामण्डलदर्शनात् ॥ ६ ॥**

परंतु सकाळीं, पूर्वेकडे तोंड करून उभें राहून सूर्यमंडळाचा उदय होईपर्यंत जप करावा. अर्धवट नक्षत्रें मावळल्यानंतर त्या जपास प्रारंभ करावा, असें वरच्या उलट न्यायानें ठरतें. वृत्तींतही असेंच सांगितलें आहे. येथें 'तिष्ठन्' (उभा) असें पद घातल्यामुळे, जेथें विशेष उक्त नसेल तेथें बसून कर्म करावें असें ज्ञापित केलें आहे. ॥ ६ ॥

**कपोतश्चेदगारमुपहन्यादनुपतेद्वा देवाः कपोत इति प्रत्यृचं जुहुयाज्जपेद्वा ॥ ७ ॥**

कपोतपक्षी जर घरावर बसेल किंवा घराजवळ येईल तर 'देवाः कपोत०' (ऋक्सं० ८।८।२३) या सूक्तांतल्या प्रत्येक ऋचेनें आज्या-हुति द्याव्या किंवा फक्त हा सूक्ताचा जपच करावा. कपोतशब्दाचा प्रसिद्ध अर्थ कबूतर असून वृत्तीमध्ये कपोतपक्षी तांबड्या पायाचा, शुभ्र वर्णाचा व अरण्यांत राहणारा आहे असें म्हटलें आहे; परंतु हल्लीं कपोत म्हणजे होला किंवा कवडा पक्षी असें समजत असून त्याचाच घरांत प्रवेश अनिष्ट आहे असें समजतात. ॥ ७ ॥

**चयमुत्वा पथस्पते इत्यर्थंचर्यां चरिष्यन् ॥ ८ ॥**

ह्या व पुढच्या दोन सूत्रांत 'प्रत्यृच जुहुयाद्वाजपेद्वा' एवढ्या पद अनुवृत्ति आहे. द्रव्य मिळविण्याकरिता, गांवास वगैरे जाण्यापूर्वी ' मुत्वा०' (ऋक्सं० ४।८।१७) ह्या सूक्तातल्या प्रत्येक ऋचेनें ( (अर्थात् आज्याचा) करावा किंवा फक्त हें सूक्तच जपावें. येथें पादग्रहण आहे तरी 'प्रत्यृच' ह्या पदाच्या अनुवृत्तिवरून सूक्तग्र होतें. ॥ ८ ॥

**संपूषन्विदुषा इति नष्टमधिजिगमिषन्मूढ्होवा ॥ ९ ॥**

नष्ट वस्तु सापडावी अशी इच्छा असता किंवा मूढपणा दूर व्हा अशी इच्छा असता 'संपूषन्विदुषा.' (सं० ४।८।१९) ह्या सूक्ता प्रत्येक ऋचेनें होम करावा किंवा जप करावा ॥ ९ ॥

**संपूषन्नध्वन इति महान्तमध्वानमेष्यन्प्रतिभयं वा ॥१०॥७॥**

लांबीचा प्रवास कर्तव्य असता, किंवा थोडाही भयग्रस्त प्रवास कर अस्ता, त्यापूर्वी 'संपूषन्नध्वने' ह्या (सं० १।३।२४) सूक्तातल्य ऋचांनीं होम करावा किंवा फक्त ह्या सूक्ताचा जपच करावा. येथे ७ वं कंडिका पूर्ण झाली. हिच्यांत सूत्रें दहा आहेत. ॥ १० ॥ ॥ ७ ॥

## अध्याय ३ रा–कण्डिका ८ वी.

आता समावर्तन–(सोडमुंज) कर्म सांगण्यास आरंभ करतात.

**अथैतान्युपकल्पयीत समावर्त्स्यमानो मणिं कुण्डले वस्त्रयुगं छत्रमुपानद्युगं दण्डं स्रजमुन्मर्दनमनुलेपनमाञ्जनमुष्णीषमित्यात्मने चाचार्याय च ॥ १ ॥**

ज्याची सोडमुंज करणें असेल त्या ब्रह्मचाऱ्यानें भिक्षा वगैरेंनीं, एक सुवर्णादिकांचा मणि, दोन कुंडलें (कर्णभूषणें), वस्त्रांची जोडी, छत्री,

जोडा, काठी, पुष्पमाळा ( स्रज् ), उटणें, केशर वगैरेची उटी, अञ्जन ( काजळ ), आणि पागोटें असे अकरा पदार्थ आपल्याकरिता व दुसरे अकरा आचार्याकरिता तयार करून ठेवावे. 'उपकल्पयीत' हा छान्दस ( आर्ष, वैदिक ) प्रयोग आहे. ॥ १ ॥

**यद्युभयोर्न विन्देताचार्यायैव ॥ २ ॥**

जर दोघांकरिता मिळणें शक्य नसेल तर फक्त आचार्याकरिताच मिळवावे. ॥ २ ॥

**समिधं त्वाहरेदपराजितायां दिशि यज्ञियस्य वृक्षस्य ॥ ३ ॥**

ईशान्य दिशेस जाऊन यज्ञोपयोगी वृक्षाची एक समिध् आणावी. 'यज्ञियस्य' हें पद, पुढें १६ व्या सूत्रांत 'तिष्ठन्समिधमादध्यात्' असे म्हटलें आहे तेथे, ह्याच समिधेचा होम करावा हें सुचविण्याकरिता घातले आहे. ॥ ३ ॥

**आर्द्रामन्नाद्यकामः पुष्टिकामस्तेजस्कामो वा, ब्रह्मवर्चसकाम उपवाताम् ॥ ४ ॥**

अन्नादिकाची, पुष्टीची किंवा तेजाची इच्छा असणारानें ती समिध् ओली आणावी, व ब्रह्मवर्चसाची इच्छा असणारानें वाळलेली ( उपवाता ) समिध् आणावी. ॥ ४ ॥

**उभयीमुभयकामः ॥ ५ ॥**

दोहोंची इच्छा करणारानें, एका बाजूला ओली व एका बाजूला वाळलेली अशी समिध् आणावी. ॥ ५ ॥

**उपरि समिधं कृत्वा गामन्नं च ब्राह्मणेभ्यः प्रदाय, गौदानिकं कर्म कुर्वीत ॥ ६ ॥**

ती आणलेली समिध्, भूमीवर न ठेवता उच जागीं ठेवावी; मग

गाय व अन्न ह्यांचें दान ब्राह्मणांना करून, गोदानविधींतलें कर्म (अध्याय १।१८।१ पहा) येथेंही करावें. 'कर्म' हें अधिकपद फक्त कर्मच करावें, मौनधारण वगैरेंची आवश्यकता नाहीं असें सुचवीत आहे. 'समावर्त्यमानः' ह्या अधिकारावरून व पुढच्या सूत्रांत मंत्रोह सांगितले आहेत, त्यावरून हें कर्म स्वतः ब्रह्मचाऱ्यानेंच करावें असें ज्ञापित केलें आहे ॥ ६ ॥

### आत्मनि मन्त्रान्सन्नमयेत् ॥ ७ ॥

गोदानमंत्रामध्यें 'एनं' वगैरे एतद्शब्दाचीं रूपें आहेत, त्या जागीं 'अस्मद्' शब्दाचीं रूपें घालून मंत्रार्थ स्वतःकडे वळतील असे ऊह करावे; कारण येथें स्वतःच कर्ता आहे. ऊह कसे करावे तें ह्यापुढें स्पष्ट देतों. 'ओषधे त्रायस्व मां' 'स्वधिते मा मा हिंसीः' 'वपतेदं ममायुष्मान् जरदष्टिर्यथासं' 'ते न म आयुषे' असे दोन ठिकाणीं; 'शिरोमुखं मा म आयुः प्रमोषीः' (गृह्य० १।१७।१५ पहा) ॥ ७ ॥

### एकक्लीतकेन ॥ ८ ॥

ह्या सूत्रांत 'उन्मर्दनं कुर्वीत' (उटणें करावें), असा शेष आहे. असो. ज्या करंजाच्या शेंगेंत एकच बी असते त्याला एकक्लीतक असें म्हणतात. तें वाटून त्यानें, स्नानापूर्वी अंगास उटणें लावावें ॥ ८ ॥

**शीतोष्णाभिरद्भिः स्नात्वा । युवं वस्त्राणि पीवसा वसाथे इत्यहते वाससी आच्छाद्य । अश्मनस्तेजोऽसि चक्षुर्मे पाहीति चक्षुषी, आञ्जयीत ॥ ९ ॥**

नंतर कोमट पाण्यानें स्नान करून 'युवं वस्त्राणि' (ऋक्सं० २।२।२२) ह्या ऋचेनें दोन्ही कोरीं वस्त्रें अंगावर धारण करावीं म्हणजे एक नेसावें व एक पांघरावें; प्रत्येक वस्त्राला मंत्रावृत्ति करावी. ह्यानंतर

' अश्मनस्तेजोऽसि चक्षुर्मे पाहि ' हा सूत्रोक्त मंत्र म्हणून डोळ्यांत अंजन घालावें. ' **सव्यं मनुष्या अञ्जते प्रथमं** ' ह्या श्रुतिवरून प्रथम डाव्या डोळ्यांत अंजन घालून नंतर उजव्यांत घालावें. प्रत्येक वेळीं मंत्रावृत्ति करावी ॥ ९ ॥

**अश्मनस्तेजोऽसि श्रोत्रं मे पाहीति कुण्डले आबध्नीत ॥ १० ॥**

पाहिपर्यंत असलेला वरचा मंत्र म्हणून दोन्ही कानांत सुवर्णाचीं कुण्डलें घालावीं. उजव्या कानांत आधीं घालावें. मंत्रावृत्ति आहेच ॥ १० ॥

**अनुलेपनेन पाणी प्रलिप्य, मुखमग्रे ब्राह्मणोऽनुलिम्पेत् । बाहू राजन्यः । उदरं वैश्यः । उपस्थं स्त्री । ऊरू सरणजीविनः ॥ ११ ॥**

नंतर सुगंधी उटी (केशर वगैरेचें अनुलेपन), दोन्ही हातांनीं घेऊन ब्राह्मणाने प्रथम तोंडास लावून नंतर सर्व अंगास लावावें. क्षत्रियाने प्रथम बाहूंना लावावें, वैश्याने अगोदर पोटास लावावे. स्त्रीनें प्रथम उपस्थास ( जननेंद्रिय, ऊरुमूल ) उटणे लावावें; आणि शूद्रादि सेवावृत्तिकांनीं प्रथम मांड्यांस उटी लावावी. स्त्रीविषयीं विधान केलें असल्यामुळें, ह्या उटीच्या प्रारंभाचा नियम, समावर्तनापुरताच नसून सार्वत्रिक आहे असे ज्ञापित होतें ॥ ११ ॥

**अनार्तोस्यनार्तोऽहं भूयासमिति स्रजमपि बध्नीत न मालोक्ताम् ॥ १२ ॥**

भूयासम् पर्यंत वर दिलेला मंत्र म्हणून स्रज् नांव दिलेला पुष्पहार, डोक्याला बांधावा. माला असा उल्लेख केलेला बांधूं नये. त्या नांवांतच अदृष्टविशेष आहे ॥ १२ ॥

**मालेति चेद्ब्रूयुः स्रगित्यभिधापयीत ॥ १३ ॥**

कोणी जर चुकून माला असे म्हणालेच तर त्यांच्याकडून स्रक् असे म्हणवून नंतर तो पुष्पहार बांधावा ॥ १३ ॥

**देवानां प्रतिष्ठे स्थः सर्वतो मा पातमित्युपानहावास्थाय दिवश्छन्नासीतिच्छत्रमादत्ते ॥ १४ ॥**

मा पातम् पर्यंत वरचा मंत्र, एकदाच म्हणून पायात वाहाणांचे जोडे घालावे, कारण मंत्रात 'पातम्' (दोघे माझें रक्षण करा) असें द्विवचन आहे, आणि 'दिवश्छन्नासि' हा मंत्र म्हणून छत्री घ्यावी ॥ १४ ॥

**वेणुरसि वानस्पत्योसि सर्वतो मा पाहीति वैणवं दण्डम् ॥ १५ ॥**

वेणु वगैरे मापाहिपर्यंत जर दिलेला मंत्र म्हणून हातात वेळूची काठी घ्यावी ॥ १५ ॥

**आयुष्यमिति सूक्तेन मणिं कंठे प्रतिमुच्योष्णीषं कृत्वा तिष्ठन्त्समिधमादध्यात् ॥ १६ ॥ ॥८॥**

नंतर, आयुष्यकारक असें 'आयुष्य वर्चस्य' (ऋक्स० ८।७।१७) हें खिलोक्त सूक्त म्हणून गळ्यात सुवर्णमणि बांधावा, व डोक्यास पागोटे घालून पुढच्या सूत्रातला मंत्र म्हणून, पायातले जोडे काढून अग्नीवर पूर्वोक्त समिध् द्यावी कारण, 'सोपानत्क आसनाभिवादननमस्कारान्वर्जयेत्' म्हणजे पायात जोडा असणारानें, आसनग्रहण, पाया पडणें, व नमस्कारहोमादिक पूजन, ह्या गोष्टी करू नये असें गौतमाचें वचन आहे येथें १६ सूत्रें आत असलेली ही आठवी कंडिका संपूर्ण झाली ॥ १६ ॥ ॥ ८ ॥

## अध्याय ३ रा—कण्डिका ९ वी.

**स्मृतं निन्दा च विद्या च श्रद्धा प्रज्ञा च पञ्चमी। इष्टं दत्तमधीतं च कृतं सत्यं श्रुतं व्रतम् ॥ यदग्ने सेन्द्रस्य सप्रजापतिकस्य सऋषि-**

कस्य सक्षत्रिराजन्यस्य सपितृकस्य सपितृराजन्यस्य समनुष्यस्य समनुष्यराजन्यस्य साकाशस्य सातीकाशस्य सानूकाशस्य सप्रतीकाशस्य सदेवमनुष्यस्य सगन्धर्वाप्सरस्कस्य सहारण्यैश्च पशुभिर्ग्राम्यैश्च यन्म आत्मन आत्मनि व्रतं तन्मे सर्वव्रतमिदमहमग्ने सर्वतो भरामि स्वाहेति ॥ १ ॥

त्यापैकीं, स्मृत, निंदा, विद्या, श्रद्धा, प्रज्ञा, इष्ट, दत्त, अधीत, कृत, सत्य, श्रुत, स्मृत ह्या बारा पदांचे, 'स्मृतं च मे अस्मृतं च मे तन्म उभयव्रतं, निन्दा च मे अनिन्दा च मे तन्म उभयव्रतं' असे ऊह उच्चारून नंतर, 'यदग्ने सेन्द्रस्य वगैरे स्वाहापर्यंत सूत्रोक्त मंत्रभाग म्हणून मागें आणलेली समिध् अग्नीत टाकावी, अशी परंपरा आचार्य सांगतात. स्मृत वगैरे कारिका, फक्त मूलपदाचीच बोधक आहे. तो मंत्रभाग नाहीं. ॥ १ ॥

**ममाग्ने वर्च इति प्रत्यृचं समिधोऽभ्यादध्यात् ॥ २ ॥**

नंतर, 'ममाग्ने वर्च०' (ऋक्स. ८।७।१५) ह्या खिलसूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें एकेक, अशा दहा (दुसऱ्या) समिधांचा होम करावा. वरून अनुवृत्ति चालू असताही पुन्हा घातलेल्या 'आदध्यात्' पदाने, पूर्वाधिकार निवृत्त केल्यामुळें, त्याचा होम नेहमींप्रमाणे बसून करावा. '**अथैतस्य समाम्नायस्य विताने योगापत्तिं वक्ष्यामः**' ह्या श्रौतसूत्राच्या प्रारंभीं, आश्वलायनानीं 'विताने' हें अधिकपद घालून यज्ञविधीमध्ये वेदपरिशिष्टरूप खिलसूक्तांचेही ग्रहण करावें असें ज्ञापित केलें आहे. कारण सूत्रामध्ये खिलांचा निर्देश केला आहे. त्याचेच प्रतीक येथें घेतलें असल्यामुळे ह्या समावर्तनहोमांत, हे खिलसूक्त स्वीकारलें आहे. असो नंतर स्विष्टकृत् वगैरे होमशेष पूर्ण करावा ॥ २ ॥

**यत्रैनं पूजयिष्यन्तो भवन्ति तत्रैतां रात्रीं वसेत् ॥ ३ ॥**

'स्नातकायोपस्थिताय' (गृ० १।२४।२) ह्या मार्गे दिलेल्या सूत्राप्रमाणें जेथें आपली मधुपर्कयुक्त पूजा होणार असेल त्या घरीं स्नातकानें ह्या होमाच्या दिवशीं रात्रीं रहावें. ह्यावरून लग्नाच्या किंचित् अगोदरच समावर्तन करून गुरुगृहाहून परत यावें असें दिसतें. ॥ ३ ॥

**विद्यान्ते गुरुमर्थेन निमन्त्र्य कृत्वाऽनुज्ञातस्य वा स्नानम् ॥ ४ ॥**

सर्व विद्या संपल्यावर किंवा उपनिषद्वाग म्हटल्यानंतर, आचार्यांच्या इच्छेप्रमाणें, त्यांना गुरुदक्षिणा दिल्यावर किंवा त्यांनीं जाण्यास आज्ञा दिल्यावर, ब्रह्मचर्यव्रतान्तीचें स्नान (सोडमुंज) करून, गुरुगृहाहून परत गृहस्थाश्रम वगैरेकरतां घरीं जावें ॥ ४ ॥

**तस्यैतानि व्रतानि भवन्ति ॥ ५ ॥**

त्या स्नातकानें पाळण्याचीं व्रतें, पुढें सांगितल्याप्रमाणें आहेत. हें सूत्र त्या त्या व्रतांच्या पाळनाचें, स्नातकानें संकल्प करावे असें ज्ञापन करण्याकरितां लिहिलें आहे. ॥ ५ ॥

**( न नक्तं स्नायात् । न नग्नः स्नायात् । न नग्नः शयीत । न नग्नां स्त्रियमीक्षेतान्यत्र मैथुनात् । वर्षति न धावेत् ॥ ६ ॥ )**

स्नातकानें रात्रीं स्नान करूं नये, नागव्यानें स्नान करूं नये, नागव्यानें निजूं नये, संभोगावांचून नग्न स्त्रीकडे पाहूं नये; पाऊस पडत असतां धावत जाऊं नये. हे सर्व नियम लौकिकदृष्ट्या शारीर व मानसिक विकारांचा उपद्रव होऊं नये अशाकरितां आहेत; व अलौकिक पुण्यफलही आहेच ॥ ६ ॥

**( न वृक्षमारोहेत् । न कूपमवरोहेत् । न बाहुभ्यां नदीं तरेत् न संशयमभ्यापद्येत ॥ ७ ॥ )**

स्यानें झाडावर चढूं नये, विहिरींत उतरूं नये, हातांनीं पोहून नदी ओलांडूं नये, व जुगाराशीं असल्या प्रकारच्या संशयांत पाडणाऱ्या गोष्टी

करूं नये. हे निषेध, केवळ फलप्राप्तीचाच संशय असल्यास नाहींत, असें सूत्रभेदानें ज्ञापित केलें आहे ॥ ७ ॥

**महद्वै भूतं स्नातको भवतीति विज्ञायते ॥ ८ ॥**

वरच्या दोन सूत्रांनीं इतकी जपणूक सांगण्याचें कारण, अत्यंत कठिण असें ब्रह्मचर्यव्रत पाळून वेद संपवलेला स्नातक, ही अत्यंत श्रेष्ठ व्यक्ति आहे असें वेदांत म्हटलें आहे. '**देवैश्चापि मनुष्यैश्च तिर्यग्योनिभिरेव च । गृहस्थः सेव्यते यस्मात्तस्माच्छ्रेष्ठो गृहाश्रमी ॥**' म्हणजे, देव, मनुष्य व पशुपक्षी देखील गृहस्थाचेच आधारें जीवन करतात. त्याकरितां गृहस्थाश्रमी पुरुष श्रेष्ठ आहे. ह्या स्मृतिवचनावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होते. येथें ह्या तिसऱ्या अध्यायाची ९ वी कंडिका संपली. हिच्यांत सूत्रें आठ आहेत ॥ ८ ॥ ॥९॥

## अध्याय ३ रा—कण्डिका १० वी.

**गुरवे प्रव्रक्ष्यमाणो नाम प्रब्रुवीत ॥ १ ॥**

समावर्तन झाल्यावर गुरूस सोडून जाण्यापूर्वी, गुरूचें 'देवदत्त' वगैरे संबोधनात नांव, शिष्यानें उच्चारावें. एरव्हीं '**आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्य च । श्रेयस्कामो न गृह्णीयाज्ज्येष्ठापत्यकलत्रयोः**' ह्या स्मृतिप्रमाणें गुरुनामोच्चारणाचा निषेध आहे. सूत्रामध्ये 'गुरवे' ही चतुर्थी, षष्ठीच्या अर्थीं आहे ॥ १ ॥

**इदं वत्स्यामो भोः इति ॥ २ ॥**

नंतर इदंपदाच्या जागीं स्वीकार्य आश्रमाचे द्वितीयान्त नाम घालून 'गार्हस्थ्यं वत्स्यामो भोः' असें म्हणावें. ह्याचा अर्थ 'अहो महाराज, मी गृहस्थाश्रम स्वीकारण्याकरतां जाणार आहे॥ २ ॥

**उच्चैरुर्ध्वं नाम्नः ॥ ३ ॥**

त्यापैकीं गुरूचें नाव हळूच उच्चारून, गार्हस्थ्य वगैरे पुढचा भाग मोठ्यानें उच्चारावा ॥ ३ ॥

**प्राणापानयोरुपांशु ॥ ४ ॥**

नतर त्या शिष्यानेंच 'प्राणापानयोरुरुव्यचा०' ( गृह्यसूत्र ३।१०।६ पहा ) हा मत्र हळूच जपावा पुढें ६ व्या सूत्रात 'जपतिपद' आहे तें येथेंच धरून अधिकारानें, तिन्ही सूत्रात भागत असता ह्या सूत्रात 'उपांशु' असें पृथग्ग्रहण करून, जपतिपद असता, उपांशूच्चार अनित्य आहे असें ज्ञापित केलें आहे. त्यामुळें वेदारंभणात मोठ्यानें उच्चारण होतें असें आम्हीं पूर्वीच लिहिलें आहे, व, आणखीहि एक कारण, तेथें दिलें आहे ॥ ४ ॥

**आ मन्द्रैरिन्द्र हरिभिरिति च ॥ ५ ॥**

आणि 'आमन्द्रैरिन्द्र०' हाही मत्र उपांशु म्हणावा ॥ ५ ॥

**अतो वृद्धो जपति प्राणापानयोरुरुव्यचास्तया प्रपद्ये देवाय सवित्रे परिददामीत्यृचंच ॥ ६ ॥**

ब्रह्मचाऱ्याचे पठण झाल्यानतर, वृद्ध म्हणजे आचार्यंही 'प्राणापानयो वगैरे परिददामि' पर्यंत असलेला मत्र व 'आमन्द्रैरिन्द्र०' ही ऋचा, या दोन मत्राचा जप करीत असतो. 'वृद्धो जपति' या पदावरून पूर्वी, ब्रह्म चाऱ्यानें हे मत्र जपावे असें ज्ञापित होतें ॥ ६ ॥

**समाप्यों ग्रास्स्वग्नीति जपित्वा महित्रीणामित्यनुमन्त्र्य ॥ ७ ॥**

ह्या सूत्रात 'अतिसृजेत्' ( निरोप द्यावा ) असा शेष आहे. असो. नंतर आचार्यानेच 'ॐ ग्रास्स्वग्नि हा मत्र जपून व महित्रीणामवोऽस्तु ह्या मंत्रानें शिष्याचें अनुमंत्रण करून 'गच्छ' ( आतां गृहस्थाश्रमा-करतां जा ) असें म्हणून घरी जाण्यास निरोप द्यावा. ॥ ७ ॥

**एवमतिसृष्टस्य न कुतश्चिद्भयं भवतीति विज्ञायते ॥ ८ ॥**

अशाप्रकारें अनुमत्रण करून सोडला असता त्या स्नातकाला कोठूनही भय येत नाहीं असें वेदावरून कळतें. वेदप्रमाण देऊन ह्या विधीचें श्रुतिमूलत्व दर्शविलें आहे. ॥ ८ ॥

**वयमाममनोज्ञा वाचः श्रुत्वा कनिक्रदज्जनुषं प्रब्रुवाण इति सूक्ते जपेद्देवीं वाचमजनयन्त देवा इति च ॥ ९ ॥**

गुरूचा निरोप घेऊन जाणाऱ्या त्या स्नातकानें, मार्गामध्यें पिंगळा व दिवाभीत वगैरे पक्ष्याचे अनिष्टसूचक व वाईट असे शब्द एकले असता, 'कनिक्रदज्जनुष०' ( ऋक्स० २।८।११ ) वगैरे दोन सूक्तें व 'देवीं वाचमजनयन्त०' ( ऋक्स० ६।७।५ ) ही ऋचा जपावी. कुमारिलभट्टाच्या कारिकांत फक्त एकच सूक्त जपावें असें आहे. परंतु वर सूत्रांत 'सूक्ते' असें द्विवचन आहे, म्हणून असा अर्थ लिहिला. ॥ ९ ॥

**स्तुहिश्रुतं गर्तसदं युवानमिति मृगस्य ॥ १० ॥**

कोल्हा वगैरे पशूंच्या अप्रिय शब्दाचें श्रवण झालें असता, ' स्तुहि श्रुत गर्तसद० ' ( ऋक्स० २-७-१८ ) ही ऋचा जपावी ॥ १० ॥

**यस्या दिशो बिभीयाद्यस्माद्वा तां दिशमुल्मुकमुभयतः प्रदीप्तं प्रत्यस्येन्मन्थं वा प्रसव्यमालोड्याभयं मित्रा-वरुणा मह्यमस्त्वर्चिषा शत्रून्दहन्तं प्रतीत्य मा ज्ञातार, मा प्रतिष्ठां विन्दन्तु मिथो भिन्दाना उपयन्तु मृत्युमिति, संसृष्टं धनमुभयं समाकृतमिति मन्थं न्यञ्चं करोति ॥ ११ ॥ ॥ १० ॥**

त्या स्नातकाला ज्या दिशेकडे भय वाटत असेल किंवा ज्या व्याघ्र, सर्प वगैरेचें भय वाटत असेल त्याच्याबाजूला, दोन्ही टोकांस पेटलेले कोलीत घेऊन, अभयं मित्रा वगैरे यन्तु मृत्यु पर्यंत असलेला सूत्रोक्त

मंत्र म्हणून तें फेकून द्यावें, किंवा स्त्री हातात घेऊन डाव्या हाताकडून गरगर फिरवून ' संसृष्ट धनुसुभय० ' हा मंत्र ( ऋक्सं० ८।३।१९ ) म्हणून तिचे डोकें भुईकडे करावें स्त्री फक्त भुईकडेच करावी, फेंकू नये हे सुचविण्याकरिता दोनदा ' मध्यपद घातलें आहे येथे तिसऱ्या अध्यायाची १० वी कंडिका संपूर्ण झाली हिच्यामध्ये एकंदर अकरा सूत्रें आहेत ॥ ११ ॥ ॥१०॥

## --- अध्याय ३ रा—कण्डिका ११ वी.

**सर्वतोभयादनाज्ञातादष्टावाज्याहुतीर्जुहुयात् । पृथिवी धृता साग्निना धृता तया धृतया वर्त्या यस्माद्भयाद्बिभेमि तद्वारये स्वाहा । अन्तरिक्षं धृतं तद्वायुना धृतं तेन धृतेन वर्त्रेण यस्माद्भया-द्बिभेमि तद्वारये स्वाहा द्यौर्धृता सादित्येन धृता तया धृतया वर्त्या यस्माद्भयाद्बिभेमि तद्वारये स्वाहा । दिशो धृतास्ताश्चन्द्रमसा धृतास्ता-भिर्धृताभिर्वर्त्रीभिर्यस्माद्भयाद्बिभेमि तद्वारये स्वाहा । आपो धृतास्ता वरुणेन धृतास्ताभिर्धृताभिर्वर्त्रीभिर्यस्माद्भयाद्बिभेमि तद्वारये स्वाहा वेदा धृतास्ते छन्दोभिर्धृतास्तैर्धृतैर्वर्त्रैर्यस्माद्भयाद्बिभेमि तद्वारये स्वाहा प्रजा धृतास्ताः प्राणेन धृतास्ताभिर्धृताभिर्वर्त्रीभिर्यस्माद्भयाद्बिभेमि तद्वारये स्वाहा । सर्वं धृतं तद्ब्रह्मणा धृतं तेन धृतेन वर्त्रेण यस्माद्भ-याद्बिभेमि तद्वारये स्वाहेति ॥ १ ॥**

जर सर्वच दिशांकडून भय उत्पन्न झालें असून अमुक पुरुष भयाचे कारण आहे असें समजत नसेल तर, त्या स्नानकानें, पृथिवी धृता वगैरे सूत्रोक्त आठ मत्रांनी तीलीतुपाच्या आठ आज्याहुती द्याव्या, कारण याचा गृह्याग्नि उपासि तयार नसतो ' अग्नि ' हें पद आज्यभाग व स्विष्टकृदाहुतीची निवृत्ति सुचविते, तसेंच ' आज्याहुति ' हें पद परि-स्तरणांच परिषेचन सुचविण्याकरितां आहे ॥ १ ॥

**अथापराजितायां दिश्यवस्थाय स्वस्त्यात्रेयं जपति यत इन्द्र भयामह इति च सूक्तशेषम् ॥ २ ॥ ॥ ११ ॥**

पूर्वोक्त होमानंतर ईशान्य दिशेस उभा राहून 'स्वस्तिनो मिमीतां' हें सूक्त खिलासह (ऋक्स० ४।३।७ स्वस्त्यात्रेय), म्हणजे एकदर सात ऋचा व 'यत इन्द्रभयामहे' वगैरे, ऋक्स ६।४।३८ ह्या सूक्ताच्या शेवटल्या सहा ऋचा जपाव्या. ह्या कर्मानें स्नातकाला कोठूनही भय उत्पन्न होत नाहीं 'वयसाममनोज्ञा०' सूत्रापासून येथपर्यंत प्रकरण, गुरूचा निरोप घेऊन प्रथमच निघालेल्या स्नातकाविषयीं आहे असें वृत्तींत लिहिलें आहे. येथें अकरावी कण्डिका संपली. हिच्यांत फक्त २ च सूत्रें आहेत॥२॥ ॥११॥

## अध्याय ३ रा—कण्डिका १२ वी.

**संग्रामे समुपोव्ळ्हे राजानं संनाहयेत् ॥ १ ॥**

युद्धाचा प्रसंग उत्पन्न झाला असता, राजपुरोहितानें पुढे सांगितल्याप्रमाणें, राजाला युद्धास सिद्ध करावा ज्याने समुपोढेच्या जागीं समुपोव्ळ्हे झाले आहे तो प्रातिशाख्यनियम, आमच्या वेदांगशिक्षाविवरणांत 'दु स्पृष्टश्चेति विज्ञेय' ह्या सूत्रावर पहा ॥ १ ॥

**आत्वाहार्षमन्तरेधीति पश्चाद्रथस्यावस्थाय ॥ २ ॥**

राजाच्या रथाच्या मागें उभा राहून, 'आत्वाहार्षमन्तरेधि०' वगैरे सूक्ताचा (ऋक्स० ८।८।३१) जप करावा. येथे व 'ऋषभ मा समानाना' (गृ० २।६।१३) येथे पादग्रहण असताही सूक्तग्रहण होतें, ह्याविषयींचे ज्ञापक, पूर्वीच दिले आहे ॥ २ ॥

**जीमूतस्येव भवति प्रतीकमिति कवचं प्रयच्छेत् ॥ ३ ॥**

'जीमूतस्येव भवति (ऋक्स० ५।१।१९) ह्या सूक्ताच्या पहिल्या ऋचेनें, राजाच्या अंगावर कवच चढवावें. ॥ ३ ॥

**उत्तरया धनुः ॥ ४ ॥**

त्याच सूक्ताच्या त्या पुढच्या म्हणजे दुसऱ्या 'धन्वना गा०' ह्या ऋचेनें, *धनुष्य धारण करण्यास द्यावें.* ॥ ४ ॥

**उत्तरां वाचयेत् ॥ ५ ॥**

त्यापुढची म्हणजे तिसरी ऋचा, 'वक्ष्यन्ती०' राजाकडून म्हणवावी. ॥५॥

**स्वयं चतुर्थीं जपेत् ॥ ६ ॥**

त्याच सूक्ताची चवथी ऋचा 'ते आचरे०' स्वतः पुरोहितानेंच जपावी ॥ ६ ॥

**पञ्चम्येषुधिं प्रयच्छेत् ॥ ७ ॥**

पांचवी ऋचा 'बह्वीनांपिता०' म्हणून बाणांचा भाता द्यावा. (राजाच्या *पाठीस बांधावा*). ॥ ७ ॥

**अभिप्रवर्तमाने षष्ठीम् ॥ ८ ॥**

नंतर इष्ट दिशेकडे राजाचा रथ चालू झाला असतां सहावी ऋचा (ऋक्सं० ५।१।२० रथे तिष्ठन्०), जपावी. अशा ऋचेला मंत्र अशी संज्ञा आहे. कारण मंत्रलिंगावरूनच विनियोगाचा बोध होतो ॥ ८ ॥

**सप्तम्याश्वान् ॥ ९ ॥**

सातवी ऋचा (ऋक्सं० तीव्रान्घो०), म्हणून रथाच्या घोड्यांचें अनुमंत्रण करावें ॥ ९ ॥

**अष्टमीमिषूनवेक्षमाणं वाचयति ॥ १० ॥**

राजा, बाणांकडे पाहूं लागला असतां, त्याच सूक्ताची आठवी ऋचा (ऋक्सं० रथवाहनं०) राजाकडून म्हणवावी ॥ १० ॥

**अहिरिव भोगैः पर्येति बाहुमिति तलं नह्यमानम् ॥ ११ ॥**

धनुष्याच्या दोरीचा आघात होऊं नये म्हणून हातांत जी हस्तावाप (हातमोजा, तल,) नांवाची पिशवी घालतात, ती चढवीत असतां, राजा-

करून 'अहिरिव भोगैः०' ही ऋचा (ऋक्सं० ५।१।२१) म्हणावी ॥ ११ ॥

**अथैनं सारयमाणमुपारुह्याभीवर्तं वाचयति प्रयो वां मित्रावरुणेति च द्वे ॥ १२ ॥**

नंतर रथांत बसलेल्या त्या राजाला सारथि नेत असतां, त्या रथावर चढून राजाकडून 'अभीवर्तेन' वगैरे सूक्त (ऋक्सं० ८।२।३२) व 'प्रयो वां मित्रावरुणा०' (ऋक्सं० ६।७।६) वगैरे दोन ऋचा म्हणवाव्या ॥ १२ ॥

**अथैनमन्वीक्षेताप्रतिरथशाससौपर्णैः ॥ १३ ॥**

ह्यापुढें, राजाकडे पहात पहात, अप्रतिरथ, शास आणि सौपर्ण हीं तीन सूक्तें पुरोहितानें म्हणावीं. 'आशुः शिशानः' वगैरे सूक्ताला (सं० ८।५।२२) अप्रतिरथ सूक्त म्हणत असून 'शास इत्था०' ह्या सूक्ताला शाससूक्त (सं० ८।८।१०) अशी संज्ञा आहे. सौपर्णसूक्तें पुष्कळ असल्यामुळें, येथें कोणतें म्हणावें, ते पुढच्या सूत्रांत आहे ॥ १३ ॥

**प्रधारयन्तु मधुनो घृतस्येत्येतत्सौपर्णम् ॥ १४ ॥**

येथें, 'प्रधारयन्तु मधुनो०' असा आरंभ असलेलेंच सौपर्णसूक्त म्हणावें (संहितांत नसल्यामुळें हे सूक्त, एखाद्या खिलांत असावेंसें वाटतें.) ॥ १४ ॥

**सर्वा दिशोऽनुपरियायात् ॥ १५ ॥**

नंतर राजानें, आपल्या रथानें, सर्व दिशांस अनुक्रमानें गमन करावें ॥ १५ ॥

**आदित्यमौशनसं वाऽवस्थाय प्रयोधयेत् ॥ १६ ॥**

आणि दिवसा सूर्य असेल त्या दिशेला व रात्रीं शुक्र असेल त्या

दिशेला उभें राहून आपलें सैन्य लढवावें. तात्पर्य शुक्राच्या किंवा सूर्याच्या समोर उभे राहून कधींही लढू नये ॥ १६ ॥

**उपश्वासय पृथिवीमुत द्यामिति तृचेन दुन्दुभिमभिमृशेत् ॥१७॥**

नंतर राजानेच 'उपश्वासय पृथिवीं' वगैरे तीन ऋचा ( ऋक्सं० ४।७।३५ ) म्हणून युद्धाच्या नौबदीला स्पर्श करावा ॥ १७ ॥

**अवसृष्टा परापतेतीषून्विसर्जयेत् ॥ १८ ॥**

'अवसृष्टा परापत ' ( सं० ५।१।२२ ) ही ऋचा म्हणून बाण टाकावे ॥ १८ ॥

**यत्र बाणाः संपतन्तीति युध्यमानेषु जपेत् ॥ १९ ॥**

नंतर पुरोहिताने, सैनिक लोक युद्ध करीत असता, ' यत्र बाणाः संपतन्ति ( ऋक्सं० ५।१।२२ ) ही ऋचा म्हणावी ॥ १९ ॥

**संशिष्याद्वा संशिष्याद्वा ॥ २० ॥**

अथवा राजाला मंत्र पाठ येत असता, अमक्या कृत्याचे वेळीं अमुक ऋचा तू म्हण असें, उपाध्यायानें राजाला शिकवावें म्हणजे रथामार्गे उभा राहून 'आत्वाहार्य' सूक्त म्हण, ' जीमूतस्य ' ही ऋचा म्हणून कवच धारण कर, वगैरे अर्थ समजावा अध्यायाची समाप्ति सुचविण्या करिता, ' संशिष्याद्वा ' ह्या पदाची आवृत्ति केली आहे. येथें, ही बारावी कंडिका संपली. हिच्यात एकंदर सूत्रें वीस आहेत ॥ २० ॥ १२ ॥

येथें श्रीआश्वलायनकृत गृह्यसूत्राचा तिसरा-
अध्याय, सार्थ संपूर्ण झाला

॥ श्रीरस्तु ॥

## गृह्यसूत्र अध्याय ४ था प्रारंभ.

### अध्याय ४ था—कण्डिका १ ली.

**आहिताग्निश्चेदुपतपेत्प्राच्यामुदीच्यामपराजितायां वा दिश्युदवस्येत् ॥ १ ॥**

अग्निहोत्री, जर रोगानीं अत्यन्त पीडित होईल तर त्याने गावाबाहेर पूर्वेस, उत्तरेस किंवा ईशान्यदिशेस अग्नींसह जाऊन निरोगी होईपर्यंत झोपडी बांधून रहावे. हल्लींहि प्लेगाच्या निमित्तानें स्थलान्तर करणें सर्वांना परिचित झालें आहे. ह्या सूत्रावरून पूर्वीही हवापालट करण्याची कल्पना होती असे दिसते. परंतु सूत्रकार पुढच्या सूत्राने, ह्या निधीचे अदृष्ट कारणही देतील ॥ १ ॥

**ग्रामकामा अग्नय इत्युदाहरन्ति ॥ २ ॥**

कारण अग्नि, गावात राहण्याची इच्छा करणारे आहेत, असे वेदवेत्ते म्हणतात ॥ २ ॥

**आशंसन्त एनं ग्राममाजिगमिषन्तोऽगदं कुर्युरितिह विज्ञायते ॥३॥**

त्यामुळें ते अग्नि, गावात परत येण्याच्या इच्छेनें त्या अग्निहोत्र्याला रोगमुक्त करतात असे वेदावरून कळून येते. ह्याला प्रमाणभूत श्रुतिवचन हल्लीं प्रसिद्ध नसूनही येथे वेदप्रमाण सूचित केल्याने हे सर्वच गृह्यसूत्र, प्रचलित किंवा अप्रसिद्ध ( उत्सन्न ) अशा श्रुतींच्याच आधारावर रचलें आहे असें ज्ञापित केले आहे ॥ ३ ॥

**अगदः सोमेन पशुनेष्ट्येष्ट्वाऽवस्येत् ॥ ४ ॥**

व्याधिरहित झाल्यावर सोमयाग, पशुयाग किंवा इष्टि करून गावात परत यावें. येथे सोमपदाने, सर्व सोमांचा प्रकृतिभूत असा अग्निष्टोमच

विवक्षित आहे पशु, निरूढच (प्रसिद्ध) प्रकृतिभूत असल्यामुळें इन्द्राग्निदेवताक समजावा, व इष्टीची देवता केवळ अग्निच समजावी, कारण, सर्व इष्टींत, पौर्णमासाचा अतिदेश असतो, तथापि त्याच्या तीन देवतापैकीं अग्निच नित्य असून, अमावास्येस 'अग्नीषोमयो स्थाने इन्द्राग्नी' ह्या वाक्याने दुसऱ्या दोन देवता बदलतात म्हणून त्या नित्य नाहींत सोमादित्रयापैकीं पहिले पहिले शक्य नसल्यास, पुढचे पुढचे पक्ष स्वीकारावे अशी परंपरा आहे ॥ ४ ॥

अनिष्ट्वा वा ॥ ५ ॥

किंवा वरच्याप्रमाणे होम करणें शक्य न झाल्यास तसेच गावात परत यावें ॥ ५ ॥

संस्थिते भूमिभागं खानयेद्दक्षिणपूर्वस्या दक्षिणापरस्यां वा ॥६॥

आता अन्त्यविधि सांगण्यास सुरवात करतात तो अग्निहोत्री आयुष्य संपल्यामुळे बरा न होता मृत झाला तर, त्याचें और्ध्वदेहिक (क्रिया) करणारानें गावाच्या आग्नेयीस किंवा नैर्ऋत्य दिशेस खड्डा खणवावा ॥६॥

दक्षिणाप्रवणं प्राग्दक्षिणाप्रवणं वा प्रत्यग्दक्षिणाप्रवणमित्येके ॥ ७ ॥

त्या खड्डयात दक्षिणेच्या बाजूस किंवा आग्नेय कोपऱ्याला उतार असावा नैर्ऋत्य कोपऱ्यातच उतार असावा असे कांहीं थोऱ्या आचार्यांचें म्हणणें आहे ॥ ७ ॥

यावानुद्बाहुकः पुरुषस्तावदायामम् ॥ ८ ॥

त्या खड्डयाची पूर्व पश्चिम लांबी, वर हात करून उभा राहिलेल्या पुरुषाच्या उंची इतकी असावी ॥ ८ ॥

**व्याममात्रं तिर्यक् ॥ ९ ॥**

त्याची रुंदी एक वावभर ( पाच मुटे हात ) असावी. ॥ ९ ॥

**वितस्त्यवाक् ॥ १० ॥**

त्या खड्ड्याची खोली एक वीतभर ( १२ बोटे ) असावी. ॥ १० ॥

**अभित आकाशं श्मशानम् ॥ ११ ॥**

दहनभूमी किंवा हाडें पुरण्याची जागा ह्या दोहोंना श्मशान म्हणतात. त्या दोन्ही प्रकारच्या श्मशानभूमीच्या सभोंवतीं आकाश मोकळें असावें; अर्थात् मध्ये आकाश मोकळें नसावें. ॥ ११ ॥

**बहुलौषधिकम् ॥ १२ ॥**

दोन्ही प्रकारच्या श्मशानात औषधि पुष्कळ उगवलेल्या असाव्या ॥ १२ ॥

**कण्टकिक्षीरिणस्त्विति यथोक्तं पुरस्तात् ॥ १३ ॥**

' कण्टकिक्षीरिण० ' ( गृ० ३।७।५ ) ह्या पूर्वोक्त वास्तुप्रकरणातल्या सूत्राप्रमाणें, काटेरी, चिकाळ, अघाडा, वगैरे सहा प्रकारचीं झाडेझुडपें, दाहभूमींतून काढून टाकावीं ॥ १३ ॥

**यत्र सर्वत आपः प्रस्यन्देरन्नेतदादहनस्य लक्षणं श्मशानस्य ॥ १४ ॥**

जेथें सर्व दिशेस पाणी ओघळून जाते ती, म्हणजे मध्ये उंच व भोंवतीं सखल अशी भूमि, दहनश्मशानाची असावी. हा नियम अस्थिनिक्षेपश्मशानाला, अर्थात् लागू नाहीं ॥ १४ ॥

**केशश्मश्रुनखलोमानीत्युक्तं पुरस्तात् ॥ १५ ॥**

नतर पूर्वी श्रौतसूत्राच्या ६ व्या अध्यायाच्या दहाव्या खडात दीक्षितमरणाच्या प्रसंगात सांगितल्याप्रमाणे, ' केशश्मश्रु० ' वगैरे प्रेताचा विधि

करावा. तेथच सूत्रभाग देऊन अर्थ देतों **"संस्थिते तीर्थेन निर्हृत्यावभृथे प्रेतालंकारान्कुर्वन्ति केशश्मश्रुनखलोमानि वापयन्ति नलदेनानुलिम्पन्ति नलदमालां प्रतिमुञ्चन्ति निष्पुरीषमेके कृत्वा पृषदाज्यं पूरयन्त्यहतस्य वाससः पाशतः पादमात्रमवच्छिद्य प्रोर्णुवन्ति प्रत्यग्दशेनानिःपादम्"** ह्याचा अर्थ —यज्ञात दीक्षा घेतलेला ऋत्विक् वगैरे मृत झाला असता, त्याला यज्ञभूमीच्या तीर्थसंज्ञक भागातून बाहेर नेऊन स्नान घालून देशकुलाचाराप्रमाण त्या प्रेताला अलंकृत करावा, व त्याचे केश, दाढी—मिशा, नखें व छातीवरची लव काढवून टाकावी, अंगाला वाळ्याची उटी लावून वाळ्याचीच माळ त्याच्या गळ्यात घालावी काहींच्या मताने त्याचे शारीरमळ चोळून काढून अंगाला दधियुक्त घृतही लावावें असे आहे असो, नंतर कोऱ्या वस्त्राचा मूठ्यापासूनचा एक तुकडा डोक्यापासून पायापर्यंत पुरेल इतका कापून घेऊन त्यानें पूर्वेकडे डोकें असलेल्या त्या प्रेताचें शरीर पायापर्यंत आच्छादित करावे वस्त्राच्या दशा पश्चिमेकडे असाव्या व बांधताना पायाचें तळवें उघडें असावे (बाकीचे वस्त्र प्रेताच्या मुलानीं स्वीकारावें) ह्याचप्रमाणें यथायोग्य विधि येथेंही करावे ॥ २५ ॥

**निगुल्फं बर्हिराज्यंच ॥ १६ ॥**

पुष्कळ दर्भ व तूप प्रेतविधीकरिता सिद्ध असावें ॥ १६ ॥

**दधन्यत्र सर्पिरानयन्त्येतत्पित्र्यं पृषदाज्यम् ॥ १७ ॥ ॥ १ ॥**

येथे, वरून 'निगुल्फ' पदाची अनुवृत्ति आहे आणखी दह्यात तूप ओतून तयार केलेलें पितृकर्मोपयोगी पृषदाज्यही पुष्कळ तयार असावें. 'अत्र' ह्या अधिकपदाने, सब प्रेतकृत्यात ह्याच पृषदाज्याचा उपयोग ज्ञापित होतो. त्यामुळें वरच्या उताऱ्यातल्या वैचित्र्यमतानें प्रेतागास चोळ

ण्यासही ह्याच पृषदाज्याचा उपयोग करावा, असे ठरते. 'पित्र्यं' पदानें ह्या प्रेतकर्मालाही पितृकर्म अशी संज्ञा सूचित केल्यामुळे, हेंही कर्म पितृकार्यप्रमाणेंच आग्नेय्यभिमुख व प्राचीनावीतानें होतें. बौधायनानें देखील **'किमु खलु प्राचीनावीतिना पितृमेधः कार्यः यज्ञोपवीतिनाचेति प्राचीनावीतिनेत्येव ब्रूयान्निवीतिनस्त्वेवैनं वहेयुः'** ह्या वाक्यांनीं, प्राचीनावीती होऊन पितृमेध करावा. मात्र प्रेतवहन निवीती होऊन करावें असें स्पष्ट म्हटलें आहे. आग्नेयी दिशाच पितराची पूर्व आहे, असेंही त्यानें म्हटलें आहे असो. येथें चवथ्या अध्यायाची पहिली कंडिका संपली. हिच्यात एकदर १७ सूत्रें आहेत. ॥ १७ ॥ ॥ १ ॥

## अध्याय ४ था—कण्डिका २ री.

**अथैतां दिशमग्नीन्नयन्ति यज्ञपात्राणि च ॥ १ ॥**

नंतर त्या स्मशानभूमीकडे त्या अग्निहोत्र्याचे तीनही अग्नि ( गार्हपत्य, आहवनीय व दक्षिणाग्नि ) व यज्ञपात्रें, बांधवांनीं घेऊन जावें. ॥ १ ॥

**अन्वञ्चं प्रेतमयुजोऽमिथुनाः प्रवयसः ॥ २ ॥**

त्यांच्या मागोमाग, विषमसंख्याक व वयोवृद्ध अशा मडळींनीं प्रेतास घेऊन जावें. स्त्रिया व पुरुष ह्यांचे घोळके वेगवेगळे चालावे; मिश्र होऊं नयेत. येथें 'अन्वञ्च' ( मागून ) असा विशेष नियम सांगितल्यामुळें वरच्या त्रिकींत अनियम ठरतो; त्यामुळें अग्नि किंवा यज्ञपात्रें ह्यापैकीं काहींही अगोदर नेऊन दुसरे त्यामागून नेल्यास चालतें ॥ २ ॥

**पीठचक्रेण गोयुक्तेनेत्येके ॥ ३ ॥**

कोणी आचार्य, बैल जोडलेला गाडा वगैरेतून प्रेत न्यावें असे म्हण-

तात हल्लीं तिरडीवर बांधून, माणसेंच बहुधा प्रेताला वाहून नेत असतात ॥ ३ ॥

**अनुस्तरणीम् ॥ ४ ॥**

येथेंही मध्यमणिन्यायानें 'एके' ( कांहीं लोक ) ह्या पदाचा संबंध येतो त्यामुळे, अनुस्तरणी नावाचा स्त्रीलिंगी पशूही प्रेतामागून न्यावा असे काही लोक म्हणतात, असा सूत्रार्थ होतो त्यामुळे अनुस्तरणी अनित्य ठरते कात्यायनानेही ' न वाऽस्थिसंदेहात् ' म्हणजे अस्थिसंचयनाचे वेळीं, प्रेताच्या अस्थि कोणत्या व अनुस्तरणीच्या अस्थि कोणत्या असा संशय पडतो म्हणून अनुस्तरणी नेऊच नये, असें म्हटलें आहे ' अनुस्तीर्यते ' म्हणजे प्रेताच्या मागून चितेवर पसरली जाणारी पशुस्त्री, ती अनुस्तरणी होय ॥ ४ ॥

**गाम् ॥ ५ ॥**

*अनुस्तरणी गाय असावी ॥ ५ ॥*

**अजा वैकवर्णाम् ॥ ६ ॥**

किंवा कोणत्यातरी एकाच रंगाची शेळी अनुस्तरणी असावी ॥ ६ ॥

**कृष्णामेके ॥ ७ ॥**

कोणी काळीच शेळी घ्यावी अशी इच्छा करतात ॥ ७ ॥

**सव्ये बाहौ बद्ध्वाऽनुसंकालयन्ति ॥ ८ ॥**

त्या अनुस्तरणी पशूच्या, पुढच्या पायांपैकीं डाव्या पायास दोरी बांधून प्रेताच्या मागून, ओढून ओढून नेतात ॥ ८ ॥

**अन्वञ्चोऽमात्या अधोनिवीताः प्रवृत्तशिखा ज्येष्ठप्रथमाः कनिष्ठजघन्याः ॥ ९ ॥**

ह्या सूत्रांत ' गच्छेयु ' ( जावें ) असा शेष आहे प्रेताच्या मागून, बांधवांनीं, वरचें वस्त्र न पांघरता व जानवें माळेसारखें गळ्यात घालून

ठेवून वयोमानाप्रमाणें वडील वडील पुढें व धाकटे धाकटे मागें, ह्या क्रमानें जावें. ॥ ९ ॥

**प्राप्यैवं भूमिभागं कर्तोदकेन शमीशाखया त्रिः प्रसव्यमायतनं परिव्रजन्प्रोक्षत्यपेतवीतविचसर्पतात इति ॥ १० ॥**

ह्याप्रमाणें दहनभूमीवर गेल्यावर, प्रेतसंस्कार करणारानें 'अपेतवीत विच०' ही ऋचा (स० ७६।१९५) म्हणून व पूर्वोक्त खड्डयासभोंवतीं डाव्या हातानें (प्रदक्षिणेच्या उलट) फेरी घालून, शमीच्या डहाळीनें त्या खड्डयाचें प्रोक्षण करावें. ह्याप्रमाणें तीनदा करावें प्रत्येक फेरीला मंत्रावृत्ति करावी. 'कर्तोदकेन' ह्याच्या जागीं 'गर्तोदकेन' असा पाठ कोणी करतात. त्याचा अर्थ, मोठा खड्डा खणताना आहवनीय ठेवण्याच्या जागेच्या ईशान्य दिशेस गुडघ्याइतका खोल खड्डा खणून त्यात पाण्यातील नीळ व शेवाळ (अवका शीपाल) घालून पाणी ओतावें (गृ० ४।४।८ पहा) त्या पाण्यानें हे प्रोक्षण करावें. ॥ १० ॥

**दक्षिणपूर्व उद्धृतान्त आहवनीयं निदधाति ॥ ११ ॥**

दहनगर्तेच्या आग्नेय कोपऱ्यावर (कोणाच्या मते बाहेर) आहवनीय अग्नि ठेवावा. 'उद्धृतान्ते निदधाति' (खणलेल्याच्या कडेवर किंवा बाहेर ठेवावा), ह्या दोन पदाची अनुवृत्ति पुढच्या दोन सूत्रात आहे ॥ ११ ॥

**उत्तरपश्चिमे गार्हपत्यम् ॥ १२ ॥**

खड्डयाच्या वायव्य कोपऱ्यास गार्हपत्याग्नीची स्थापना करावी. ॥१२॥

**दक्षिणपश्चिमे दक्षिणम् ॥ १३ ॥**

आणि त्या खड्डयाच्या नैऋत्य कोपऱ्यावर दक्षिणाग्नि ठेवावा. ॥ १३ ॥

**अथैनमन्तर्वेदीध्मचितिं चिनोति यो जानाति ॥ १४ ॥**

सूत्रातल्या ' अथ ' पदानें, ह्या ठिकाणीं आणखी कांहीं कर्मशेष सूचित होतो. त्यामुळें ह्यावेळीं, चमसानें प्रणीता ( उदक ) आणून तत्र-रहितच ठेवाव्या. कारण पुढें ( गृ. ४।३।२४ ) अनुमंत्रण सांगितलें आहे. तसेच ही देखील इष्टीच असल्यामुळे त्या खाड्याच्या मध्यभागीं, सुवर्णाचे खड टाकून तीळही फेंकावे. हा आचार करावा. आता सूत्रार्थ लिहितो ह्या कृत्यानंतर जो कोणी रचण्यांत कुशल असेल त्यानें, खाड्याच्या ( वेदि ) मध्यभागीं, लाकडाची चिता ( सरण ) रचावी. 'एन' ( त्यानर ) ह्या पदानें पुढें प्रेतावरचीं लाकडेंहि त्यानेंच रचावीं हें सुचविले आहे ॥ १४ ॥

**तस्मिन्बर्हिरास्तीर्य कृष्णाजिनं चोत्तरलोम तस्मिन्प्रेतं संवेशयन्त्युत्तरेण गार्हपत्यं हृत्वाहवनीयमभिमुखशिरसम् ॥ १५ ॥**

त्या खालच्या चितेवर ( काष्ठशय्या ) दर्भ पसरून त्यावर काळे हरणाचे कातडें, वर केस करून आथरावे. नंतर बांधवानीं गार्हपत्याच्या उत्तरेकडून प्रेतास नेऊन आहवनीयाजवळ डोकें येईल अशा रीतीनें चितेवर निजवावा ॥ १५ ॥

**उत्तरतः पत्नीम् ॥ १६ ॥**

प्रेताच्या उत्तरेस चितेवर, त्याच्या पत्नीस निजवावी. येथपर्यंत कृत्य, ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य तिघांनाही सारखेंच आहे ॥ १६ ॥

**धनुश्च क्षत्रियाय ॥ १७ ॥**

क्षत्रियाचें शव असल्यास, त्याच्या उत्तरेस त्याचें धनुष्यही ठेवावे ॥ १७ ॥

**तामुत्थापयेद्देवरः पतिस्थानीयोऽन्तेवासी जरद्दासो वोदीर्ष्व नार्यभिजीवलोकमिति ॥ १८ ॥**

त्या पत्नीला तिच्या पत्नीच्याच ( पालक ) जागीं असलेल्या दिरानें किंवा प्रेताच्या शिष्यानें अथवा त्याचीच नोकरी करीत म्हातारा

झालेल्या दासानें, (शूद्र), 'उदीर्ष्व नार्यभि०' सं० (७।६।२७) हा मंत्र म्हणून उठवावी. ह्यावरून पत्नीचें चितारोहण फक्त संस्कारार्थच असून सहाग्निप्रवेशाचा प्रचार मागून केव्हांतरी इतर स्मृतींवरून पडला असावा असें वाटते. 'पतिस्थानीयः' ह्या पदावरून पति जवळ नसतां, तत्कर्तृक पुंसवनादिक स्त्रीसंस्कार, दिराने करावे असे ज्ञापित होते॥ १८॥

**कर्ता वृषले जपेत्॥ १९॥**

जीर्णदास शूद्र असल्यामुळे, त्याला मंत्रपठनाचा अधिकार नाहीं म्हणून त्याने पत्नीस उठविल्यास 'उदीर्ष्व०' हा मंत्र, दहनसंस्कार करणाराने जपावा॥ १९॥

**धनुर्हस्तादाददानो मृतस्येति धनुः॥ २०॥**

'धनुर्हस्तात्०' (सं० ७।६।२७) ही ऋचा म्हणून, वरच्याच दीर, शिष्य किंवा जरद्दास ह्यानीं प्रेताजवळचे धनुष्य उचलून घ्यावे. ॥ २०॥

**उक्तं वृषले॥ २१॥**

शूद्रानें धनुष्य उचलल्यास काय करावे ते वर १९ व्या सूत्रात सांगितलेच आहे. म्हणजे कर्त्याने मंत्र जपावा॥ २१॥

**अधिज्यं कृत्वा संचितिमचित्वा संशीर्यानुप्रहरेत्॥ २२॥**

तें धनुष्य सज्ज करून व मोडून वर लाकडे ठेवण्यापूर्वी, शवाच्या उत्तरेसच ठेवावें. धनुष्याचा संस्कार मात्र क्षत्रियाला विशेष आहे. बाकी सर्व, त्रैवर्णिकाना सारखेंच आहे. येथे ह्या अध्यायाची दुसरी कंडिका संपली. हिच्यात एकंदर सूत्रें बावीस आहेत॥ २२॥ ॥ २॥

## अध्याय ४ था—काण्डिका ३ री.

### अथैतानि पात्राणि योजयेत् ॥ १ ॥

अथशब्दानें, येथें शाखान्तरोक्त अधिकर्म सूचित केलें आहे त्यामुळें, प्रेताच्या नाक, कान, डोळे व मुख ह्याच्या सप्तच्छिद्रात सुवर्णरज किंवा घृत घालून, प्रेतावर घृतमिश्रित तीळ टाकावे. नतर पुढें लिहिल्याप्रमाणे त्याच्या अगावर यज्ञपात्रें लावावीं पात्रें प्रवृत्तियाग–निमित्तक व निवृत्तियाग–निमित्तक अशीं दोन प्रकारचीं असतात सर्वांगाच्या उपदेशाने युक्त, तो प्रवृत्तियाग होय असो, ह्यापैकीं पहिलीं म्हणजे प्रवृत्तियागाचीं पात्रें, अग्निहोत्र्याने यावज्जीव बाळगायचीं असतात, व दुसरीं नैवृत्तिक पात्रे वरुणप्रघासादि निवृत्ति सपल्यावर लागलीच त्याचा त्याग होतो परतु निवृत्तियाग चालू असताच देहावसान झाल्यास, प्रावृत्तिक व नैवृत्तिक अशा दोन्ही पात्राचे सयोजन करावें लागते, नाहींतर फक्त प्राकृतिकाचेंच सयोजन होतें ॥ १ ॥

पुढें येणाऱ्या पात्राची विशेष माहिती, श्रौतसूत्रात समजेल

### दक्षिणे हस्ते जुहूम् ॥ २ ॥

प्रेताच्या उजव्या हातावर जुहू ( एकप्रकारची स्रुचा ) ठेवावी, निवृत्तियागात मृत असता, दोन्ही जुहू ठेवाव्या एकवचन जात्यभिप्रायानें आहे ॥ २ ॥

### सव्य उपभृतम् ॥ ३ ॥

डाव्या हातावर, उपभृत् ठेवावें किंवा ठेवावीं. एकवचनाचा अभिप्राय वरच्या सूत्राप्रमाणेच आहे ॥ ३ ॥

### दक्षिणे पार्श्वे स्फ्यं, सव्येऽग्निहोत्रहवणीम् ॥ ४ ॥

उजव्या कुशीवर स्फ्य व डाव्या कुशीवर अग्निहोत्रहोमाची पात्री ठेवावी ॥ ४ ॥

**उरसि ध्रुवां शिरसि कपालानि दत्सु ग्राव्णः ॥ ५ ॥**

प्रेताच्या छातीवर ध्रुवा, डोक्यावर पुरोडाशाचीं कपाळें ( खापऱ्या ) व दातावर ग्रावें ( सोम कुटण्याचे दगड ) ठेवावें. सोमयागात मग्न असता, ग्रावसयोजन समजावें, नाहींतर अवभृथाच्या वेळेस त्याचा त्याग होतो ह्यावरून सोमयाजी व अग्निचित् ह्याचाही संस्कार ह्याच सांगितल्या जाणाऱ्या सूत्राप्रमाणें करावा असा आश्वलायनाचा अभिप्राय आहे. त्यामुळे **'बह्वल्पं वा स्वगृह्योक्तं'** ह्या वचनानुसार हाच विधि करावा. इतर शास्त्रोक्त **'पेषणान्तं सोमयाजिनः चित्यन्तमग्निचितः'** वगैरे वगैरे जास्त विधि करूं नये ॥ ५ ॥

**नासिकयोः स्रुवौ ॥ ६ ॥**

दोन्ही स्रुव दोन नाकपुड्यावर ठेवावे. द्विवचन विवक्षीस अनुलक्षून आहे. ॥ ६ ॥

**भित्त्वा चैकम् ॥ ७ ॥**

एकच स्रुव असल्यास मोडून दोन नाकपुड्यावर दोन तुकडे ठेवावे. ॥ ७ ॥

**कर्णयोः प्राशित्रहरणे ॥ ८ ॥**

प्राशित्रहरणें, दोन्ही कानावर ठेवावीं. ॥ ८ ॥

**भित्त्वा चैकम् ॥ ९ ॥**

प्राशित्रहरण एकच असल्यास, दोन तुकडे करून दोन्ही कानावर ठेवावे. ॥ ९ ॥

**उदरे पात्रीम् ॥ १० ॥**

हविर्द्रव्ये ठेवण्याची पात्री, पोटावर ठेवावी. ॥ १० ॥

**समवत्तधानं च चमसम् ॥ ११ ॥**

ज्यात अवत्त इडा ( हुतद्रव्यशेष ) ठेवतात तो चमसही पोटावरच ठेवावा. ॥ १२ ॥

**उपस्थे शम्याम् ॥ १२ ॥**

प्रेताच्या गुह्येन्द्रियावर, शम्या ठेवावी ॥ १२ ॥

**अरणी ऊर्वोः, उलूखलमुसले जङ्घयोः ॥ १३ ॥**

दोन्ही माड्यावर दोन्ही अरणी ठेवाव्या, व दोन्ही पोटर्‍यावर उखळी व मुसळ क्रमानें ठेवावे ॥ १३ ॥

**पादयोः शूर्पे ॥ १४ ॥**

दोन्ही पायावर सुपें लावावीं द्विवचन विकृतिकरिता आहे ॥ १४ ॥

**छित्त्वा चैकम् ॥ १५ ॥**

एकच सूप असल्यास दोन तुकडे करून लावावे ॥ १५ ॥

**आसेचनवन्ति पृषदाज्यस्य पूरयन्ति ॥ १६ ॥**

ज्या पात्राना बोंडे (बिळे) असतील, त्याच्यात पृषदाज्य भरून नतर प्रेतावर लावावी. 'पूरयन्ति' हे बहुवचन पात्रयोजनेच्या कर्त्याचा अमुकच असावा असा निश्चय नाहीं, हें सुचवितें नाहींतर एकटा कर्ता पात्रयोजन करताना दमून जाईल. ॥ १६ ॥

**अमा पुत्रो दृषदुपले कुर्वीत ॥ १७ ॥**

प्रेताच्या मुलानें पाटा व वरवटा (सोमरस काढायचे), आपल्या उपयोगाकरिता ठेवावे अर्थात् घरून स्मशानात आणूही नये. ॥ १७ ॥

**लौहायसं च कौलालम् ॥ १८ ॥**

कारागिरानीं बनविलेलीं ( कौलाल ) ताम्र वगैरे धातूचीं पात्रें अथवा लोखंडी हत्यारें व कुंभारानें केलेलीं मृत्पात्रें वगैरेही मुलानें आपल्या उपयोगाकरिता ठेवावीं बाकीच्या सर्व यज्ञसाधनाची योजना करावी. ॥ १८ ॥

**अनुस्तरण्या वपामुत्खिद्य शिरोमुखं प्रच्छादयेदग्नेर्वर्म परिगोभिर्व्ययस्वेति ॥ १९ ॥**

अनुस्तरणी अमल्यास तिची वपा काढून तिने, 'अग्नेर्वर्म०' ही ऋचा (ऋक्सं० ७६।२१) म्हणून, प्रेताचें डोकें व तोंड आच्छादित करावें ॥ १९ ॥

**वृक्का उद्धृत्य पाण्योरादध्यादतिद्रवसारमेयौ श्वानाविति दक्षिणे दक्षिणं सव्ये सव्यम् ॥ २० ॥**

तिच्या दोन्ही वृक्का( हृदयाच्या दोन्ही बाजूचे मोठे मांसपिण्ड) काढून, प्रेताच्या दोन्ही तळहातावर क्रमानें ठेवाव्या, म्हणजे उजव्या हातावर उजवी व डाव्या हातावर डावी वृक्का (वृक्क) ठेवावी. प्रत्येकाच्या स्थापनेपूर्वी, 'अतिद्रवसारमेयौ' (ऋक्सं ७६।१५ ) ही ऋचा म्हणावी. ॥ २० ॥

**हृदये हृदयम् ॥ २१ ॥**

अनुस्तरणीचे हृदय काढून प्रेताच्या हृदयावर अमवरच ठेवावे ॥ २१ ॥

**पिण्डौ चैके ॥ २२ ॥**

कांहीं आचार्य म्हणतात, हातावर वृक्काशिवाय दोन सक्तुपिंडीही ठेवाव्या कोणी पिंडीशब्दाचा अर्थ भाताचा पिंड असा करतात. ॥ २२ ॥

**वृक्कापचार इत्येके ॥ २३ ॥**

वृक्काचा अभाव असताच पिण्डी ( सक्तु किंवा भाताचे पिंड) ठेवाव्या. वृक्काचा अभाव असनाच पिण्डी ( सक्तु किंवा भाताचे पिंड) ठेवाव्या.

वृक्काचा अभाव असताच पिण्डी ( सक्तु किंवा भाताचे पिंड) ठेवाव्या. दोघांचा समुच्चय नाहीं असे कांहीं म्हणतात ह्यावरूनही अनुस्तरणी अनित्य ठरते जर ती नित्य असती तर वृक्काचा अभाव न समजता. **'अथ यदानुस्तरणी नास्ति तदा सक्तुहर्वाऽपि तत्स्थाने कुर्यात्'** म्हणजे अनुस्तरणी नसल्यास तिच्या जागीं सक्तुद्रव्य घ्यावे असे कात्यायनानेंही म्हटले आहे. वरचे पिंडीपद उपलक्षणार्थच असल्यामुळे,

सर्वच दृश्य अनुस्तरणी नसता सक्तूंनीं करावें असें हे मत आहे त्यामुळे त्यांबद्दल धारणा ठेवाना, वृक्कांबद्दल सक्तुगोल्क ठेवावे, व दुसरेही हदया दितुल्य अवयव पिठाचेच करून वर ठेवावे हल्लीं सक्तूबद्दल गव्हाची कणीकही घेण्याचा प्रचार आहे प्रेतविधीला अधिक बीभत्स व भयानक स्वरूप यऊ नये म्हणून हा अनुस्तरणीचा प्रचार सूत्रकालापासूनच कमी होत जाऊन हल्लीं पार नाहींसा झाला आहे हल्लीं मृताच्या उद्देशाने गाई किंवा बैल मोकाट ( वृषोत्सर्ग ) सोडून देण्याचा प्रचार मात्र, कोठें कोठे चालू आहे ॥ २३ ॥

**सर्वां यथाङ्गं विनिक्षिप्य चर्मणा प्रच्छाद्येममग्ने चमस मा विजिह्वर इति प्रणीताप्रणयनमनुमन्त्रयते ॥ २४ ॥**

नतर अनुस्तरणीचे चर्म काढून तिचे पाय वगैरे अवयव प्रताच्या पाय वगैरेवर येतील अशा रीतीनें तिचे सर्वच शरीर, प्रेतावर ठेवून वर, तिच्या कातड्याने आच्छादन करावें, व पूर्वी आणून ठेवलेल्या प्रणीता चमसाचें, ' इममग्न चमस मा० ' ( ऋक्म० ७।६।२१ ) ह्या मत्राने अनुमत्रण करावें ॥ २४ ॥

**सव्य जान्वाच्य दक्षिणाग्नावाज्याहुतीर्जुहुयादग्नये स्वाहा, कामाय स्वाहा, लोकाय स्वाहाऽनुमतये स्वाहेति ॥ २५ ॥**

नतर कर्त्याने, डावा गुडघा भुइवर टकून दक्षिणाग्नीवर ' अग्नये स्वाहा ' वगैरे चार आ याहुति द्याव्या प्रत अग्निहोत्री नसल्यास, त्याच्या औपासनाग्नीवरच आहुति द्याव्या गुडघा टेकतानाही मांडीचा वरचा सपाट भाग, वरच ( उताणा ) दिसला पाहिजे असा टेवावा कारण उपस्थोत्तानता ( मांडी उताणी) नसल्यास, सूत्रकारांनीं दोष सांगितला आहे 'आज्याहुति' हें पद, इतर तत्राची निवृत्ति सूचित करते येथे होमाकरिता नवा

सुरु करावा. कारण नेहमींचा, प्रेताच्या नांवावर ठेवावा असें पूर्वी सांगि-तलें आहे. ॥ २५ ॥

**पञ्चमीमुरसि प्रेतस्यास्माद्वै त्वमजायथा अयं त्वदधिजायता-ममौ स्वर्गाय लोकाय स्वाहेति ॥ २६ ॥**

'अस्माद्वै' वगैरे स्वाहान्त मंत्र म्हणून पांचवी आहुति प्रेताच्या उरा-वर द्यावी. 'पञ्चमी' ह्या पदानें ही आहुति देखील गुडघा टेकूनच द्यावी असें ज्ञापित होतें. 'प्रेतस्य' हें अधिक पद, स्मृतींत ज्या ज्या प्रेताचें दहन उक्त असेल त्याचे वेळींही ह्याच प्रकारानें दहन होतें असें सूचित करतें. विशेष फरक पुढें येईलच. असो. वरच्या मंत्रांतल्या असौ पदाच्या जागीं देवदत्त, गोविंद वगैरे प्रेताचें संबोधनान्त नांव उच्चारावें. येथें ही २६ सूत्राची ३ री कंडिका संपली. ॥ २६ ॥ ॥ ३ ॥

## अध्याय ४ था——कण्डिका ४ थी.

**प्रेष्यति युगपदग्नीन्प्रज्वालयतेति ॥ १ ॥**

नंतर अर्थात् प्राप्त झालेली वरची चिता रचून, एकदम तिन्ही अग्नि प्रज्वलित करा अशी मदतनीस मंडळींना सूचना द्यावी व त्यांनीं लगेच तसें करावें. ॥ १ ॥

**आहवनीयश्चेत्पूर्वं प्राप्नुयात्स्वर्गलोक एनं प्रापदिति विद्याद्रा-स्यत्यसावमुत्रैवमयमस्मिन्निति पुत्रः ॥ २ ॥**

त्या तीन अग्नींपैकीं आहवनीयाग्नि, जर प्रथम अग्निहोत्र्याच्या (प्रेत) शरीरास स्पर्श करील तर त्या अग्नीनें त्याला स्वर्गलोकास नेलें असें समजावें; व त्याचप्रमाणें त्याच्या मुलास ह्या लोकामध्यें उत्तम ऐश्वर्य मिळेल, असें समजावें ही अग्नीची पूर्वप्राप्ती, पूर्वीच्याच कर्मानें मिळणाऱ्या

समृद्धीची, फल मुलास आहे असे समजावें. अशीच पूर्वप्रमाणें फळ समृद्धिप्राप्ती नाहीं. ॥ २ ॥

**गार्हपत्यश्चेत्पूर्वं प्राप्नुयादन्तरिक्षलोक एनं प्रापदिति विद्याद्रा-स्यत्यमावमुत्रैवमयमस्मिन्निति पुत्रः ॥ ३ ॥**

गार्हपत्याग्निच प्रथम प्रेतास लागेल तर, त्या अग्नीनें प्रेतास अन्तरिक्ष लोकास नेलें असें समजावें; व त्याचप्रमाणें त्याच्या मुलास हा लोकीं मध्यमैश्वर्य प्राप्त होईल असें समजावें. ॥ ३ ॥

**दक्षिणाग्निश्चेत्पूर्वं प्राप्नुयान्मनुष्यलोक एनं प्रापदिति विद्याद्रा-रस्यत्यमावमुत्रैवमयमस्मिन्निति पुत्रः ॥ ४ ॥**

दक्षिणाग्नि जर प्रथम प्रेतास लागेल, तर तो प्रेत, लौकरच ह्या मनुष्यलोकांत जन्म घेऊन विपुलान्नादिकानें युक्त होईल व त्याच्या मुला-लाही येथें त्याप्रमाणे पुष्कळ अन्नाची प्राप्ति होईल असें जाणावें. ॥ ४ ॥

**युगपत्प्राप्तौ परामृद्धिं वदन्ति ॥ ५ ॥**

सर्व अग्नि एकदमच प्रेतास स्पर्श करतील तर, त्या अग्निहोत्र्याला श्रेष्ठस्थानीं परमैश्वर्य मिळेल व त्याचप्रमाणें मुलालाही ह्यालोकीं परमसंपत्ती मिळते असें वेदवेत्ते पुरुष म्हणतात ॥ ५ ॥

**तं दह्यमानमनुमन्त्रयते प्रेहि प्रेहि पथिभिः पूर्वेभिरिति समानम् ॥ ६ ॥**

'तं' पदानें कर्माधिक्य सुचविल्यामुळें, सूचना देऊन प्रेताला पदरानें वारा घालणें, वगैरे लौकिकाचार येथें करावे. नंतर श्रौतसूत्र अध्याय सहा खंड १० मध्यें, प्रेतानुगमनप्रसंगात (मागून जाणें) सांगितलेल्या 'प्रेहि प्रेहि पथिभिः' वगैरे ऋचा–(ऋक्स. ७।६।१५,७।६।२०,७।६ २३,।७।६।२७,८।८।१२,७।६।१६ पहा.) म्हणून, त्या जळणाऱ्या

प्रेताचें अनुमरण करावें. 'प्रेहि प्रेहि' वगैरे पाचांपैकीं तिसरी 'अपेतवीत०' ही गाळावी म्हणजे त्या चारच राहिल्या, 'मैनमग्ने विदह०' वगैरे सहा, 'पूषात्वेतश्च्यावयतु' वगैरे चार, 'उपसर्प०' वगैरे चार, 'सोम एकेभ्य' वगैरे पाच, व 'उरूणसावसुतृप०' ही एक अशा एकंदर चोवीस ऋचा, प्रेतानुमरणाच्या आहेत ॥ ६ ॥

स एवंविदा दह्यमानः सहैव धूमेन स्वर्गं लोकमेतीति ह विज्ञायते ॥ ७ ॥

ह्याप्रमाणें यथाशास्त्र दहनविधिज्ञ पुरुषानें दहन केलेला तो पुरुष, त्या अग्नीच्या धुराबरोबरच स्वर्गलोकाला जातो असें वेदावरून समजतें. ही प्रशंसा, कर्माचें यथार्थ ज्ञान मिळवून तें करावें, असे ज्ञापित करते. काहीं लोक हें दाहप्रकरण अमंगल समजून पढत नाहींत असें गृह्य कारिकांत म्हटलें आहे, व हल्लींचे वैदिकही 'प्रेहि प्रेहि' वगैरे और्ध्वदेहिकोपयोगी संहितामंत्रांचें घरांत पठन न करता, देवालय वगैरेंत ते मंत्र म्हणतात. ह्या मंत्रांना ते 'परे' असें म्हणत असतात परंतु शुभलोक प्राप्त करून देणारा महत्त्वाचा अत्यंमस्कार, अनर्थज्ञ कर्मभ्रष्ट लोकांकडून करविणे योग्य नाहीं, ज्ञानवानांकडूनच व्हावा हें सुचविण्याकरितां, सूत्रकारानें 'ह' हे पद, प्रशंसेच्या पसंतीकरतां घातलें आहे ॥ ७ ॥

उत्तरपुरस्तादाहवनीयस्य जानुमात्रं गर्तं खात्वाऽवकां शीपालमित्यवधापयेत्ततो ह वा एष निष्क्रम्य सहैव धूमेन स्वर्गं लोकमेतीति विज्ञायते ॥ ८ ॥

आहवनीयाच्या ईशान्येस गुडघ्याइतक्या खड्यामध्ये अवकाशीपाल ( पाण्यातील नीळ व शेवाळ ) व पाणी घालून ठेवलें असतें, त्यामध्ये एवढा वेळ त्या अग्निहोत्र्याचा जीव परलोकगमनास योग्य असा अदृश्य

देह धारण करून, संस्काराची वाट पाहात बसला असतो. तो ह्यानंतर बाहेर पडून धुरावरोबरच स्वर्गलोकास जातो, असें श्रुतीवरून समजतें. ॥ ८ ॥

**इमे जीवा विमृतैरावत्रृत्रन्निति सव्यावृतो व्रजन्त्यनवेक्षमाणाः॥९॥**

नंतर कार्याने, 'इमे जीवा विमृतैः०' (ऋक्सं० ७।६।२६) हा मंत्र जपल्यावर, सर्वांनी डाव्या हाताकडे फिरून, पुन्हां मागें न पहातां स्मशानांतून बाहेर पडावें. येथें मायापाश तोडण्याचा उपदेश विवक्षित असावा. ॥ ९ ॥

**यत्रोदकमवहद्भवति, तत्प्राप्य सकृदुन्मज्ज्यैकाञ्जलिमुत्सृज्य तस्य गोत्रं नाम च गृहीत्वोत्तीर्यान्यानि वासांसि परिधाय सकृदेनान्यापीड्योदग्दशानि विसृज्यासत आनक्षत्रदर्शनात् ॥ १० ॥**

ह्यानंतर त्या सर्व बांधवमंडळींनी जेथें पाणी बाहेर वहात नसेल अशा तळें वगैरे जलाशयांत जाऊन, एकच बुचकळी मारावी; व हातांत सर्व समानोदक मंडळींनीं एकेक जलाञ्जलि घेऊन प्रेताचें गोत्र व नांव 'काश्यपगोत्र देवदत्त एतत्ते उदकम्' वगैरे उचारून सोडावा. 'अयुग्मा दक्षिणामुखाः' ह्या स्मृतिवचनावरून हें जलदान दक्षिणेकडे तोंड करून द्यावें असें समजतें. नंतर पाण्याबाहेर येऊन दुसरीं कोरडीं वस्त्रें नेसावीं व पहिलीं भिजलेलीं आपापलीं वस्त्रें एकदांच पिळून उत्तरेकडे दशा करून वाळत टाकावीं. नंतर नक्षत्रदर्शन होईपर्यंत त्या सर्व बांधवांनीं तेथेंच बसावें व नक्षत्रोदयानंतर घरीं जावें. ॥ १० ॥

**आदित्यस्य वा दृश्यमाने प्रविशेयुः ॥ ११ ॥**

रात्रीचें दहन घडल्यास सूर्यमंडलाचें दर्शन झाल्यावर घरांत जावें. तेथपर्यंत जलाशयाजवळ बसावें. ॥ ११ ॥

**कनिष्टप्रथमा ज्येष्टजघन्याः ॥ १२ ॥**

अनुगमनाच्या उलट गृहप्रवेश करावा. म्हणजे वयोमानाने ल्हान ल्हान असतील त्यांनीं आधीं घरात शिरावें व वडील मडळींनीं मागून जावें. ॥ १२ ॥

**प्राप्यागारमश्मानमग्निं गोमयमक्षतांस्तिलानप उपस्पृशन्ति ॥ १३ ॥**

घरात शिरल्यावर सहाण, अग्नि, गोमय, अक्षता, तीळ आणि पाणी ह्यांना स्पर्श करून नतर बसावें. ॥ १३ ॥

**नैतस्यां रात्र्यामन्नं पचेरन् ॥ १४ ॥**

मृताच्या परिवारानीं ह्या प्रथम दिवशीं अन्न शिजवू नये. ॥ १४ ॥

**क्रीतोत्पन्नेन वा वर्तेरन् ॥ १५ ॥**

ह्या दिवशीं विकत घेतलेल्या किंवा आयते आणून दिलेल्या अन्नाने निर्वाह करावा ॥ १५ ॥

**त्रिरात्रमक्षारालवणाशिनः स्युः ॥ १६ ॥**

त्या सर्व सुतकी मडळींनीं तीन दिवस, क्षारलवणरहित व अळणी अशा अन्नाचे सेवन करावे. क्षारलवण, पूर्वीं विवाहप्रकरणात आम्ही सांगितला आहे ( गृह्य सू० १।८।१० पहा ) ॥ १६ ॥

**द्वादशरात्रं वा महागुरुषु दानाध्ययने वर्जयेरन् ॥ १७ ॥**

आई, बाप व उपनयन करून सर्व वेद शिकविणारा ह्या तिघाना महागुरु म्हणतात. ते मृत झाले असता, बारा दिवसपर्यंत दान व अध्ययन वर्ज्य करावें असा एक पक्ष आहे 'वा' ह्या पदाने पुढच्या सूत्रातला पक्षही विकल्पानें आहे, असें सूचित केले आहे. येथे आशौचाचे विधान केलें नाहीं. ते, **'दशाहं शावमाशौचं'** वगैरे स्मृत्यन्तरावरून जाणावे कोणी व्याख्याकार, येथें आशौचाचा ( सूतक ) सक्षेप आहे

असें म्हणतात, परंतु त्यास 'अपरिजातेच' हें पुढें असलेलें २५ वें मंत्र अनुकूल नाहीं. ॥ १७ ॥

## दशाहं सपिण्डेषु ॥ १८ ॥

सपिंड मृत झाला असता, दहा दिवस दानाध्ययने वर्ज करावीं. आई-बापही सपिंडच असल्यामुळे त्यांच्या विषयांत वरच्या सूत्राप्रमाणें बारा किंवा ह्या सूत्राप्रमाणें दहा दिवस वर्ज करावीं. 'दानाध्ययने वर्जयेरन्' ही अनुवृत्ति, पुढें ही कण्डिका सपेपर्यंत आहे. ॥ १८ ॥

## गुरौ चासपिण्डे ॥ १९ ॥

सपिंड नसलेलाही महागुरु (आचार्य) मृत असता दहा दिवस दानाध्ययने वर्जावीं, किंवा पूर्वोक्त १२ दिवस पाळावे. आपल्या वंशापैकीं सात पिढ्यांपर्यंतच्या पुरुषांना सपिंड म्हणतात, त्यापुढें जन्म व नाम माहीत असेपर्यंत वंशजांना समानोदक म्हणतात. परगोत्री गुरु असल्यास सपिंडतेचा प्रश्नच राहात नाहीं ॥ १९ ॥

## अप्रत्तासु च स्त्रीषु ॥ २० ॥

येथें 'दशाह' अशी अनुवृत्ति आहे. आपल्या घरातल्या लग्न न झालेल्या मुली मृत झाल्या असता दहा दिवसच दानादि वर्जावीं. ॥ २० ॥

## त्रिरात्रमितरेष्वाचार्येषु ॥ २१ ॥

वेदाचा एकैकः भाग शिकवणारे इतर गुरु मृत झाले असता, तीनच दिवस दानादिक वर्जावे. ॥ २१ ॥

## ज्ञातौ चासपिण्डे ॥ २२ ॥

आपले सपिंड नसणारे मातुलादि बांधव मृत असता, तीन दिवस दानाध्ययनें करू नये. ॥ २२ ॥

**प्रत्तासु च स्त्रीषु ॥ २३ ॥**

आपल्या घरांतल्या दान ( विवाह ) केलेल्या मुली मृत असतां, तीन दिवस दानादि करूं नये. ॥ २३ ॥

**अदन्तजाते ॥ २४ ॥**

दांत न आलेले मूल मृत असतां त्रिरात्र दानादि वर्जावीं ॥ २४ ॥

**अपरिजातेच ॥ २५ ॥**

असंपूर्ण गर्भ जन्मून मृत झाला असतांही तीन दिवस दानाध्ययनें वर्ज करावीं. ॥ २५ ॥

**एकाहं सब्रह्मचारिणि ॥ २६ ॥**

आपला सहाध्यायी मृत झाला असतां, एक दिवस दानाध्ययन करूं नये. ॥ २६ ॥

**समानग्रामीये च श्रोत्रिये ॥ २७ ॥ ॥ ४ ॥**

आपल्याच गांवात राहणारा कोणी वैदिक मृत झाला असतां एक दिवस, दानादि वर्ज करावे. ह्या गुरु वगैरेंपैकीं ज्याचें मरण शास्त्रांतराप्रमाणें आशौचाला कारण असेल त्याच्या विषयात, दान व अध्ययन दोन्हीं करूं नये. नाहींतर फक्त अध्ययन मात्र वर्जावें. ह्या प्रकरणांत, आशौचसंक्षेप सांगितला आहे असे मानणारे, 'त्रिरात्रमक्षारालवणाशिनः स्युः' 'द्वादशरात्र वा महागुरुषु' 'दानाध्ययने वर्जयेरन्दशाहं सपिण्डेषु' असे सूत्रच्छेद करतात. अग्निहोत्री नसणाऱ्याच्या दाहविधींत, अनुस्तरणी, पात्रयोजन व पृषदाज्य हीं नसून, त्याचें दहन गृह्याग्नीनें होते. नवऱ्यापूर्वी मेलेल्या पत्नीचेही, गृह्याग्नीनेच दहन होतें. नवऱ्यानंतर मेल्यास, कपालाग्नीनें पत्नीचें दहन करावें. अग्नीनें लाल केलेल्या खापरीवर गोवऱ्या वगैरे टाकून उत्पन्न केलेल्या अग्नीला, कपालाग्नि म्हणतात. ह्यानेंच उपनयन झालेल्याचे दहन करावें. उपनयना-

पूर्वी मृत झाल्यास लौकिकाग्नीने दहन होतें. दहनगर्तेच्या वायव्येस अग्नि ठेवून, प्रणीताप्रणन, तिलप्रक्षेपण, आज्याहुति वगैरे कृत्य पूर्ववत् करावें, व एकच अग्नि असल्यामुळे स्वत कर्त्यानेच अग्नि प्रदीप्त करावा; अस्थि सचयनादि इतर कृत्य समानच आहे असें, इतर शाखानुसार वृत्तिकारांनीं लिहिलें आहे. येथें ह्या चवथ्या अध्यायाची ४ थी कण्डिका सपूर्ण झाली. हिच्यामध्ये एकदर सत्तावीस सूत्रें सांगितलीं ॥ २७ ॥ ॥ ४ ॥

## अध्याय ४ था—कण्डिका ५ वी.

**संचयनमूर्ध्वं दशम्याः कृष्णपक्षस्यायुजास्वेकनक्षत्रे ॥ १ ॥**

दहनानतर, दशाहात किंवा त्यानतर कृष्णपक्षातल्या दशमीपुढच्या विषम तिथीस म्हणजे कृष्णैकादशी, कृष्णत्रयोदशी किंवा अमावास्या ह्या तीन दिवसात, ज्यानें एकच नक्षत्राचा बोध होतो अशा नावाच्या नक्षत्रावर सचयन म्हणजे, प्रेताच्या अस्थि जमा करण्याचें कर्म करावें. 'एकनक्षत्रे' ह्या पदानें, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, पूर्वाफल्गुनी, उत्तराफल्गुनी, पूर्वाभाद्रपदा व उत्तराभाद्रपदा ह्या सहा नक्षत्राची निवृत्ति केल्यामुळे, हीं सोडून इतर नक्षत्रावर अस्थिसचयन करावें. दशाहानतर अस्थिसचयाचा पक्ष, सपिंडी कर्तव्य असताच जुळेल, बाराव्या दिवशी सपिण्डी केल्यास जमणार नाहीं, कारण पुढें ८ व्या सूत्रात 'श्राद्धमस्मै दद्यु' ह्या वाक्यानें, ह्या कृत्याच्या शेवटीं एकोद्दिष्टश्राद्ध सांगितलें आहे. त्याचा, सपिंडीनंतर स्पष्ट निषेध आहे. पुढचें शातातपाचें वचन पहा '**यः सपिण्डीकृतं प्रेतं पृथक्पिण्डे नियोजयेत्। विधिघ्नस्तेन भवति पितृहाचोपजायते**' म्हणजे जो नर सपिंडी केलेल्या मृताला वेगळा एकच पिंड देतो, तो त्यामुळें विधिघातक व पितृघातक होतो. ॥ १ ॥

अलक्षणे कुम्भे पुमांसमलक्षणायां स्त्रियमयुजोऽमिथुनाः प्रयसः ॥२॥

अमंगळ अशा कुंभामध्ये पुरुषाच्या व अमंगळ अशा कुंभी—(केळी) मध्ये स्त्रीच्या अस्थि वेचून ठेवाव्या. कुंभीला एका बाजूस स्तन (फुगा) असतो, तसा कुंभाला नसतो. अनुगमनाप्रमाणें अस्थिसंचयासही विषम मनुष्याक, वृद्ध व स्त्रीपुरुषाचे समाज भिन्नभिन्न, अशा मंडळींनीं जावें. ॥२॥

क्षीरोदकेन शमीशाखया त्रिः प्रसव्यमायतनं परिव्रजन्प्रोक्षति शीतिके शीतिकावतीति ॥ ३ ॥

नंतर कर्त्यानें, दहनगर्तेभोंवतीं डाव्या हातानकडून तीन फेऱ्या घालून 'शीतिके शीतिका०' (ऋक्स० ७६।२२।१४) ही ऋचा म्हणून व शमी शाखेवर दुग्धमिश्रित उदक ओतून तिने चितेचें प्रोक्षण करावें प्रत्येक-वेळीं, मंत्रावृत्ति असून मंत्र म्हटल्यावर फिरू लागावें. ॥ ३ ॥

अङ्गुष्ठोपकनिष्ठिकाभ्यामेकैकमस्थ्यसंह्रादयन्तोऽवदध्युः पादौ पूर्वं शिर उत्तरम् ॥ ४ ॥

नंतर जमा करणारानीं आवाज होऊं न देता आंगठा व अनामिका यांमध्ये एकेक हाड धरून हळूच कुंभात ठेवावें पायाचीं अस्थि सर्वां-आधीं ठेवून मस्तकास्थि सर्वांच्या शेवटीं ठेवावीं ॥ ४ ॥

सुसंचितं संचित्य पवनेन संपूय यत्र सर्वत आपो नाभिस्यन्दे-रन्नन्या वर्षाभ्यस्तत्र गर्तेऽवदध्युरुपसर्प मातरं भूमिमेतामिति ॥ ५ ॥

मस्तकास्थि भरल्यावर राख सुपानें पाखडून, बारीक सारीक हाड त्या वर भरावीं नंतर 'अभित आकाशम्०' (गृह्य सू० ४।१।१७) वगैरे मागें सांगितल्याप्रमाणें, अस्थिनिक्षेपाचें स्मशान पाहून तेथे, पावसाळ्याशिवाय इतरकालीं जेथे पाणी शिरणार नाहीं अशा जागीं खड्डा खणून त्यात तो

कुंभ, ' उपसर्प मातरं ' (सं० ७।६।२७) हा मंत्र म्हणून ठेवावा. हा व पुढचेही सर्व मंत्र कर्त्यानेंच म्हणावे. ॥ ५ ॥

उत्तरया पांसूनवकिरेत् ॥ ६ ॥

त्यापुढची ' उच्छ्व(व)ञ्चस्व०' ही ऋचा (ऋक्सं० ७।६।२८।१) म्हणून त्या खड्ड्यावर कुंभाच्या गळ्याइतकी माती लोटावी. ॥ ६ ॥

अवकीर्योत्तराम् ॥ ७ ॥

ह्यानंतर, त्यापुढची ' उच्छ्व(व)ञ्चमाना०' ही ऋचा जपावी. ॥ ७ ॥

उत्ते स्तभ्नामीति कपालेनापिधायाथानवेक्षं प्रत्याव्रज्याप उपस्पृश्य श्राद्धमस्मै दद्युः ॥ ८ ॥ ॥ ५ ॥

नंतर 'उत्ते स्तभ्नामि'० (ऋक्सं० ७।६।२८।३) हा मंत्र म्हणून कुंभाच्या तोंडावर खापर झांकण घालून मातीनें खड्डा भरावा, व तेथून पुन्हा मागें न पाहतां निघून जाऊन सर्वांनीं स्नान करावें; आणि पुढें त्याच दिवशीं त्या मृताच्या उद्देशानें, एकोदिष्ट-विधीनें, श्राद्ध करावें. येथें, ही ५ वी कंडिका संपली. हिच्यांत एकदर ८ सूत्रें आहेत. ॥ ८ ॥ ॥ ५ ॥

## अध्याय ४ था—कण्डिका ६ वी.

गुरुणाभिमृता अन्यतोवाऽपक्षीयमाणा अमावास्यायां शान्तिकर्म कुर्वीरन् ॥ १ ॥

ज्यांचा गुरु मृत झाला असेल किंवा पुत्र, पशु, सुवर्ण वगैरेचा नाश झाला असेल त्यांनीं, अमावास्येच्या दिवशीं पुढें सांगितल्याप्रमाणें शांतिकर्म करावें. त्याविषीं समस्त क्रिया, घरांत वडील असेल त्यानें करावी, व इतर मंडळींनीं जवळ असावें. ॥ १ ॥

पुरोदयादग्निं महभस्मानं महायतनं दक्षिणा हरेयुः क्रव्याद-मग्निं प्रहिणोमि दूरमित्यर्धर्चेन ॥ २ ॥

पहाटेस सूर्योदयापूर्वी, आंतली राख व चूल यांसह पचनाग्नीला (स्वयपाकाचा अग्नि) काढून, 'क्रव्यादमग्निं' (सं. ७ । ६ । २१) वगैरे अर्ध्या ऋचेने, घराबाहेर दक्षिणदिशेस घेऊन जावें. त्रेताग्नि (अग्निहोत्राचे ३ अग्नि) व गृह्याग्नि ह्यांचें यावज्जीव धारण सांगितलें असल्यामुळें, त्यांचा त्याग शक्य नाहीं म्हणून येथें पचनाग्नि असा अर्थ केला ॥ २ ॥

**तं चतुष्पथे न्युप्य यत्र वा, त्रिः प्रसव्यं परियन्ति सव्यैः पाणिभिः सव्यानूरूनाघ्नानाः ॥ ३ ॥**

त्या अग्नीला दक्षिणेस चव्हाठ्यावर, किंवा दुसऱ्या एखाद्या दिशेस कोठेंतरी ठेवून सर्वांनीं डाव्या हातांनीं आपापल्या डाव्या मांडीचे ताडन करीत डाव्या हातानें त्यासभोंवतीं तीन फेऱ्या घालाव्या ॥ २ ॥

**अथानवेक्षं प्रत्याव्रज्याप उपस्पृश्य केशश्मश्रुलोमनखानि वापयित्वोपकल्पयीरन्नवान्मणिकान्कुम्भानाचमनीयांश्च शमीसुमनो-मालिनः शमीमयमिध्मं शमीमय्यावरणी परिधींश्चानडुहं गोमयं चर्म च नवनीतमश्मानं च यावत्यो युवतयस्तावन्ति कुशपिञ्जू-लानि ॥ ४ ॥**

ह्यानतर पाठीमागे न पहाता परत जाऊन स्नान करून; केश, दाढी, लव, नखे ह्यांचें वपन करवावें, व घरामध्ये पाण्याचे रांजण, कुंभ व संध्येचा भांडा नवा तयार करावा. सर्वांनीं शमीपुष्पाच्या माळा धारण कराव्या, आणि शमीच्या पधरा समिधाचा इध्म, शमीच्या दोन नव्या अरणी व शमीचेच तीन परिधी तयार करावे. ह्या शिवाय बैलाचे शेण व कातडे, लोणी, एक शिला व घरांत जेवढ्या तरुणी असतील तेवढ्या दर्भाग्रांच्या कुंचल्या सिद्ध करून ठेवाव्या, इतर शास्त्रात पधरा इध्मसमिधा, ऊर्ध्वसमिद्द्वय, एक अनुयाज-समिध्, व तीन परिधि ( झाडाचा साग्र फोक ) मिळून एकंदर २१

काष्ठें इध्मसन्नहनप्रसंगीं सांगितलीं आहेत, परंतु ह्या आश्वलायनसूत्रांत 'इध्ममुपसमाधाय' 'इध्ममभिधार्य' वगैरे स्थानीं, १५ काष्ठांचाच इध्म घेत असल्यामुळें शास्त्रैक्यामुळे, 'इध्माबर्हिषोश्च सन्नहनम्' वगैरे सर्व ठिकाणीं पञ्चदशदारुकच इध्म घ्यावा. सर्वत्र बह्वृचाचा असाच आचार असून परंपरेचा उपदेशही असाच आहे. ह्याच अभिप्रायानें, सूत्रकारानें पार्वणस्थालीपाकाच्या विधींत, परिधि वगैरेंचा विनियोग सांगितला नसून फक्त 'पञ्चदशेध्मदारूण्यभ्यादधाति' ह्या श्रुतीस अनुसरून इध्माधान मात्र उक्त आहे. दर्शपूर्णमासाचाच अतिदेश स्थालीपाकांत असून स्थालीपाकाचाच अतिदेश सर्व पाकयज्ञांत असतो. आतां, 'एकविंशतिधा समभरामि' अशी दर्शपूर्णमासस्थ सन्नहनमंत्रांत मंत्रा उक्त आहे तिचा विरोध येऊं नये म्हणून तो मंत्र, पाकयज्ञांत म्हणत नाहींत, किंवा 'पञ्चदशधा समभरामि' असा ऊह कांहीं लोक करतात. 'आपो वै रक्षोघ्नी रक्षसामपहत्यै' ह्या श्रुत्यनुसार, प्रणीतापात्रानेंच रक्षोहनन होत असल्यामुळें, त्याकरितां पाकयज्ञांत दर्शपूर्णमासाप्रमाणें परिधि असावे असें म्हणणाराचा पक्ष निरस्त होत आहे. इध्मपदानें २१ काष्ठांचें ग्रहण इष्ट असतें तर, 'परिधींश्च' असें सूत्रकारांना येथें घेतलें म्हणण्याची जरूरी नव्हती. त्या अधिकपदावरून. सर्वत्र पाकयज्ञांत इध्म पञ्चदशदारुकच असतो, परंतु ह्या शान्तिकर्मांत मात्र, पुढें 'इम जीवेभ्य०' (गृ० ४।६।१०) ह्या सूत्रानें विनियोग सांगितला असल्यामुळें, इध्माशिवाय तीन परिधि जास्त सिद्ध करावे. ॥ ४ ॥

अग्निवेलायामग्निं जनयेदिहैवायमितरो जातवेदा इत्यर्धेन ॥५॥

अग्निविहरणाच्या वेळीं म्हणजे अपराह्णीं, 'इहैवायमितरो०' ह्या पुढच्या अर्धर्चानें पूर्वोक्त दर्भांच्या अरणींनीं, अग्नि उत्पन्न करावा हा नवा मथनाग्नि होय. ॥ ५ ॥

ं दीपयमाना आसत आशान्तरात्राद्दायुष्मतां कथाः कीर्तयन्तो माङ्गल्यानीतिहासपुराणानीत्याख्यापयमानाः ॥ ६ ॥

त्या अग्नीला प्रदीप्त करीत, आणि वशानल्या वृद्धपूर्वजाच्या व इतिहासपुराणातल्या मंगलकारक गोष्टी सांगत तेथें घराबाहेरच निःशब्द रात्र होईपर्यंत बसावें ॥ ६ ॥

उपरतेषु शब्देषु संप्रविष्टेषु वा गृहं निवेशनं वा दक्षिणाद्द्वार-पक्षात्प्रक्रम्याविच्छिन्नामुदकधारां हरेत्तन्तुं तन्वन्रजसो भानुमन्विहीत्योत्तरस्मात् ॥ ७ ॥

निःशब्द रात्रीचे वेळीं किंवा त्यापूर्वीही ( ह्यावरून विकल्प ठरतो ) घरची मंडळी उठल्येवर घरात किंवा शयनगृहात शिरली असता, कर्त्यानें 'तंतु तन्वन्' ( स० ८।१।१४।१ ) ही ऋचा म्हणून गृहद्वाराच्या दक्षिणेच्या बाजूपासून उत्तरटोकापर्यंत, अविच्छिन्न उदकधारेचें सेचन करावें हे सेचन शांतरात्रीं किंवा परिवार घरात गेल्यावर अशा दोन वाळीं करावें ॥ ७ ॥

अथाग्निमुपसमाधाय पश्चादस्यानडुहं चर्मास्तीर्य प्राग्ग्रीवमुत्तर-लोम तस्मिन्नमात्यानारोहयेदारोहतायुर्जरसं वृणाना इति ॥ ८ ॥

नंतर कर्त्यानेंच औपासनाग्नि प्रज्वलित करून त्याच्या पश्चिमेस बैलाचे चामडे पूर्वेकडे मान व वरच्या बाजूस केस येतील असे पसरून त्यावर 'आरोहतायुर्जरसं०' ( ऋ० ७।६।२७।१ ) हा मंत्र म्हणून आपल्याशिवाय सर्व स्त्रीपुत्रादि परिवार बसवावा ॥ ८ ॥

इमं जीवेभ्यः परिधिं दधामीति परिधिं परिदध्यात् ॥ ९ ॥

आज्यसंस्कारांत कृत्य करून 'इमं जीवेभ्यः परिधिं०' ( ऋ० ७।६। २६।४ ) हा मंत्र म्हणून अग्नीच्या पश्चिमेस एक परिधि ठेवावा नंतर त्याच्या

दक्षिणेस व उत्तरेस एकेक असे दुसरे दोन्ही परिधि ठवावे परिधि हा एकवचनावरून फक्त पहिलाच परिधि समत्रक ठवावा व दुसरे दोन्ही अमत्रकच ठेवावे असें सिद्ध होते ॥ ९ ॥

**अन्तर्मृत्यु दधतां पर्वतेनेत्यश्मानमित्युत्तरतोऽग्नेः कृत्वा, परं मृत्यो अनु परेहि पन्थामिति चतसृभिः प्रत्यृचं हुत्वा यथाहान्यनुपूर्वं भवन्तीत्यमात्यानीक्षेत ॥ १० ॥**

'अन्तर्मृत्यु दधतां पर्वतेन (ऋ० ७।६।२६) हा पाद म्हणून अग्नीच्या उत्तरेस शिला ठेवावी नंतर आज्यभागान्तकृत्य करून 'परंमृत्यो अनु परेहि०' (ऋ० ७।६।२८) वगैरे चार मंत्रांनी चार आहुति देऊन 'यथाहान्यनु पूर्वं० हा मंत्र म्हणून (ऋ० ७।६।२६।५) आपल्या परिवारास पहावें 'अन्तर्मृत्यु' हा प्रथमपाद नसल्यानें त्यानें, ऋचेचें ग्रहण होत नाही. ॥ १० ॥

**युवतयः पृथक्पाणिभ्यां दर्भतरुणकैर्नवनीतेनाङ्गुष्ठोपकनिष्ठिकाभ्यामक्षिणी आञ्ज्य पराञ्चो विसृजेयुः ॥ ११ ॥**

ह्यानंतर परिवारात ज्या स्त्रिया असतील त्यांना कुशांकुरांनीं (कुचल्या) लोणी घेऊन तें, दोन्ही हातांनी लावून अंगठा व अनामिका (करंगळी जवळचें बोट) ह्यांनीं दोन्ही डोळ्यांत त्याचे एकदम अंजन करून ते दर्भ, मग न पाहता पाठीस टाकून द्यावे टाकल्यानें डाव्या डोळ्यांत व उजव्या हातानें उजव्या डोळ्यांत अंजन करावें ॥ ११ ॥

**इमा नारीरविधवा सुपत्नीरित्यञ्जाना ईक्षेत ॥ १२ ॥**

स्त्रिया अंजन करीत असतां, त्यांच्याकडे 'इमा नारीरविधवा०' ही ऋचा (ऋ० ७।६।२६।२) म्हणून कर्त्यानें पाहावें ॥ १२ ॥

**अश्मन्वती रीयते संरभध्वमित्यश्मानं कर्ता प्रथमोऽभिमृशेत् ॥ १३ ॥**

नतर पूर्वीच अग्नीच्या उत्तरेस ठेवलेल्या पाषाणाला ( अश्मा ) प्रथमत कर्त्याने, 'अश्मन्वती रीयते०' (ऋक्स० १।१४।३) हा मत्र म्हणून स्पर्श करावा, व नतर इतरानीं अमत्रक स्पर्श करावा ॥ १३ ॥

**अथापराजितायां दिश्यवस्थायाग्निनानडुहा गोमयेन चाविच्छिन्नया चोदकधारयाऽऽपोहिष्ठा मयोभुव इति तृचेन परीमे गामनेषतेति परिक्रामत्सु जपेत् ॥ १४ ॥**

ह्यानतर सर्व परिवारस्थ मडळी; अग्नि ( पचन ), बैलाचें शेण व अखडित जलधारा ह्यासह ' आपोहिष्ठा मयो० ' वगैरे तीन ऋचा (ऋक्स० ७।६।५) म्हणून, औपासनाग्निभोवती प्रदक्षिणा करीत असता, कर्त्याने स्वत अग्नीच्या ईशान्यदिशेस उभा राहून ' परीमे गामनेषत० ' ही ऋचा ( स० ८।८।१३।५ ) जपावी ॥ १४ ॥

**पिङ्गलोऽनड्वान्परिणेयः स्यादित्युदाहरन्ति ॥ १५ ॥**

ह्यावेळी पिंगट रगाचा व गाडी ओढण्यास समर्थ असा बैल, त्या अग्नीभोवती फिरवावा असें पूर्वाचार्य म्हणतात नतर स्विष्टकृदादि होमशेष सपवावा ॥ १५ ॥

**अथोपविशन्ति यत्राभिरंस्यमाना भवन्त्यहतेन वाससा प्रच्छाद्य ॥ १६ ॥**

त्यानतर जेथे पसत असेल तेथे, कोरी बैठक पसरून तीवर सर्वांनीं बसावें ॥ १६ ॥

**आसतेऽस्वपन्त ओदयात् ॥ १७ ॥**

तेथेंच सूर्योदय होईपर्यंत झोप न घेता बसून रहावें ॥ १७ ॥

**उदित आदित्ये सौर्याणि स्वस्त्ययनानि च जपित्वान्नं संस्कृत्याऽपनः शोशुचदघमिति प्रत्यृचं हुत्वा ब्राह्मणान्भोज-**

पित्वा स्वस्त्ययनं वाचयीत गौः कंसोऽहतं वासश्च दक्षिणा ॥ १८ ॥ ॥ ६ ॥

पुढे सूर्योदय झाल्यानंतर, पूर्वी प्रत्यवरोहणप्रसंगात ( गृ. २।३ १२ ) सांगितलेली सौर्य व स्वस्त्ययनसूक्तें जपावीं; नंतर अन्न शिजवून त्यानें 'अपन शोशुचत्'० ऋक्स० ( १।७।५ ) ह्या सूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें होम करावा, व त्याच अन्नानें ब्राह्मणांना भोजन देऊन त्यांच्या-कडून स्वस्त्ययन बोलवावें ह्याप्रसंगीं, गाय, पाणी पिण्याचें भांडें व कोरें वस्त्र ही दक्षिणा द्यावी. 'अन्नं संस्कृत्य' ह्या पदानीं आज्यभागान्त कृत्य झाल्यावर त्याअन्नानेंच होम करावा हें सूचित होतें. येथें एकंदर अठरा मंत्रांनी, शांतिकर्म सांगितलेली ही सहावी कंडिका. संपूर्ण झाली ॥ १८ ॥ ॥ ६ ॥

### अध्याय ४ था—कण्डिका ७ वी.

अथातः पार्वणे श्राद्धे काम्य आभ्युदयिक एकोद्दिष्टे वा ॥ १ ॥

गमनीची वैदिक आख्यायिका आहे. ती ह्यापुढें देतों पूर्वी देवाना असुराशीं हजारो वर्षे युद्ध करण्याचा प्रसग आल्यामुळे, त्यानीं आपल्या मुलाना वेदाचे पठण करून रक्षण करण्यास सागितले. पुढें युद्ध सपल्यानतर सर्व वेद विसरून गेलेले देव, आपल्या मुलाकडे येऊन आम्हास तुम्ही वेद शिकवा असें म्हणाले असता, ते म्हणाले ठीक आहे. मुलानो! तुम्हीं ह्याप्रमाणे ब्रह्मचर्यादि व्रत धरून वेदाध्ययनास सिद्ध व्हा, असे शिष्यत्वानें त्याना म्हणाले. पुढें देवानीं त्या आपल्या मुलाजवळ वेदपठन केले, परतु ते वारवार त्याना पुत्र, वत्स, अशीं सबोधने करू लागल्यामुळे त्यानीं प्रजापतीकडे तक्रार केली कीं, आम्हीं ह्याचे जनक बाप असता, ह्यानीं आम्हास वेद शिकविल्यामुळे हे आम्हास पुत्र म्हणून हाक मारतात हें योग्य आहे काय? तेव्हा प्रजापतीनें त्या मुलासारखाच न्याय देऊन म्हटले कीं, जनकपितृत्वापेक्षा, अध्यापकपितृत्वच श्रेष्ठ व चिरस्थायी असल्यामुळें, तुम्हींच त्याचे मुलगे झाला असून अध्यापनामुळे, आज ते तुमचे पितर झाले आहेत. म्हणून त्याना आजपासून पितर अशी सज्ञा प्राप्त झाली असून, वडील नाटा म्हणून मी त्याना आजपासून दक्षिणदिशेचे राज्य देतों व तुम्ही खऱ्या देवानीं उत्तर दिशेस रहावें असें सागून त्याचें भाडण मिटविले. असो, पार्वण म्हणजे पर्वदिवशीं होणारें श्राद्ध होय, पूर्णिमा व अमावास्या अशीं पर्वे २ आहेत. तथापि **'अमावास्यायां पितृभ्यः'** (गोतम) वगैरे स्मृतिवचना वरून व पिण्डपितृयज्ञाशीं ह्याचा व्यतिषग सागितला असल्यामुळे फक्त अमावास्येसच पार्वणश्राद्ध होते. **'पञ्चम्यां पुत्रकामस्य'** वगैरे वचनानुसार कामनाविशेषाने केलें जातें तें काम्यश्राद्ध होय इष्टापूर्तीच्या निमित्ताने करतात त्याला आभ्युदायिक किंवा नादीश्राद्ध म्हणतात फक्त एकाच मृताला उद्देशून दिलें जातें त्याला एकोद्दिष्ट श्राद्ध म्हणतात. पार्वण वगैरे-

मध्ये पिता, पितामह व प्रपितामह हे तीन पितर किंवा अधिक उद्दिष्ट असतात. धर्मभेद सुचविण्याकरतांच ह्यांचीं नावें येथें दिलीं आहेत ॥१॥

**ब्राह्मणाञ्श्रुतशीलवृत्तसंपन्नानेकेन वा, काले ज्ञापितान्स्नातान्कृतपच्छौचानाचान्तादुङ्मुखान्पितृवदुपवेश्यैकैकमेकैकस्य द्वौ द्वौ त्रींस्त्रींन्वा वृद्धौ फलभूयस्त्वं न त्वेवैकं सर्वेषाम् ॥ २ ॥**

आता प्रकृतिभूत पार्वण-श्राद्धाचा प्रकार सांगण्यास सुरवात करतात. स्वाध्याय ( वेद ), सुस्वभाव व विहितकर्माचरण ह्यानीं युक्त किंवा असे न मिळाल्यास ह्यापैकीं कोणत्या तरी एका गुणाने युक्त अशा ब्राह्मणाना स्मृतिप्रोक्त योग्यकाळीं आमंत्रण द्यावें, व कर्माचे वेळीं स्नान करून आलेल्या त्या ब्राह्मणाचे पाय स्वत. धुवून. त्याना आसनावर, उत्तरेकडे तोंड करवून, 'हे माझे पितरच आले आहेत' अशा पूज्य भावनेनें बसवावे. तातादि एकेक पितृव्यक्तीच्या स्थानीं; एकेक, दोन दोन, तीन तीन किंवा त्याहूनही अधिक ब्राह्मण आपल्या शक्तीप्रमाणें बसवावे. कारण जसजशी ब्राह्मणाची वाढ अधिक असेल त्याप्रमाणें, फलही अधिक असतें. यथाशक्ति केलेलें लहान कर्म आणि मोठे कर्म ह्या दोहींचेंही फल अर्थात् सारखें असत नाहीं. परंतु सर्वच पितृगणाच्या जागीं एकच ब्राह्मण कधींही बसवू नये. मनुस्मृतींत **द्वौ दैवे पितृकृत्ये त्रीनेकैकमुभयत्र वा ॥ भोजयेत्सुसमृद्धोऽपि न प्रसज्येत विस्तरे ॥** म्हणजे देवस्थानीं दोन व पितृस्थानीं तीन किंवा दोन्ही जागीं एकेकच ब्राह्मणाला भोजन द्यावें. श्रीमंतानेदेखील श्राद्धाचा अधिक विस्तार करूं नये, असें म्हटलें आहे, त्याचा, **'नत्वेवैकं सर्वेषां'** ह्या वाक्यानें सूत्रकारानें निषेध करून ह्याशिवाय इतर सर्व मनुप्रोक्तविधीस पसंती दर्शविली आहे. त्यामुळें स्मृत्यन्तराप्रमाणें देवस्थानिक ब्राह्मणांनाही भोजन द्यावें असें ठरतें. नाहींतर येथें, आचार्यानें फक्त पित्र्यविधिच सांगितला

आहे. सूत्रात, ब्राह्मणाचा विस्तार जरी आहे, तथापि स्वगृह्योक्त विधि अवश्य कर्तव्य आहे. पुढचे मनुवाक्य पहा. **बह्वल्पं वा स्वगृह्योक्तं यस्य कर्म प्रकीर्तितम् । तस्य तावति शास्त्रार्थे कृते सर्वः कृतो भवेत्'** ॥ आता नारायणीयवृत्तीस अनुसरून सूत्रातले पदाभिप्राय लिहितों. 'ब्राह्मणान्' ह्या पदानें क्षत्रियादिक श्राद्धास उपयोगी नाहींत असें ज्ञापित केलें आहे. 'स्नातान्' त्या वचनानें कोणत्याही कारणानें स्नानरहिताना श्राद्धात भोजन देऊ नये असे सूचित होतें. कोणी स्नात पदाचा अर्थ स्नातक असा करतात किंवा दुसरे कोणी, आपल्या घरीं स्नान घातलेले असा अर्थ करतात. 'कृतपच्छौचान्' हें पद स्वत पादक्षालन करावें असें ज्ञापित करतें. 'आचान्तान्' ह्या पदानें कर्मांगभूत आचमनाचे विधान केलें आहे. त्यामुळें ब्राह्मणानीं भोजनाग व कर्मांग असे दोनदा आचमन करावें सामान्य परिभाषेनें प्राप्त अशा प्राङ्मुखत्वाच्या निवारणा-करता 'उदङ्मुखान्' हें पद आहे. 'पितृवत्' ह्या अधिकपदाचा अभिप्राय बापाच्या जागीं वृद्ध ब्राह्मण बसवावा, आजाच्या जागीं त्याहून वृद्ध व पणजाच्या जागीं त्याहून अधिक वृद्ध बसवावा असा वृत्तिकारानीं काढला आहे. ॥ २ ॥

## काममनाद्ये ॥ ३ ॥

ह्या सूत्राचे अर्थ वृत्तीमध्ये अनेक केले आहेत कोणी म्हणतात त्रयीच्या उद्देशानें होणाऱ्या श्राद्धात पहिले जें सपिंडीश्राद्ध, त्याशिवाय कोणत्याही इतर पार्वणश्राद्धात, इच्छा असल्यास तिघाच्या जागीं एकच ब्राह्मण बसवावा सपिंडींत मात्र वेगवेगळे तीन पाहिजेत, तथापि 'कामम्' ह्या अधिकपदानें हा पक्ष विपत्कालीनच आहे असें सुचविलें आहे. दुसरे म्हणतात, 'अनाद्ये' म्हणजे आद्य जें पार्वणश्राद्ध तद्भिन्नश्राद्धात असा अर्थ करावा. कारण ह्या खडाच्या पहिल्या सूत्रात पार्वणाचाच

प्रथम उल्लेख केला आहे तिसरे म्हणतात, आद्य म्हणजे अन्न ज्यात नाहीं अशा हिरण्यादिश्राद्धात हा पक्ष पाळावा चवथे सांगतात अनाद्य म्हणजे खायला नसल्यास अर्थात् सामर्थ्य नसल्यास हा पक्ष पाळावा एकंदर सर्वच मतीं हा पक्ष (एकब्राह्मणाचा) गौण खरा, असा सूत्रकाराचा अभिप्राय दिसतो **आमैर्वा (धान्यैः) फलमूलैर्वा प्रदानमात्रं, हिरण्येन वा प्रदानमात्रम्** ' असे बौधायनानें श्राद्धाचे प्रतिनिधि (शिधा, फळें, मुळें, दक्षिणा वगैरेचें तत्स्थानीयदान) सांगितले आहेत ॥ ३ ॥

पिण्डैर्व्याख्यातम् ॥ ४ ॥

पित्रादित्रयींपैकीं कोणी जिवत असल्यास, जे पक्ष पिंडपितृयज्ञात श्रौतसूत्रानें सांगितले आहेत तेच ह्या श्राद्धातही आहेत असे जाणावें (श्रौतसू० २।६।१ पहा) ॥ ४ ॥

अपः प्रदाय ॥ ५ ॥

ब्राह्मण बसविल्यानंतर त्याच्या हातावर पाणी घावें सर्व पितृकर्म, प्राचीनावीती होऊन व आग्नेयीकडे तोंड करून करावयाचें असतें ॥ ५ ॥

दर्भान्द्विगुणभुग्नानासनं प्रदाय ॥ ६ ॥

त्याच्या आसनावर, दुहेरी मोडलेले दर्भ, त्यावर बसण्याकरिता द्यावे येथें ' आसन ' ही द्वितीया समर्थ्यार्थी आहे ॥ ६ ॥

अपः प्रदाय ॥ ७ ॥

नंतर ब्राह्मणाच्या हातावर पुन्हा पाणी घावें ॥ ७ ॥

**तैजसाश्ममयमृण्मयेषु त्रिषु पात्रेष्वेकद्रव्येषु वा दर्भान्तर्हितेष्वप आसिच्य शन्नोदेवीरभिष्टय इत्यनुमन्त्रितासु तिलानावपति तिलोऽसि सोमदैवत्यो गोसवे देवनिर्मितः। प्रत्नवद्भिः प्रत्तः स्वधया पितॄनिमाँल्लोकान्प्रीणयाहि नः स्वधा नमः इति ॥ ८ ॥**

एक धातूचें, एक दगडाचें व एक मातीचें अशीं तीन, किंवा तिन्ही एकाच द्रव्याचीं पात्रें, आग्नेयीमस्य ठेवून व दर्भाच्छादित करून त्यामध्यें पाणी ओतावें. नंतर ' शन्नोदेवीरभिष्टय० ' हा मंत्र ( स ७ ६ ५ ४ ) एकवारच म्हणून त्या जलाचें अनुमंत्रण करावें. त्यानंतर 'तिलोसि०' वगैरे 'स्वधानम' पर्यंत सूत्रोक्त मंत्र म्हणून त्या पात्रामध्यें, तीळ टाकावे. प्रत्येक वेळीं मंत्रावृत्ति उक्त आहे. नंतर पात्रामध्यें गंधमाल्यादिक टाकावें ॥ ८ ॥

### प्रसव्येन ॥ ९ ॥

सर्व पितृकार्यें अप्रदक्षिण म्हणजे डाव्या हाताकडून ( डाव्या बाजूला वळणारीं ) करावीं ॥ ९ ॥

**इतरपाण्यङ्गुष्ठान्तरेणोपवीतित्वाद्दक्षिणेन वा सव्योपगृहीतेन पितरिदं तेऽर्घ्यं पितामहेदं तेऽर्घ्यं प्रपितामहेदं तेऽर्घ्यमिति ॥ १० ॥**

येथपासून गंधमाल्यादि देण्यास सुरवात होईपर्यंतचें कृत्य, उपवीती होऊनच करायचें असल्यामुळें, डाव्या हाताच्या पितृतीर्थानें ( अंगुष्ठतर्जनी मध्य) किंवा तो हात शिष्टनिंदित असल्यामुळें, डाव्या हातात धरलेल्या उजव्या हाताच्याच पितृतीर्थानें, 'पितरिद तेऽर्घ्य' वगैरे तीन मंत्रांनीं तीन अर्घ्य, अर्घ्यपात्रात द्यावे. ज्या हातानें कर्म घडत असते त्या बाजूच्या खांद्यावरच यज्ञोपवीत असल्यास प्राचीनावीत होत असते, म्हणून प्राचीनावीताच्या सिद्धीकरितां डावा हात किंवा त्याची मदत येथें, अर्घ्यप्रदानाकरिता सांगितली आहे. ' उपवीतित्वात् ' ह्या पदानें अर्घ्यदानात लौकिकदृष्ट्या उपवीती व्हावें असें सूचित होतें ॥ १० ॥

### अप्पूर्वम् ॥ ११ ॥

हे अर्घ्य देण्याच्या पूर्वीं, दुसरेंही उदक कर्मपरिपूर्णतेकरतां ब्राह्मणाच्या हातावर द्यावें ॥ ११ ॥

**ताः प्रतिग्राहयिष्यन्त्सकृत्सकृत्स्वधा अर्घ्या इति ॥ १२ ॥**

येथें, ' निवेदयेत् ' ( अर्पण करावें ) असा शेष आहे.

त्या दोहींच्याही पूर्वी प्रत्येक व्यक्तीच्या ब्राह्मणांना, एकेकदां एकेक अर्घ्यपात्राचेंच निवेदन, ' स्वधा अर्घ्याः ' असा मंत्र म्हणून करावें. म्हणजे पितृस्थानीं जेवढे ब्राह्मण योजले असतील त्या सर्वांना मिळून एकच अर्घ्यपात्राचें निवेदन करावें. प्रत्येक ब्राह्मणास वेगवेगळें पात्रनिवेदन होत नाहीं. असेंच पितामहादिकांच्या ब्राह्मणांविषयीं समजावें.

येथल्या ' सकृत्सकृत् ' पदांनीं, ह्या निवेदनाशिवाय इतर उदक, अर्घ्य, अर्घ्यमंत्र, गंध वगैरेंची प्रत्येक ब्राह्मणाचे वेळीं वेगवेगळी आवृत्ति करून प्रदान होतें असें ज्ञापित होतें. ब्राह्मणांना उपचारदान करतांना, पदार्थक्रम किंवा काण्डक्रम ( सर्व पदार्थ ) घ्यावा. प्रत्येक व्यक्तीला एकेक ब्राह्मण असल्यास, प्रत्येकास एकेक पात्राचें निवेदन, ' स्वधा अर्घ्याः ' ह्या मंत्रानें करून अन्योदक देऊन त्यानंतर, अर्घ्योदक हातावर देऊन खालच्या पात्रांत सोडावें. सर्व पितृव्यक्तींचा एकच ब्राह्मण असल्यास त्यालाच तीनही पात्रांचें निवेदन व वेगवेगळें उदकदान करून तीन मंत्रांनीं तीन अर्घ्य द्यावे ॥ १२ ॥

**प्रसृष्टा अनुमन्त्रयेत या दिव्या आपः पृथिवी संबभूवुर्या अन्तरिक्ष्या उत पार्थिवीर्याः । हिरण्यवर्णा यज्ञियास्तान आपः शंम्योना भवन्त्विति संस्रवान्समवनीय ताभिरद्भिः पुत्रकामो मुखमनक्ति ॥ १३ ॥**

प्रत्येक ब्राह्मणानें खालच्या पात्रांत अर्घ्योदक सोडल्यावर, या दिव्याः वगैरे भवन्तु पर्यंत वर दिलेल्या मंत्रानें त्याचें अनुमंत्रण करावें. नंतर त्या सर्व पात्रांतलें पाणी प्रथमपात्रांत ( पितृपर्ययात्र ) ओतून एका वाजूस

म्हणजे पितृस्थानीय प्रथम ब्राह्मणाच्या डाव्या हातास नेऊन ठेवावें. कर्ता पुत्रप्राप्तीची इच्छा करीत असल्यास त्यानें, त्यातलें उदक ( अर्घ्यशेष ), आपल्या तोंडास चोळावें; नाहींतर चोळू नये ॥ १३ ॥

**नोद्धरेत्प्रथमं पात्रं पितॄणामर्घ्यपातितम् । आवृतास्तत्र तिष्ठन्ति पितरः शौनकोऽब्रवीत् ॥ १४ ॥ ॥ ७ ॥**

त्या प्रथम पात्रावर तिसरें ( प्रपितामह– ) पात्र झाकण टाळावें. सर्व पितरांचें अर्घ्योदक ओतून ठेवलेलें प्रथमपात्र, श्राद्ध संपेपर्यंत ठेवलेल्या जागेवरून हलवूं नये, कारण त्या पात्रांत तृतीयपात्रानें झाकून ठेवलेले पितृगण रहात असतात, असें सूत्रकाराचे गुरु शौनक महर्षि, ह्यानीं सांगितलें आहे. दुसरे लोक, ' तत्र ' ह्या पदाचा अर्थ त्याने असा करून तें प्रथम पात्रच एका जागीं उपडें टाकून ठेवावें असें म्हणतात. शौनकाचें नाव, त्याच्या सन्मानाकरितां लिहिलें आहे. येथें ह्या अध्यायातली ७ वी कंडिका संपूर्ण झाली. हिच्यांत एकंदर १४ सूत्रें आहेत ॥ १४ ॥

## अध्याय ४ था—कण्डिका ८ वी.

**एतस्मिन्काले गन्धमाल्यधूपदीपाच्छादनानां प्रदानम् ॥ १॥**

ह्यावेळीं ब्राह्मणांना क्रमानें, गंध, माल्य, धूप, दीप व वस्त्रें ह्यांचें दान करावें. प्रत्येक उपचारानंतर उदक द्यावें. ' एतस्मिन्काले ' ह्या पदानें त्यावेळीं फक्त एवढेच पदार्थ द्यावे असें ज्ञापित केल्यामुळें, गोहिरण्य वगैरे दक्षिणा, श्राद्धाच्या शेवटीं स्वधावाचनापूर्वीं देतात. **' दत्त्वा तु दक्षिणां शक्त्या स्वधाकारमुदाहरेत् '** असें स्मृतिवाक्यही आहे ॥ १ ॥

**उद्धृत्य घृताक्तमन्नमनुज्ञापयत्यग्नौ करिष्ये करवै करवाणीति वा ॥ २ ॥**

अग्निहोत्री नसणाऱ्या पुरुषाचा पिंडपितृयज्ञ व पार्वण ह्या दोहोंचा व्यतिषंग ( मिश्रण ) होत असतो. असो; आच्छादनान्त पार्वणविधि झाल्यावर, पिंडपितृयज्ञाच्या स्थालीपाकातून थोडेंसें अन्न काढून घेऊन घृतयुक्त करावें. नंतर 'अग्नौ करिष्ये' असें म्हणून ब्राह्मणाची होमाला परवानगी विचारावी. येथें 'करिष्ये' पदाच्या जागीं करवै किंवा 'करवाणि' हें पदही चालतें ॥ २ ॥

**प्रत्यभ्यनुज्ञा, क्रियतां कुरुष्व कुर्विति ॥ ३ ॥**

नंतर ब्राह्मणानींही उलट 'क्रियतां' 'कुरुष्व' किंवा 'कुरु' ह्या पदानें अनुज्ञा द्यावी. हीं उत्तरें वरच्या 'करिष्ये' वगैरेंच्या क्रमानें आहेत असें वृत्तीत म्हटलें आहे, परंतु सध्या ह्या क्रमाचा नियम चालू नाहीं ॥ ३ ॥

**अथाग्नौ जुहोति यथोक्तं पुरस्तात् ॥ ४ ॥**

नंतर मागें पिंडपितृयज्ञांत सांगितल्याप्रमाणें, 'सोमाय पितृमते०' वगैरे दोन मंत्रानीं मेक्षणानें दोन आहुति द्याव्या. येथल्या अथपदानें होमापूर्वीचें पिंडपितृयज्ञाचें विधान, ह्यापूर्वी केलेलें असावें असें ज्ञापित होतें, त्यामुळें पितृयज्ञ व पार्वणश्राद्ध ह्यांचा व्यतिषंग सिद्ध होतो ॥ ४ ॥

**अभ्यनुज्ञायां पाणिष्वेव वा ॥ ५ ॥**

जेव्हां पिंडपितृयज्ञकल्पाची प्राप्ति नसल्यामुळें अग्नीचाच अभाव असेल तेव्हां, मेक्षणानें किंवा हातानें सर्व ब्राह्मणाच्या उजव्या हातावरच एकेक आहुति थोडथोडी तोडून द्यावी. कोणी आचार्य त्याच मंत्रानीं, प्रत्येक ब्राह्मणाच्या हातावर दोन दोन आहुति द्याव्या असें म्हणतात.

ह्यापक्षीं, ब्राह्मणाच्या उच्छिष्टाजवळ पिंडदान होते. केवळ गृह्याग्नि-मानाच्या पार्वणात दोन कृत्याचा व्यतिक्रम होत असल्यामुळें त्यानें अग्नौ-करणच करावें, पाणिहोम करू नये ॥ ५ ॥

वरच्या पाणिहोमाच्या पक्षाला श्रुतीचें प्रमाण देतात.

**अग्निमुखा वै देवाः पाणिमुखाः पितर इति हि ब्राह्मणम् ॥ ६ ॥**

देवाचें मुख अग्नि असल्यामुळें त्याच्या उद्देशानें करायचा होम अग्नी-वर होतो व पितराचें मुख ब्राह्मणाचा हात असल्यामुळे त्याचा होम पाणीवर होणें योग्यच आहे, कारण असें ब्राह्मणवाक्य आहे ॥ ६ ॥

**यदि पाणिष्वाचान्तेष्वन्यदन्नमनुदिशति ॥ ७ ॥**

जर पाणिहोम केला असेल तर त्या आहुति, ब्राह्मणानीं खाल्ल्यावर त्याच्या पात्रामध्यें भोजनाकरिता दुसरे अन्न वाढावें असा अर्थ, गृह्यभाष्य-कारानीं केला आहे, कारण हा होम ' जुहोति ' शब्दानें सांगितला आहे, (गृ० ४।८।४ पहा ) ' **यच्च पाणितले दत्तं यच्चान्नमुपकल्पितम् । एकीभावेन भोक्तव्यं पृथग्भावो न विद्यते ।**' हा स्मृतिनिषेध, ' ददाति '—शब्दानें होम सांगितलेल्या सपिंडी—श्राद्धामध्यें मात्र आहे. परतु उदीच्य लोक दत्त शब्दाचा अर्थ विधिहुत असा करून ह्या सूत्राचा अर्थ, पाणिहोम झाल्यावर ब्राह्मणानीं त्या आहुति, पात्रावर ठेवून आच मन करावे. नतर त्याच्या पानावर वेगळें अन्न भोजनाकरिता वाढावें, असा करतात अग्नौकरणपक्षाप्रमाणें, पाणिहोमपक्षींही, आहुति व भोज नान्न, ह्याचे मिश्रण होऊ नये असा भाष्यपक्षाचा अभिप्राय आहे. परतु हल्लीं पाणिहुताचें, आधींच वेगळें भक्षण करण्याचा सप्रदाय नाहीं; तथापि कोणी आचमन करीत नाहींत हें योग्य नाहीं, हे लोक आचान्त

शब्दाचा अर्थ आचवलेले असा करतात असे वाटतें; परंतु हें करणें वृत्तिविरुद्ध आहे. पहिल्याभाष्यमतीं, आचमनाची जरूर नाहीं, कारण मनुस्मृतीमध्ये **'अग्न्यभावे तु विप्रस्य पाणावेवोपपादयेत् । यो ह्यग्निः स द्विजो विप्रैर्मन्त्रदर्शिभिरुच्यते ।'** ह्या वचनानें, ब्राह्मणाचें अग्नीशीं साम्य सांगितलें आहे; अग्नौकरणपक्षीं आचमन नाहीं तसेंच येथेंही नाहीं. ह्याच सूत्रात, 'अग्नौ' पदाची अनुवृत्ति आणून व कांहीं पदाची तत्रानें आवृत्ति कल्पून **'अग्नौ यदि अन्यदन्नमनुदिशति'** असें दुसरें सूत्र मानलें पाहिजे. ह्याचा अर्थ अग्नींत होम केल्यास त्यानंतर, ब्राह्मणाना भोजनाकरिता दुसरें अन्न वाढावें ॥ ७ ॥

**अन्नमन्ने ॥ ८ ॥**

हुतशेषान्न, पात्रावर वाढलेल्या भोजनान्नावर वाढावें. अग्निहोम किंवा पाणिहोम ह्या दोन्हीपक्षीं, हें कर्म सारखेंच आहे ॥ ८ ॥

**सृष्टं दत्तमृध्नुकमिति ॥ ९ ॥**

कारण तृप्तीपेक्षाही जास्त वाढलेलें ( पानात राहीसें ) अन्न, समृद्धिकारक आहे इतिशब्द येथें हेतुवाचक असल्यामुळें, पानात कांहीं उष्टें उरेल इतकें वाढावें असें ज्ञापित होतें ॥ ९ ॥

**तृप्ताञ्ज्ञात्वा मधुमतीः श्रावयेदक्षन्नमीमदन्तेतिच ॥ १० ॥**

ब्राह्मण तृप्त झाले आहेत असे समजल्यावर त्याना, 'मधुवाता ऋतायते०' ( म० ७।६।१७ ) वगैरे तीन ऋचा व 'अक्षन्नमीमदन्त' ही एक ( ऋग्म० १।६।४ ) अशा चार ऋचा ऐकवाव्या. 'ज्ञात्वा०' ह्या अधिकपदानें, ह्यापूर्वी भोजन चालू असता आणखीही वेद वगैरेचें अभिश्रवण करावें असें ज्ञापित होतें. पुढचें मनुवाक्यही पहा. **'स्वाध्यायं श्रावयेत्पित्र्ये धर्मशास्त्राणि चैव हि । आख्यानानीतिहासांश्च पुरा-**

णानि खिलानि च ' अर्थ —श्राद्धभोजनकाली, वेद, धर्मशास्त्रें, आख्यानें, इतिहास, पुराणें व वेदपरिशिष्टें, ब्राह्मणाना ऐकवावीं ॥ १०॥

**संपन्नमिति पृष्ट्वा यद्यदन्नमुपभुक्तं तत्तत्स्थालीपाकेन सह पिण्डार्थमुद्धृत्य शेषं निवेदयेत् ॥ ११ ॥**

नतर ' सपन्नम् ' ( झाले काय ? ) असें ब्राह्मणास विचारावें व त्यानीं 'सपन्नम्' असें उत्तर दिल्यावर, जें जें अन्न ब्राह्मणाना वाढलें असेल त्या त्यापैकीं अन्न व स्थालीपाक असल्यास तोही, त्यात मिसळून पिंडाकरिता शिल्लक राहिलेलें अन्न ब्राह्मणाना कळवावें. प्रकिरणाकरिता ( ४।८।१४ ) अन्न घेणें तेही, अर्थात् पिंडान्नाच्या वेळे-सच काढून घ्यावें. **'अन्वष्टक्यं च पूर्वेद्युर्मासिमासि च पार्वणम् । काम्यमभ्युदयेऽष्टम्यामेकोद्दिष्टमथाष्टमम्'** ह्याप्रमाणे एकदर आठ श्राद्धें. सूत्रकारानीं सागितलीं आहेत. ह्यापैकीं पहिल्या चार श्राद्धात, पिंड-पितृयज्ञतुल्य असल्यामुळे, स्थालीपाक व भोजनशेष ह्या दोहोनीं अग्नि-जवळ पिंडदान होतें, शेवटच्या चार श्राद्धात भोजनार्थक अन्नाशानें पाणिहोम करून, भोजन झाल्यावर केवळ भुक्तशेषानें ब्राह्मणाजवळच पिंडदान होते. पिंडदानाचा प्रकार, आम्ही पूर्वीच अन्वष्टकाप्रकरणात लिहिला आहे. ॥ ११ ॥

**अभिमतेऽनुमते वा भुक्तवत्स्वनाचान्तेषु पिण्डान्निदध्यात् ॥ १२ ॥**

ब्राह्मणानीं शेषान्नाचा, घरीं नेण्याकरिता स्वीकार केल्यावर, किंवा ' इष्टैः सह भोज्यताम् ' ( इष्टमित्रासह जेवा ) अशी अनुमति दिल्यावर, ते जेवलेले ब्राह्मण आचवावयाच्या पूर्वींच पिंडदान करावें. ह्या दोहीं सूत्रानीं ब्राह्मण जेवल्यावरच पिंडदान सागून आश्वलायनाचार्यांनीं, मनूसे,

भोजनापूर्वी पिंडदान सांगितलें आहे त्याचा निषेध केला आहे. ह्यावरूनच, इतर मनूनें सांगितलेलें कृत्य, ह्या शास्त्रास विरुद्ध नसल्यास इच्छानुसार करावें असें सूचित होतें ॥ १२ ॥

**आचान्तेष्वेके ॥ १३ ॥**

कोणी आचार्य ब्राह्मणांनीं आचवून आचमन केल्यानंतर पिंड द्यावे असें म्हणतात ॥ १३ ॥

**प्रकीर्यान्नमुपवीयों स्वधोच्यतामिति विसृजेत् ॥ १४ ॥**

पिंडदान करून ब्राह्मणाचें आचमन झाल्यानंतर, ब्राह्मणाच्या उष्ट्याजवळ पूर्वगृहीतान्न जलमिश्र करून पसरावें, म्हणजे विकिर व प्रकिर द्यावें. हें अन्नदान क्रमानें, असोमपदेव व असंस्कृत मृतनराज ह्याकरिता द्यावयाचें असतें. ह्या वेळेस पूर्वी ठेवलेलें प्रथम अर्घ्यपात्र उघडें करून व उपवीती होऊन ब्राह्मणांना दक्षिणा द्यावी. नंतर ‘ॐस्वधोच्यताम्’ असें म्हणून ब्राह्मणांना उठण्यास संमति द्यावी, त्यानंतर उलट ब्राह्मणांनीं ‘ॐस्वधा’ ( होय पितृदत्त झालें ) असें उत्तर द्यावें ॥ १४ ॥

**अस्तु स्वधेति वा ॥ १५ ॥ ॥ ८ ॥**

किंवा ‘अस्तु स्वधा’ असें म्हणून ब्राह्मणांना उठवावें व त्यांनींही ‘अस्तु स्वधा’ असेंच प्रत्युत्तर द्यावें. त्यानंतर कर्त्यानें, ‘दातारो नोऽभिवर्धन्ताम्’ वगैरे वर (स्वकामना), ब्राह्मणाजवळ मागावे व ते त्यांनीं द्यावे, आणि आपापल्या घरीं जावें. ब्राह्मण जाईपर्यंत उष्टीं काढू नये. ते गेल्यानंतर काकबलि द्यावा असें मनुस्मृतींत म्हटलें आहे. असो. अग्निहोत्र्यानें पिंडपितृयज्ञ संपवून नंतर वेगळें पार्वणश्राद्ध करावें अर्थात् ह्या वेळींही पाणिहोमच केला पाहिजे व भुक्तशेषानेंच पिंडदान होतें. काम्यश्राद्धातही [illegible] दोन्हीं अशींच होतात. मासिमासिश्राद्ध केल्यास,

पार्वणाची जरूर नसल्यामुळे अमावास्येस फक्त पिंडपितृयज्ञच करावा; तसेंच काम्यश्राद्ध केल्यास मासिमासि व पार्वण दोहोंचीही जरूरी नाहीं. कारण काम्यश्रुति, फक्त तिथिविशेष पाळल्यानेंच चरितार्थ होईल. आभ्युदयिकश्राद्धात, समब्राह्मण व मूलरहित दर्भ, प्राङ्मुखत्व, उपवीत, प्रदक्षिणोपचार व यवानीं तिलकर्म होत असून गधादि उपचार दोन दोनदा द्यावे; आसनावर सरळ दर्भ द्यावे. 'यवोऽसि सोमदेवत्यो०' वगैरे यवावपनाचा मंत्र आहे. 'मधुवाता०' वगैरेबद्दल 'उपास्मै गायत०' ह्या पाच मधुमती ऋचा ऐकवाव्या, आणि 'अक्षन्नमीमदन्त०' ही सहावी ऋचा म्हणावी. भोजनस्थानें सारवून तेथें प्रागग्र दर्भावर, पृष-दाज्यमिश्रित भुक्तशेषान्नानें, एकेका व्यक्तीला दोन दोन पिंड द्यावे. 'ॐस्वधा' च्या जागीं 'उपसपन्न' असें म्हणावें. एकोद्दिष्ट—श्राद्धात, एकच ब्राह्मण व एकच अर्घ्यपात्र असतें. देवकृत्य, धूप, दीप, स्वधा, पितृ, नम हे शब्द नसतात तिलावपन व अर्घ्यदान 'तूष्णीम्' होतें. अर्घ्यानंतर लागलीच अर्घ्यपात्र उपडें करावें. भोजनार्थक अन्नानेंच 'अमुष्मै ( चतुर्थ्यन्त प्रेतनाम ) स्वाहा' म्हणून पाणिहोम करावा. भुक्तशेषानें, प्रेताचे नाम व गोत्र उच्चारून एकच पिंड द्यावा. अभिश्रवण व पत्नीकृत पिण्डप्राशन नाहीं. 'अभिरम्यताम्' असे म्हणून ब्राह्मणाचे विसर्जन होतें. नवश्राद्धीय एकोद्दिष्टात सर्वच अमंत्रक होतें. नवश्राद्धें म्हणजे मृतशौचाच्या दशाहातली होत. सपिंडीश्राद्धात प्रेताच्या पितृत्रयी-शिवाय प्रेतासही चवथें अर्घ्यपात्र व चवथा पिंड अमंत्रक देतात. प्रेतस्था-नीय ब्राह्मणाचें पूजन एकोद्दिष्टाप्रमाणें अमंत्रकच होतें. ह्यात देवस्थानीं २ व प्रेतासह पित्रादिस्थाना ४ असे सहा ब्राह्मण असावे प्रेतार्घ्यपात्रात, अमंत्रकच तीळ टाकतात. अर्घ्यदानानंतर 'समानीव आ०' ह्या ऋचेनें प्रेतार्घ्यपात्र, इतर तीन अर्घ्यपात्रात ओतावें. पाणिहोम करून शेष हाता-

वर द्यावें. हें शेष भोजनाच्या आधीं खाऊं नये. ' मधुवाता० ' हा तृच व ' संगच्छध्वं० ' वगैरे तृच म्हणून प्रेताचा पिंड फोडून पित्रादि-त्रयीच्या तीन पिंडांवर ठेवावा किंवा त्यांत मिसळावा. ह्यापुढें, वृद्ध प्रपि-तामहाचा किंवा स्त्रीपक्षीं वृद्ध प्रपितामहीचा पिंड लुप्त होतो. ह्याप्रमाणें हें सपिंडीश्राद्ध, एकोद्दिष्ट व पार्वणविधि ह्यांच्या मिश्रणानें होतें. सर्व श्राद्धांचे सविस्तर विधि स्मृत्यंतरांवरून व अर्वाचीन प्रयोगरत्नादि निबंधग्रन्थांवरून समजून येतील. जेथें पाणिहोम होतो तेथें पिंडदान होत नाहीं असें भाष्यकार देवस्वामीचें म्हणणें आहे. कारण त्यावेळीं स्थालीपाकाचा अभाव असतो; व मागें ' तत्स्थालीपाकेन सह पिण्डार्थमुद्धृत्य ' ह्या वाक्यानें तर, स्थालीपाक व भुक्तशेष ह्यांचा समुच्चय सांगितला आहे. परंतु इतर पुष्कळ लोक त्या वाक्यांचा अर्थ असा करतात कीं, स्थालीपाक असल्यास त्यासह पिंडदान करावें; स्थालीपाकानें व भुक्तशेषानें वेगवेगळें करूं नये. असा त्या वाक्याचा अर्थ आहे; जेथे स्थालीपाक असेल तेथेंच पिंडदान करावें असा ह्याचा अर्थ होत नाहीं; म्हणून स्थालीपाक नसेल तेथेंही, केवळ भुक्तशेषानेंच पिंडदान करावें. हल्लीं हाच पक्ष सर्वत्र रूढ आहे. असो; येथें ही आठवी कंडिका संपली. हिजमध्यें एकंदर पंधरा सूत्रें लिहिलीं. ॥ १५ ॥ ॥ ८ ॥

## अध्याय ४ था—कण्डिका ९ वी.

### अथ शूलगवः ॥ १ ॥

आतां येथून शूलगव नांवाचें कर्म सांगण्यास सुरुवात केली जात आहे. शूल म्हणजे शूलधारी जो शंकर, त्याच्या उद्देशानें जो गोपशूचा याग त्याचें नांव शूलगव होय. येथें सूत्रकारानें ' अर्ध आश्विन्योऽ ' ( अश्व-

ध्यायी ५।२।१२७ ) ह्या पाणिनीयसूत्रानें मतुवर्थी अच् प्रत्यय केला आहे, म्हणून शूलपदाचा अर्थ, शूलवान् असा करता आला ॥ १ ॥

**शरदि वसन्ते वार्द्रया ॥ २ ॥**

शूलगव, शरदृतु, किंवा वसन्तऋतु ह्यामध्यें आर्द्रा नक्षत्रावर करावा. कारण त्या नक्षत्राची देवता पशुपतीच आहे. ॥ २ ॥

**श्रेष्ठं स्वस्य यूथस्य ॥ ३ ॥**

आपल्या कळपातला शरीर, जात, वगैरेंनीं अत्यंत श्रेष्ठ असा एक गोहरा निवडावा ॥ ३ ॥

**अकुष्ठिपृषत् ॥ ४ ॥**

तो पशु कुष्ठयुक्त किंवा पृषद्वर्ण नसावा. तांबडा रंग असून त्यावर पांढरे ठिपके असल्यास त्याला पृषत् म्हणतात ॥ ४ ॥

**कल्मापमित्येके ॥ ५ ॥**

कोणी म्हणतात, तांबूस रंगावर काळे ठिपके असलेलाच (कल्माप) पशु निवडावा ॥ ५ ॥

**कामं कृष्णमालोहवांश्चेत् ॥ ६ ॥**

किंचित् लालसर म्हणजे जांभळासारखा रंग असल्यास, काळा पशूही खुशाल निवडावा ॥ ६ ॥

**व्रीहियवमतीभिरद्भिरभिषिच्य ॥ ७ ॥**

असो, अशा प्रकारचा पशु निवडल्यावर त्याला, स्वतः कर्त्यानें व्रीहियव मिश्रित उदकानें स्नान घालावें ॥ ७ ॥

**शिरस्त आभसतः ॥ ८ ॥**

तें स्नान, त्या गोहऱ्याच्या डोक्यापासून शेपटापर्यंत घालावें ॥ ८ ॥

रुद्राय महादेवाय जुष्टो वर्धस्वेति ॥ ९ ॥

'रुद्राय महादेवाय जुष्टो वर्धस्व' असा मंत्र म्हणून तो पशु शंकराच्या उद्देशानें सोडून द्यावा ॥ ९ ॥

तं वर्धयेत्सम्पन्नदन्तमृषभं वा ॥ १० ॥

त्या पशूला दांत येईपर्यंत किंवा गर्भाधानसमर्थ (तरुण), होईपर्यंत वाढवावा. नंतर त्या दोहोंपैकीं कोणत्याही अवस्थेंत हे कर्म करावें ॥ १० ॥

यज्ञियायां दिशि ॥ ११ ॥

ग्रामाच्या बाहेर यज्ञयोग्य अशा दिशेस म्हणजे पूर्वेस किंवा उत्तरेस त्या पशूस नेऊन शूलगव करावा ॥ ११ ॥

असन्दर्शने ग्रामात् ॥ १२ ॥

गांवापासून न दिसेल किंवा जेथून गांव न दिसेल इतकें दूर, तें स्थान असावें ॥ १२ ॥

ऊर्ध्वमर्धरात्रात्, उदित इत्येके ॥ १३ ॥

अर्धरात्रीनंतर हें कृत्य करावें. कोणी म्हणतात सूर्योदयानंतर करावें, असे दोन काळ आहेत ॥ १३ ॥

वैद्यं चरित्रवन्तं ब्राह्मणमुपवेश्य सपलाशामार्द्रशाखां यूपं निखाय, व्रतत्यौ कुशरज्जू वा रशने अन्यतरया यूपं परिवीयान्यतरयार्धशिरसि पशुं बद्ध्वा, यूपे रशनायां वा नियुनक्ति यस्मै नमस्तस्मै त्वा जुष्टं नियुनज्मीति ॥ १४ ॥

या कर्मांत शूलगवकर्म जाणणारा व स्वतः आचरण केलेला असा (वैद्य) ब्रह्मा, अग्नीच्या दक्षिणेस बसवून, टहाळ्या फुटलेल्या ओल्या फांदीचा यूप ( पशुबन्धन–स्तंभ ) पुरावा. नंतर दोन वेली किंवा दोन दर्भरज्जु घेऊन, त्याच्या रशना ( पशुबन्धनी ) कराव्या. त्यांपैकीं एक यूपाभोंवती

बांधून ठेवावी व दुसरीनें पशूच्या अर्ध्या डोक्यावर म्हणजे उजव्या शिंगास बांधून त्या रशनेचें दुसरें टोंक यूपास किंवा त्यास बांधलेल्या रशनेस बांधून ठेवावें. त्यावेळेस पशूचें तोंड पश्चिमेस असावें व 'यस्मै नमस्तस्मै त्वा जुष्ट नियुनज्मि' हा मंत्र म्हणावा. यूपादिक विशेष फक्त ह्याच पशुपुरते आहेत. कारण सर्वसामान्य पशुकल्पांत ह्यांचें विधान केलेलें नाहीं ॥ १४ ॥

**प्रोक्षणादि समानं पशुना विशेषान्वक्ष्यामः ॥ १५ ॥**

प्रोक्षणापासून पुढचें सर्व कृत्य पशुकल्पाप्रमाणेंच आहे. मध्यें मध्यें असणारे विशेष सांगू. 'प्रोक्षणादि' पदानें, त्यापूर्वीचें पशुकल्पविधान होत नाहीं असें ठरलें ॥ १५ ॥

**पात्र्या पलाशेन वा वपां जुहुयादितिह विज्ञायते ॥ १६ ॥**

ह्यावेळीं, लाकडी वाटीनें किंवा पळसाच्या द्रोणानें वपेचा होम करावा असें वेदावरून समजतें. जागजागीं श्रुतिप्रमाण देण्याचें कारण, ते तें कृत्य उत्सन्नश्रुतिमूलकच आहे असें सुचविणे, हें होय ॥ १६ ॥

वपा, स्थालीपाक व अवदानें ( ११ अंगें. श्रौतसूत्रोक्त ) ह्या तिहीं-च्याही होमाचा मंत्र ह्यापुढें सांगतात.

**हराय मृडाय शर्वाय शिवाय भवाय महादेवायोग्राय भीमाय पशुपतये रुद्राय शंकरायेशानाय स्वाहेति ॥ १७ ॥**

ह्या, स्वाहान्त १२ नावांचा मंत्र आहे ॥ १७ ॥

**षड्भिर्वोत्तरैः ॥ १८ ॥**

किंवा उग्राय वगैरे शेवटच्या सहा नावांचा मंत्र करावा ॥ १८ ॥

**रुद्राय स्वाहेति वा ॥ १९ ॥**

किंवा 'रुद्राय स्वाहा' अशा एकनामक मंत्रानेंच होम करावा ॥ १९ ॥

**चतसृषु चतसृषु कुशसूनासु चतसृषु दिक्षु बलिं हरेद्यास्ते रुद्र पूर्वस्यां दिशि सेनास्ताभ्य एतन्नमस्ते अस्तु मा मा हिंसीरित्येवं प्रतिदिशं स्वादेशनम् ॥ २० ॥**

वपा, स्थालीपाक व अवदान ह्यांचे होम झाल्यानंतर, स्विष्टकृतापूर्वी चारही दिशांना चार चार कुशसूना ठेवून त्यावर, यास्तेरुद्र वगैरे मार्हिंसी पर्यंत वर दिलेला मंत्र म्हणून मांसशेषाचे व चरुशेषाचे बलि, रुद्रसेनांच्या उद्देशानें द्यावे. प्रत्येकदिशेला मंत्रावृत्ति करावी. दर्भ आणि गवत चटईसारखी विणून सर्वांचे शेंडे एकत्र बांधून गुफतात त्यांना कुशसूना असें म्हणतात ॥ २० ॥

**चतुर्भिः सूक्तैश्चतस्रो दिश उपतिष्ठेत कद्रुद्रायेमा रुद्रायाते पितरिमा रुद्राय स्थिरधन्वन इति ॥ २१ ॥**

'*कद्रुद्राय०*' '*इमा रुद्राय०*' '*आते पित ०*' '*इमा रुद्राय स्थिरधन्वने०*' ह्या चार सूक्तांनीं ( १।३।२६,१।८।५,२।७।१६,५।४।१३ ), ह्याच क्रमानें, चारी दिशांचे ठायीं उपस्थान करावें. 'सूक्तैं' हें अधिक पद पहिल्या सूक्तामध्ये 'अस्मे सोमश्रियमधि०' वगैरे रुद्रदेवताक नसणाऱ्या मंत्राची निवृत्ति सूचित करतें ॥ २१ ॥

**सर्वरुद्रयज्ञेषु दिशामुपस्थानम् ॥ २२ ॥**

'**एतमेव देवं मध्ये गोष्ठस्य**' '**रौद्रं गवेधुकंनिर्वपेत्**' वगैरे सर्व रुद्रदेवताक यज्ञामध्ये, ह्याचप्रमाणें दिशांचें उपस्थान करावें ॥ २२ ॥

**तुषान्फलीकरणांश्च पुच्छं चर्म शिरः पादानित्यग्रावनुप्रहरेत् ॥ २३ ॥**

स्थालीपाकाच्या भाताचा कोंडा, कण्या व पशूचें पुच्छ, कातडें, टोकें, पाय वगैरे अवयव अग्नींत टाकावे ॥ २३ ॥

**भोगं चर्मणा कुर्वीतेति शांवत्यः ॥ २४ ॥**

शांवत्य आचार्य म्हणतो, कातडें अग्नींत न टाकतां, त्यानें जोडे, वहाणा वगैरे संसारोपयोगी जिन्नस करावे ॥ २४ ॥

**उत्तरतोऽग्नेर्दर्भवीतासु कुशसूनासु वा शोणितं निनयेच्छ्वासिनीर्घोषिणीर्विचिन्वतीः समश्नतीः सर्पा एतद्वोऽत्र तद्धरध्वमिति ॥ २५ ॥**

यानंतर अग्नीच्या उत्तरेस दर्भपंक्तींवर किंवा कुशसूनांवर, श्वासिनीः वगैरे तद्धरध्वं पर्यंत वर दिलेला मंत्र म्हणून, अवदानहोमाच्या वेळेस पात्रांत धरून ठेवलेलें रक्त ओतावें ॥ २५ ॥

**अथोदङ्ङावृत्य श्वासिनीर्घोषिणीर्विचिन्वतीः समश्नुतीः सर्पा एतद्वोऽत्र तद्धरध्वमिति सर्पेभ्यो यत्तत्रासृग्‌वध्यं वावस्रुतं भवति तद्धरन्ति सर्पाः ॥ २६ ॥**

नतर तेथल्या तेथेच उत्तरेकडे तोंड करून, पशूच्या संज्ञपनाच्या वेळेस भूमीवर सांडलेले रक्त वगैरे जे असेल तेंही सर्व सर्पांच्याच उद्देशानें, 'श्वासिनीः०' वगैरे मंत्र म्हणून अर्पण करावें. तें सर्व, सर्प ( सरपटणारे प्राणी ) घेऊन जातात ॥ २६ ॥

**सर्वाणि ह वा अस्य नामधेयानि ॥ २७ ॥**

लोकांमध्यें जीं जीं नावें आहेत तीं सर्व ह्या रुद्रदेवाचींच नांवें आहेत. म्हणजे जगांत जेवढे पदार्थ आहेत ते सर्व रुद्ररूपच आहेत. त्यावरून रुद्राचें सर्वगतत्व दाखवून रुद्रयज्ञाचें महत्त्व प्रदर्शित केलें आहे ॥ २७ ॥

**सर्वाः सेनाः ॥ २८ ॥**

त्रैलोक्यातल्या सर्व सेना रुद्राच्याच आहेत. अर्थात् राजे, देव वगैरे

सर्व वैभवयुक्त व्यक्ति, रुद्रदेवच आहेत असें ज्ञापित होतें. स्तुतीमध्यें पुन रुक्ति, दोष समजत नाहींत ॥ २८ ॥

सर्वाण्युच्छ्रयमाणानि ॥ २९ ॥

जगातील सर्वश्रेष्ठ विभूति, ह्या श्रीरुद्राचेच अश आहेत, म्हणजे जगात विद्वत्ता, श्रीमत्त्व, बलवत्त्व, दातृत्व, ध्यातृत्व, तप कर्तृत्व, उच्चत्व वगैरे सर्व बाजूनीं ज्या श्रेष्ठ व्यक्ति, त्या त्या शिवस्वरूपच आहेत. श्री शिवाचें सर्वगतत्व, श्रीरुद्राध्याय, जाबाल्युपनिषद्, वगैरे प्रथात सर्वप्रसिद्धच आहे. ह्याप्रमाणें आचार्यानें अनेक प्रकारानीं श्रीरुद्राची स्तुति केली आहे. *एकदरींत आश्वलायनांच्या वेळीं, पौराणिक देवतापैकीं श्रीशकराची उपा* सना, विशेष प्रचलित असावी असें ह्या प्रकरणावरून व मागें लिहिलेल्या आश्वयुजीकर्मावरून दिसते साराश, शिवोपासना सर्वांपेक्षा प्राचीन ठरते. ॥ २९ ॥

इत्येवंविद्यजमानं प्रीणाति ॥ ३० ॥

ह्याप्रमाणे श्रीरुद्रदेवाचा महिमा माहीत असून जो यजमान शूलगवानें यजन करील त्याला, तो देव सर्वसुखानीं युक्त करील ॥ ३० ॥

नास्य ब्रुवाणं चन हिनस्तीति विज्ञायते ॥ ३१ ॥

ह्या कर्माचा वक्ता, ज्ञाता, अध्ययनकर्ता व उपकर्ता वगैरेंची, रुद्रदेव, हिंसा करीत नाहीं, असें वेदावरून समजतें; म्हणजे त्याचा अपमृत्यु वगैरेनीं घातपात होत नाहीं 'चन' ह्याचा अर्थ, 'अपि' ( देखील ) असा येथें असल्यामुळें, ज्ञाता वगैरे अधिक अर्थ निघाला ॥ ३१ ॥

नास्य प्राश्नीयात् ॥ ३२ ॥

ह्या पशूचें हुतशेष खाऊ नये ह्यावरून इतर पशूचें शेष, इच्छा असल्यास खावें असें ज्ञापित होतें हें मत फक्त काहीं लोकाचें आहे असें पुढें येणाऱ्या ३५ व्या सूत्रावरून ठरते ॥ ३२ ॥

**नास्य ग्राममाहरेयुरभिमारुको ह्येष देवः प्रजा भवतीति ॥ ३३ ॥**

ह्या धर्माचें संबंधी द्रव्य, कोणीही गावात आणू नये, कारण तें आण णाराची रुद्रदेव हिंसा करतो म्हणून किंचित्‌ही आणू नये ॥ ३३ ॥

**अमात्यानन्ततः प्रतिषेधयेत् ॥ ३४ ॥**

पुत्र वगैरे परिवारातल्या मनुष्यांना, ह्या जागेकडे जाण्याविषयीं निषेध करावा कारण कदाचित् कोणी कांहीं, चुकून आणतील म्हणून देखील निषेधाचा अपहार घातक समजला जातो ॥ ३४ ॥

**नियोगात्तु प्राश्नीयात्स्वस्त्ययन इति ॥ ३५ ॥**

परंतु गुर्वाज्ञा ( नियोग ) असल्यास, ह्या पशूच्या हुतशेषाचेहि नियमानें भक्षण करावे, कारण ते कल्याणदायक असतें ह्यावरून ' नास्य प्राश्नीयात्' ह्या वरचा निषेध एकदेशी ठरतो ॥ ३५ ॥

**स एष शूलगवो धन्यो लोक्यः पुण्यः पुत्र्यः पशव्य आयुष्यो यशस्यः ॥ ३६ ॥**

हा शूलगव, कर्त्याला, धन, उत्तम लोक, पुण्य, पुत्र, पशु, आयुष्य व कीर्ती प्राप्त करून देत असतो ॥ ३६ ॥

**इष्ट्वान्यमुत्सृजेत् ॥ ३७ ॥**

ह्याप्रमाणें, शूलगवानें यजन करून, पुढ्या शूलगव करण्याकरता, दुसरा पशु, पूर्वोक्त लक्षणांनीं युक्त असा पाहून पूर्वोक्त अभिषेक करून सोडावा ॥ ३७ ॥

**नानुत्सृष्टः स्यात् ॥ ३८ ॥**

शूलगवाकरता एकदा तरी पशूत्सर्ग केल्याव्याचून राहू नये. म्हणजे

आयुष्यांत निदान एकतरी शूलगव अवश्य केला पाहिजे. ह्यावरून हें नित्यकर्म आहे असें ठरतें. हल्लीं मात्र, इतर बहुतेक पशुयागांप्रमाणें ह्याचा प्रचार कोठेंही दिसत नाहीं ॥ ३८ ॥

नहाऽपशुर्भवतीति विज्ञायते ॥ ३९ ॥

ह्या पशुकर्मानें रहित राहूं नये असें श्रुतीवरून कळतें. सारांश, निदान एकदां तरी पशूचा उत्सर्ग अवश्य आहे. हल्लीं वळू सोडण्याची चाल आहे ती, ह्याचाच अवशेष किंवा रूपान्तर असावेंसें वाटतें. ॥ ३९ ॥

शन्तातीयं जपन्गृहानियात् ॥ ४० ॥

ह्यापुढें 'शंन इन्द्राग्नी' (ऋक्सं० ५।३।२८) वगैरे शन्तातीयसूक्त जपत परत येऊन घरांत शिरावें. येथें शूलगव संपला ॥ ४० ॥

पशूनामुपताप एतमेव देवं मध्ये गोष्ठस्य यजेत् ॥ ४१ ॥

आपल्या गुराढोरांमध्यें रोगांचा प्रादुर्भाव झाला असतां, ह्याच रुद्रदेवाचें गोठ्यामध्यें यजन करावें ॥ ४१ ॥

स्थालीपाकं सर्वहुतम् ॥ ४२ ॥

आज्यभागान्त कृत्य करून, पात्रांत दर्वीनें उपस्तरण घालून त्यावर सर्व स्थालीपाक उकरून व प्रत्यभिधारण करून सर्वच चरूचा शूलगवोक्तमंत्रानें होम करावा. येथें प्रधानहवि शिल्लकच नसल्यामुळें, स्विष्टकृदाहुति होत नाहीं. नंतर पूर्वीप्रमाणें चारी दिशांचें उपस्थान करून सर्वप्रायश्चित्तादिक होमशेष संपवावा. ॥ ४२ ॥

बर्हिराज्यं चानुप्रहृत्य धूमतो गा आनयेत् ॥ ४३ ॥

नंतर अग्नीवर दर्भ, घृत आणि चशब्दानें सूचित केलेल्या स्थाली-

पाकाच्या कण्या व कोंडा हीं सर्व टाकून त्याच्या धुरालून, गाई वगैरे जनावरे गोठ्यात आणावीं ॥ ४३ ॥

शन्तातीयं जपन्पशूनां मध्यमियान्मध्यमियात् ॥ ४४ ॥

ह्यापुढें, 'शन इन्द्राग्नी०' (स० ५।३।२८) हें शतातीयसूक्त जपत जपत त्या पशूच्यामध्ये प्रवेश करावा. म्हणजे पशूची पीडा (रोग वगैरे) नाहींशी होईल. दुसरे लोक, शतातिशब्दयुक्त सूक्तें, असा अर्थ करून 'ईळे द्यावापृथिवी' 'इद ह नूनमेषा' 'उत देवा अवहितम्' व 'शन्न इन्द्राग्नी' अशीं (स० १।७।३३, ६।१।२५, ८।७।२५, ५।३।२८), चार सूक्तें जपावीं असे म्हणतात ह्या शास्त्रात प्रतीकें दिलेले सर्व वेद-मन्त्र, ऋक्संहिता वगैरे मध्ये सापडतील व ऋचाचीं छन्द, ऋषी आणि दैवतें, श्रीआश्वलायन आचार्यांनीच रचलेल्या वेदाच्या सर्वानुक्रमणीवरून समजतील मंत्राचे विनियोग ह्या गृह्यसूत्रात दिलेच आहेत. असो शेवटीं 'मध्यमियात्' ह्या दोन पदाची आवृत्ति केली आहे ती, ह्या गृह्यसूत्राच्या ४ थ्या अध्यायाची समाप्ति बोधित करते ॥ ४४ ॥

नमः शौनकाय नमः शौनकाय ॥ ४५ ॥

॥ इति श्री आश्वलायनाचार्यविरचित गृह्यसूत्र संपूर्णम् ॥

श्रीशौनक महर्षींना नमस्कार असो. सूत्रकार आश्वलायनाचार्यांनीं, शौनकाचार्यांच्या प्रसादानें हे गृह्यसूत्र रचिलें. तें येथें समाप्त झाले. हें सुचविण्याकरिता सूत्रकारानीं येथें, कृतज्ञताबुद्धीनें व सद्भावाने गुरुवंदन केले आहे. येथे ह्या गृह्यसूत्राच्या चवथ्या अध्यायाची ९ वी कंडिका व हा चवथा अध्यायही समाप्त झाला. ह्या शेवटच्या कंडिकेंत एकंदर ४५ सूत्रें सांगितलीं आहेत ॥ ४५ ॥ ॥ ९ ॥

ह्यापूर्वीं, श्रीवेदांगार्थचंद्रिकेपैकीं शिक्षा, ज्यौतिष, छंद व निघंटु ह्यांचीं मराठी व्याख्यानें लिहून झाल्यानंतर आम्ही, गृह्यसूत्राचा अर्थ लिहिण्यास सुरवात केली होती. तें हें मराठी व्याख्यान आज ईश्वरकृपेनें परिपूर्ण झालें आहे. पूर्वींच्या चारी पुस्तकांपेक्षां हा ग्रंथ मोठा व विषयवैविध्यामुळें कठिण होता; परंतु गार्ग्यनारायणीय वृत्ति, कुमारिलभट्टांच्या कारिका, प्रयोगरत्न वगैरे प्राचीन व अर्वाचीन सर्वमान्य ग्रंथांच्या साह्याय्यानें, यथामति हें मराठी विवरण तयार करून सज्जनांच्या सेवेस सादर केलें आहे; विद्वज्जन ह्यांतील न्यूनाधिक्याबद्दल क्षमा करून, गुणलवांचा हंसक्षीरन्यायानें स्वीकार करतील अशी आशा आहे. ह्या ग्रंथांतल्या न्यूनाच्या पूर्णतेविषयीं व सुधारणेविषयींचा भार, त्या विद्वज्जनांवरच सोंपवितों; कारण अत्यंत सूक्ष्मदृष्टीनें पाहून लेखन केलेलें असलें तथापि कर्मकांड हें समुद्रासारखें विशाल, विषयवैविध्यानें व मतभेदांनीं भरलेलें असल्यामुळें, दोषांचें सर्वस्वी निवारण होणें अपरिहार्य आहे. तथापि, मूळ वेदांगग्रन्थाचा यथावत् अर्थ, वैदिकांना शुद्धरीतीनें समजण्यास हरकत पडणार नाहीं अशी खात्री आहे; व वेदाङ्गार्थचन्द्रिका ही ग्रन्थमाला लिहिण्यांत, आमचा मुख्य उद्देशही वेदाङ्गमूलांचें शुद्धज्ञान करून द्यावें हाच आहे. अर्वाचीन व्याख्यानें व प्रयोगविस्तार ह्यामध्येंच बहुधा मतभेद असूं शकतात. परंतु तेंही विवरण, प्राचीनग्रंथानुसारच प्रायः लिहिलें आहे. त्यामुळें त्यांतही परंपरेची हानि होऊं दिली नाहीं. असो, आतां आश्वलायनादिक सर्व पूर्वाचार्यांना, शेवटीं सद्भावानें वंदन करून, माझ्या इतर वेदांगव्याख्यानांप्रमाणें हाही ग्रन्थ सर्वान्तर्यामी परमेश्वरास स्वकर्तव्य म्हणून समर्पण करतों.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

येथे, आमचें श्रीआश्वलायनमहर्षिप्रणीत गृह्यसूत्राचें महाराष्ट्रविवरण समास झालें. ॥ ॐ तत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥

शिन्त्रेऽभिजनसंभूतः काव्यालंकारभूषणः ॥ कविर्विद्याधरसुतः शिवरामाह्वयो द्विजः ॥ १ ॥ उकसाणाभिधे ग्रामे प्रतीच्यां पुण्यपत्तनात् ॥ शालिवाहनभूपाब्दे वस्त्वग्निवसुभूमिते ( शके १८३८ ) ॥ २ ॥ भौमे माघासिते पष्ठयां देशभाषामयं निजम् ॥ आश्वलायनगृह्यस्य व्याख्यानं कृतवान्कृतम् ( पूर्णमित्यर्थः ) ॥ ३ ॥

